॥ श्रीरामसमर्थ ॥

# मराठीची सजावट

## भाग २ रा.

लेखक

गोपाळ गोविंद मुजुमदार,

सांगली हायस्कूलमधील मराठीचे शिक्षक

व वनविहार, रणविहार, गृहविहार,

निर्माल्यसंग्रह भाग १-२ इ०

काव्यांचे कर्ते, राजकवि, सांगली.

सर्व हक्क स्वाधीन ठेवले आहेत.

१९२९

किंमत २ रुपये.

# प्रस्तावना

मराठी भाषेच्या निरनिराळ्या अंगांसंबंधानें विवेचनपर असे अनेक ग्रंथ आजवर झालेले आहेत. तथापि, शक्यांत शक्य तितक्या अधिक अंगांचा परामर्ष घेऊन पण विद्यार्थ्यांच्या हि उपयोगी पडण्यासारखा, थोडक्यांत मार्मिकपणें लिहिलेला, हा ग्रंथ पहिलाच असावा असें मला वाटतें. अडीचशें पावणे तीनशें पानांचाच ग्रंथ. पण त्यांत मराठी भाषेच्या 'सजावटी' संबंधाचा कोणताहि महत्त्वाचा भाग सुटलेला नाहीं. नाहीं म्हणावयाला मराठी भाषेचें प्रचलित व्याकरणच काय तें यांत दिलेलें नाहीं. व्याकरणाचें अध्ययन निदान सामान्यपणें केलेल्या वाचकानेंच हें पुस्तक वाचावयाचें आहे. व तें अध्ययन त्याचें झालेलें नसल्यास निदान पहिला भाग तरी समजून घ्यावयाला त्याला प्रथम व्याकरण शिकावें लागेल. पण अशी आपत्ति सहसा येण्याचेंच कारण नाही. कारण स्वतःची काय किंवा दुसऱ्याची काय, भाषा ही शिक्षणाचें अंग म्हणून शिकतांना, प्रथम व्याकरणच शिकावें लागतें, शिकतात व शिकवितात.

'सजावट' या रचनादर्शक शब्दांत नैसर्गिक व कृत्रिम हे दोनहि प्रकार समाविष्ट होतात. सजावट याचा अर्थ 'शोभा' असा केला तरी शोभेला नैसर्गिक रचनेचाच आधार घ्यावा लागतो. सजावट म्हणजे सोंग नव्हे. तथापि सोंगांत सुद्धां मूळ अनुकृत रचनेचें वैशिष्ट्य प्रगट करावेंच लागतें.

एखाद्या पशूच्या सोंगाचेंच उदाहरण आपण घेऊं. सामान्यतः पशूला चार पाय असतात. परंतु हत्तीचें सोंग आणावयाचें तर सोंड, उंटाचें सोंग आणावयाचें तर त्याची लांब मान व पाठीवरील मदार, गाढवाचें सोंग आणावयाचें असेल तर त्याचे लांब कान, व वाघाचें सोंग आणावयाचें असेल तर त्याचा भयंकर जबडा. या म्हणजे त्या त्या पशूंच्या वैशिष्ट्याची पक्की ओळख पटवून देणाऱ्या गोष्टी दाखविल्याच पाहिजेत. नाहीं तर तें सोंग साधलें असें होत नाहीं. पण प्रस्तुत पुस्तकांत मराठी भाषेच्या सोंगाचा म्हणजे कृत्रिम विकृत स्वरूपाचा विचार केलेला नाहीं, तर स्वाभाविक व शोभायुक्त सजावटीचा विचार केलेला आहे. अर्थात् असा विचार करितांना मराठी भाषेची जी शरीरघटना मूळ व्याकरणादिकांनीं बनलेली आहे तिचा आधार घेणें अवश्यच आहे, व तसा तो ग्रंथकारानें घेतलेलाहि आहे. आणि या मूळ आधारभूत भाषाघटनेचा परिचय कोणाहि सामान्य मराठी

मनुष्याला असतोच असें गृहीत धरून व्याकरणाचे नियम सांगण्याच्या भरीस तो पडलेला नाहीं. पण भाषेची मूळ व्याकरणबद्ध घटना थोडी असते व, तिला अशुद्ध स्वरूप येण्याइतकें न सोडतां, शिष्टसंमत व रूढ अपवाद व विकल्प यांच्या उपयोगानें भाषा विस्तार पावत असते आणि हा विस्तार पावत असतां, शोभेचे व सजावटीचे निरनिराळे प्रकार तींत आपोआप बनत असतात. अशा रीतीनें भाषेला स्थिर व चल अशीं दोन अंगें प्राप्त होतात. प्रस्तुत पुस्तकांत या स्थिर अंगापेक्षां चलनशील अंगांचाच विचार अधिक केलेला आहे.

प्रस्तुत ग्रंथाचे दोन्ही भाग एकत्र ध्यानांत घेतले, आणि मराठी भाषा हा एक मनुष्य देह आहे असें कल्पिलें, तर असें म्हणतां येईल की, ग्रंथकारानें तिची सांगोपांग शरीररचना प्रगट केली आहे इतकेंच नव्हे, तर तिचे सर्व प्रकारचे शरीर व्यापारहि प्रगट केले आहेत. एखाद्या वैद्यक शिक्षणालयांत गेले असतां, तेथें विद्यार्थ्यांना दाखविण्याकरितां उभ्या केलेल्या हाडांच्या सांगाड्यावरून स्थिर-गुण असा मनुष्य देह कसा असतो हें कळतेंच. पण त्याबरोबरच त्याहून महत्त्वाच्या अशा गोष्टींचे नकाशे तेथें पाहावयास मिळतात. या नकाशांवरून समजून येणाऱ्या गोष्टी म्हटल्या म्हणजे खालील होतः— तुटक हाडें कशानें जोडलीं जाऊन त्यांच्यामध्यें निरनिराळ्या भागापुरतें चलनवलन होण्याची शक्ति येते ? या हाडावर मांसमज्जांचें स्निग्ध थर कसे बसतात ? त्यांना नेहमीं ओलावा देणाऱ्या रक्तवाहिन्यांची रचना मधून मधून कशी केलेली असते ! या वाहिन्यांतून वाहाणारें रक्त मूळ कोठें कसें उत्पन्न होतें व त्याचें अभिसरण सगळ्या शरीरांतून कसें चालतें ? या सर्वांना चैतन्य देणारा मेंदू कसा व कोठें असतो ? त्यापासून शरीराच्या निरनिराळ्या टोंकापर्यंत संवेदनांचे निरोप धाडून व आणवून, अनेक प्रकारचीं शरीरकार्यें घडविण्याकरितां संवेदनक्षम अशा तारांचें जाळें कसें पसरलेलें असतें ? मधून मधून या तारा एकत्र करून तेथें संवेदनाधिकाऱ्यांच्या चौक्या कशा बसविलेल्या असतात ? अन्न व पाणी यांचा स्वीकार, उपयोग व परिणाम कसा होतो ? म्हटलीं तर सजीव म्हटलीं तर निर्जीव अशीं नखें व केस यासारखीं शरीरांगें कशीं उत्पन्न होतात ? आणि शरीराच्याच जड व मूर्त अशा कित्येक भागांतून चैतन्य-बुद्धि भावना विकार इत्यादि कसे निर्माण होतात ? मनुष्यशरीराची ही दुसरी सजावट झाली।

पण याच्याहूनहि तिसऱ्या एका प्रकारची सजावट मनुष्यामध्यें दिसून येते. केवळ शरीर घेतलें तरी एकाचे पाय फेंगडे असतील तर दुसऱ्याच्या उभे राहण्यांत स्वाभाविक सौंदर्य, अथवा लष्करी ऐटीनें उभा राहिल्यास कृत्रिम सौंदर्य दिसूं शकेल. थलथलीत दंडांपेक्षां मेहनतीनें कसलेले व त्यावर गोटी उठलेले दंड अधिक शोभा देतात. नैसर्गिक साधनांनींच सजावट घडविण्याची या पुढची पायरी म्हटली म्हणजे भिवया कोरणें, मिशा कातरणें किंवा पीळदार बनविणें, किंवा कल्ले दाढी ठेवून त्यांना निरनिराळे चांगले आकार देणें, डोक्याचे केस विशिष्ट रीतीनें कातरणें व भांग काढणें इ० येथून पुढें कृत्रिम साधनांचा आधार घेण्यास सुरवात झाली म्हणजे, रंग वस्त्रप्रावरण व अलंकार इत्यादि साधनांनीं त्याच मनुष्यदेहाच्या शोभेचे किंवा सजावटीचे प्रकार किती अनंत होऊं शकतात याचा आपणांस नित्य अनुभव आहेच. पण अनुभवाला कल्पनेचीहि भर घालतां येईल. इतका विस्तार रूपकानें करून सांगण्याचा हेतु हा कीं, प्रस्तुत ग्रंथाचें खरें स्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत यावें.

मराठी भाषेच्या मूळ घटनेचे नियम फारच थोडे आहेत, व या नियमांनीं बांधलेल्या भाषारचनेला वर एके ठिकाणीं सांगितलेल्या हाडांच्या सांपळ्याचेंच स्वरूप आहे. कर्ता, कर्म, क्रियापद, विभक्ति, विशेषण, क्रियाविशेषण, अव्यय, इत्यादि काय ते व्याकरणांतले मुख्य विषय होत. पण प्रस्तुतचें पुस्तक वाचणाराला हें दिसून येईल कीं, मूळ व्याकरण न सोडतां, शिष्टसंमत व रूढ अशा अपवादांनीं व प्रचारांनीं या मूलभूत गोष्टींची विचारप्रदर्शक शक्ति मराठी भाषा बोलणारांनीं व लिहिणारांनीं गेल्या कित्येक शतकांत आधींच किती तरी वाढविली आहे व यापुढेंहि आणखी किती तरी वाढेल. जगांतील वाढत्या व्यवहारामुळें विचारांचें अंग क्षणोक्षणीं वाढत असतें. आणि त्यावरील भाषेचा अंगरखा केव्हांहि इतका आखूड पडतो किंवा तंग होतो कीं, हातपाय हटकून बाहेर दिसतात, आणि अंगरखाहि ठिकठिकाणीं फाटतो. विचारांच्या अखंड प्रसरणामुळें, भाषा ही लोखंडाच्या साखळीसारखी असून भागत नाहीं; फार काय ती रबराच्या वादीसारखीहि असून भागत नाहीं. कारण रबराच्या ताणण्यालाहि मर्यादाच आहे. म्हणून प्रायः असेंच आढळतें कीं, भाषा ही विचारांच्या अंगावर एखाद्या जाळीदार अंगरख्याप्रमाणें बसलेली राहाते; मात्र या जाळींतील भोकें केवळ पारदर्शक होण्याइतकीं लहान नसतात.

तर तीं एवढालीं मोठीं असतात कीं, एखादे ठिकाणीं त्यांना भोसकेहि म्हणतां येईल. यामुळेंच व्याकरणाच्या प्रत्येक नियमाला अनेक अपवाद उत्पन्न होतात, व प्रत्येक व्याकरण पद हें अनेक निरनिराळ्या प्रकारच्या शक्ति अंगीं आणतें. इतकें करूनहि भाषा ही वाढत्या व्यवहाराला अपुरीच पडते.

ग्रंथकर्त्यानें जे अनेक नवीन नियम सुचविलेले दिसतात त्यांना पूर्वीचा कांहीं आधार नसून, त्यानें परिश्रमपूर्वक केलेल्या चौकसखोर सूक्ष्म अवलोकनाचे ते परिणाम होत. या अवलोकनापूर्वी त्याला स्वतःलाहि ते नियम होते असें माहीत नसावें. पण तर्कशास्त्रांत ज्याला Inductive म्हणजे विशेषावरून सामान्याकडे जाण्याची पद्धति म्हणतात तिचा अंगिकार त्यानें केलेला आहे. व तो इतका उत्कृष्ट साधलेला आहे कीं, देखत देखत नवीन शास्त्र कसें बनूं शकतें त्याचें तें एक नवीन उदाहरण म्हणून दाखवितां येईल. या शास्त्रसिद्धीचीं उदाहरणें येथें देत बसण्यांत अर्थ नाहीं. कारण या ग्रंथांतील अनेक प्रकरणांतून, त्यानें तीं इतकीं सुटसुटीत व सोपीं करून दिलीं आहेत कीं, वाचकानें तीं नुसतीं चाळीत गेलें असतां लक्ष्यांत येतील. Inductive पद्धतीनें शास्त्रीय स्वरूपाचे नियम बनविणाराला पुढें सिद्ध होणाऱ्या नियमांची आधी स्थूल प्रतीति झालेली असते. पण शास्त्रसिद्धतेचा हेतु मनांत ठेवून वाचीत गेलें असतां ती प्रतीति दृढमूल होते, इतकेंच नव्हे तर नवीन पुराव्यानें नवीनहि नियम सुचूं लागतात. वृत्तासंबंधानें प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं अलिकडे प्रसिद्ध केलेलें पुस्तक वाचणाराला या आमच्या विधानाचें प्रत्यंतर मिळेल.

ज्या उदाहरणवांरून प्रस्तुत ग्रंथकारानें मराठी भाषेच्या सजावटीचे हे नियम बनविले आहेत तीं प्रायः लोकांच्या वाचण्यांत नेहमीं येण्यासारख्या लेखांतून अगर ग्रंथांतून घेतलेलीं आहेत. पण या लेखकांनीं किंवा ग्रंथकारांनींहि जे वाक्प्रचार योजले किंवा अपवाद उपयोगांत आणले, त्यांतील कांहीं कदाचित् त्यांना नकळत त्यांचे हातून प्रथमच घडले असले तरी इतर बहुतेक त्यांच्याहि पूर्वकाळीं रूढच होते व सशास्त्र मानले गेले होते. व म्हणूनच त्यांनीं ते उपयोगांत आणले. ती त्यांची जाणून बुजून बंडखोरी नव्हती. याचा अर्थ असा कीं, आज कैक वर्षे हे प्रचार सिद्ध झाले असतां, ते कांहीं नियमांत बसूं बसतात अशा दृष्टीनें त्यांजकडे कोणी पूर्वी पाहिलें नव्हतें.

पण प्रसिद्ध लेखकांच्या लेखांतील शुद्ध किंवा रूढ प्रचाराची जशी उदाहरणें दिली आहेत तशींच एखादें स्वतंत्र प्रकरण करून, आजच्या दृष्टीनें ठरणाऱ्या त्यांच्या चुकांचीं म्हणजे अशुद्ध प्रयोगांचीं व अपप्रयोगांचीं उदाहरणेंहि दिलीं असतीं तर बरें झालें असतें. शिष्ट मानलेल्या लेखकांच्या चुकांचा एखादा पाठ शुद्धीकरणा-

करितां विद्यार्थ्यांना दिला असतां त्यांना त्याची मोठी मौज वाटली असती. थोर लोकहि स्खलनशील कमे असतात हें त्यांना कळलें असतें. व त्याचा परिणाम त्यांच्या मनावर अधिक झाला असता. एरवीं शिष्ट लेखकांचे अवगुण तेहि पुढच्या पिढींत गुण ठरावयाचे !

प्रस्तुत पुस्तक मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां शाळांतून लावण्यासारखें आहे व तें लावलेंहि जाईल. परंतु या बाबतींत एक भीति अशी वाटते कीं, हें पुस्तक शिकवितांनाहि शिक्षक जुनी व्याकरण शिकविण्याची पद्धत पत्क-रतील म्हणजे, उदाहरणें विद्यार्थ्यांपुढें मांडून त्यावरून त्यांच्याच बुद्धीनें त्यांतील वैशिष्ट्य हुडकावयास लावून नियम बांधण्याकडे त्यांची प्रवृत्ति न करितील, आणि आधीं त्यांजकडून नियमच वाचवून घेतले जातील, तर तें पायाऐवजीं डोक्यावर उभें राहाण्यासारखें होईल. मराठी शाळेंत पूर्वी ज्यांनीं व्याकरणाचे नियम घोकले, किंवा हायस्कुलांत डॉक्टर भांडारकर यांच्या संस्कृत क्रमिक पुस्तकांतील इंग्रजी भाषेंतून लिहिलेले नियम पाठ केले, किंवा इं० सातव्या इयत्तेंत प्रो. कुक यांच्या अॅस्ट्रॉनमीच्या पुस्तकांतील व्याख्या परीक्षेकरितां पाठ केल्या, त्यांना अमूर्त तात्त्विक स्वरूपाच्या व्याख्या व नियम यांचा मुलांच्या बुद्धीवर किती ताण पडतो व एकंदरीनें त्यांच्यावर किती जुलूम होतो हें आठवत असेल. म्हणून या पुस्तकांतील नियम हे प्रायः विद्यार्थ्यांकरितां नाहींत, ते फक्त शिक्षकाक-रितां आहेत, असें मात्र समजावें. शिक्षकांना नियमांचा उपयोग असा कीं, ग्रंथकारानें जर त्या खालीं एक उदाहरण दिलें असेल, तर त्यांनीं आपल्या शोधानें प्रत्यंतरादाखल तोच नियम सिद्ध करून देण्यासारखीं इतर आण-खीहि उदाहरणें काढावीं. व असें झाल्यास, म्हणजे निरनिराळ्या शिक्षकांनीं अशीं उदाहरणें जमविल्यास त्यांचीं टिपणें कदाचित् पुढें मागें एकत्र करितां येतील व प्रस्तुत ग्रंथकारानें बनविलेल्या शास्त्रांत आणखीहि भर पडेल. पाठावली संबंधानें स्वतः ग्रंथकर्त्यानें जें केलेलें नाहीं तें मात्र शिक्षकानें केलें पाहिजे. म्हणजे त्यांतील प्रत्येक उदाहरणावरून कोणता नियम सिद्ध होतो हें मुलांना हुडकून काढण्यास शिकवण्याकरितां त्यांतील वैशिष्ट्य काय आहे याचें दिग्दर्शन शिक्षकानें किंचित् करून दिलें पाहिजे.

असो. प्रस्तावनेच्या रूपानें या पुस्तकासंबंधानें अधिक कांहीं लिहावयास नको. मी पूर्वी दर्शविल्याप्रमाणें, मराठी भाषेचें सूक्ष्म अवलोकन व विशेषावरून सामान्य हेरण्याच्या तर्क पद्धतीनें बनविलेलें नवें शास्त्र, या दृष्टीनीं हा ग्रंथ अपूर्व आहे. आणि रा. मुजुमदार यांनीं प्रगट केलेली उद्योगशीलता मार्मिक दृष्टि व सूक्ष्मअवलोकनशक्ति या तीनही गुणांबद्दल त्यांचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच होणार आहे.

सिमला ६।९।२९ **न. चिं. केळकर.**

# अनुक्रमणिका.







# मराठीची सजावट.

## भाग दुसरा.

## पाठ पंचविसावा.

### मराठी भाषेचा इतिहास.

२४० सामान्यतः एखाद्या व्यक्तीचा किंवा समाजाचा जो चरित्रप्रकार असतो तोच भाषेचाही असतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. गर्भावस्थेत आईच्या रक्तरसावर संगोपन करून घेऊन जन्मास यावें, बाल्यावस्थेत तिच्या दुधावर जगून अल्लड चेष्टा करून एकाक्षरी व बोबड्या अपभ्रष्ट शब्दांनीं आप्तेष्टांचें अनुकरण करावें, प्रौढ व पुष्ट झाल्यावर प्रपंचाचा व्याप करावा, वार्धक्यांत गात्रें गलित झाल्यावर कृत्रिम उपायांनीं व्यवहार चालवावे व अखेर निरुपायानें मरून जावें, ही जीवमात्राची चरित्रपरंपरा समाजाला लागू आहे, तशीच भाषेलाही लागू आहे. फरक इतकाच कीं व्यक्तीचे पिंडाचे मानानें भाषेचा पिंड अमूर्त व विशाल आहे, तिचें आयुर्मान मोठें आहे व तिचे जन्ममृत्यूही सावकाश आहेत.

या आपल्या हिंदुस्थान देशांत मनुष्य प्राण्याची वस्ती सर्वांत अगोदर झाली असावी असा अनेक विद्वानांचा तर्क आहे. तसेंच भाषेला येणारी स्थिरता व जिभेनें केलेले उच्चार हातांनीं चिन्हांच्या द्वारें मांडून दाखविण्याची युक्ति किंवा लिहिण्याची कला याहि गोष्टी इकडे फार पूर्वीपासून चालू असाव्यात असें विद्वान् लोक समजतात. ज्याला आपण महाराष्ट्र म्हणतों त्या देशांतलि अति प्राचीन मूळचे रहिवासी मांग, भिल्ल, कोळी, कैकाडी वगैरे लोक असावेत, व तें अत्यंत रानटी स्थितींत असल्यामुळें आर्य लोक दक्षिणेंत आल्यावर, त्यांच्या वसतिस्थानाला देश न म्हणतां अरण्य म्हणूं लागले असावे.

आर्यांच्या वसाहतींचा विस्तार झाल्यावर त्यांनीं मूळच्या रहिवाशांचा उच्छेद न करितां त्यांस आपल्या चातुर्वर्ण्यांत सामील करून घेतलें व यानंतर दोघांचा जो सहवास झाला, त्यातूंनच मराठी भाषेचा उगम झाला. मात्र तो कसा झाला या-विषयीं मतभेद आहेत. एका पक्षाच्या मतें, भारतीय युद्धाच्या अखेरीनंतर संस्कृत भाषा, मूळ रहिवाशांच्या संसर्गामुळें विकृत झाली; व मथुराप्रदेश ऊर्फ शूरसेन, गयाप्रदेश ऊर्फ मगध, पंजाबप्रदेश ऊर्फ पिशाच व महाराष्ट्र या प्रांतांतून शौरसेनी, मागधी, पैशाची व महाराष्ट्री या नांवांनीं परिणत झाली. या भाषांशिवाय गांवढळ लोकांची म्हणून एक वेगळी प्राकृत –पाअड –पाली नांवाची एक अपभ्रष्ट भाषा होती, व ती अगदीं खालच्या वर्गाचे लोक योजित असावेत. ( राजवाडे ). काल-परत्वें या चारी विकृत भाषा अपभ्रष्ट होऊन, शौरसेनी अपभ्रंश, मागधी अपभ्रंश, पैशाची अपभ्रंश व महाराष्ट्री अपभ्रंश अशीं चौघीचीं चार रूपें झालीं व तींच कालांतरानें शिष्टत्व पावून मूळ भाषांच्या पदवीस पोंचलीं, व त्यांच्या जनक भाषा लोपून गेल्या. या चार अपभ्रंशांपैकीं महाराष्ट्री अपभ्रंशांतून मराठी उत्पन्न झाली.

सुप्रसिद्ध इतिहास–संशोधक कै. राजवाडे यांचे मताप्रमाणें महाराष्ट्र पूर्वी अगदीं ओसाड होता. आर्य लोकांच्या बोलींतच ' वैदिक ' संस्कृत व ' महाराष्ट्री ' असे दोन भेद होते. पैकीं वैदिक संस्कृत शिष्टांच्या तोंडीं, व महाराष्ट्री अशिष्टांच्या तोंडीं राहून मूळ रहिवाशांच्या संसर्गाविनाच मराठींत परिणत झालें.

दुसऱ्या एका पक्षाच्या मतें येथील मूळच्या रहिवाशांची जी भाषा असेल, तिजबरोबर आर्य लोकांच्या भाषेचा संसर्ग होऊन एक नवी भाषा बनली व ' प्रकट ' ऊर्फ ' पाली ' हें नांव पावली, व तीच फैलावत जाऊन मराठीच्या बनावटीस तिनें मदत केली. या पक्षाच्या मतें संस्कृत ही आर्यांची मूळ भाषाच नव्हे. कारण भाषेचें नांव नेहमीं तिच्या क्षेत्रावरून पडतें, तसें ' संस्कृत ' या नांवाचें देशक्षेत्र नाहीं. अर्थात् येथील मूळ रहिवाशांच्या भाषेशीं वैदिक भाषेचा संपर्क होऊनच ' संस्कृत ' भाषा बनली व तीच विकृत होऊन ' महाराष्ट्रीय ' झाली. या महाराष्ट्रीचा अनार्यांच्या भाषेशीं संबंध येऊन हळूं हळूं मराठी बनली. हल्लींच्या मराठींत ' डोळा, हाड, बाप, दोरी, थेंब, गवत ' वगैरे किती तरी, पूर्वीपासून प्रचालित असलेले, असे शब्द आहेत कीं त्यांची कोण-त्याच भाषेपासून व्युत्पत्ति लागत नाहीं. अर्थात् ते मूळच्या देशी भाषेंतले.

असले पाहिजेत असें या पक्षाचें म्हणणें आहे. एकंदरींत या पक्षाच्या मतें मराठीचें बीज मूळचें महाराष्ट्रांतलें आहे. कोणत्याहि पक्षाचें म्हणणें खरें धरलें तरी, जुनी महाराष्ट्री बदलत जाऊन, तींत, आजच्या देशी भाषेची ओळख पटेल असें स्पष्ट रूप दुसरें व चवथें शतक यांच्या दरम्यान तयार झालें असावें असें अनुमान आहे व तोच सामान्यतः मराठीचा जन्मकाळ समजण्यास हरकत नाहीं.

कोणत्याही भाषेचा नक्की उत्पत्तिकाळ सांगणें शक्य नाहीं, तसाच मराठीचा नाहीं. अगदींच विरळ आढळणारा एखाद दुसरा शब्द किंवा रूप सोडून दिलें तर शालिवाहन शकाच्या नवव्या किंवा दहाव्या शतकापर्यंत निव्वळ मराठी असा एकही लेख आपणांस अद्याप उपलब्ध नाहीं. शके नऊशें पांचच्या सुमारास राचमल्ल गंग नांवाच्या राजाच्या कारकीर्दींत गोमतेश्वराचा एक मोठा प्रचंड सर्वोत्तुंग दगडी पुतळा उभारल्यानंतर त्याचा प्रधान चामुंडराय यानें आपलें कर्तृत्व जाहीर करण्याकरितां त्या पुतळ्याखालीं कांहीं वाक्यें कोरविलीं. त्यांतलि एक वाक्य 'श्रीचावुंडरायें करविलें' असें आहे. इतर भाषांतल्या वाक्यां बरोबरच हें वाक्य घातलें आहे, यावरून इतकें स्पष्ट होतें कीं, त्यावेळीं मराठी भाषा बोलणारे, व शिष्ट समजून ती प्रचारांत वापरणारे बरेच लोक होते. अर्थात् पांच चारशें वर्षें तरी तिला या वेळीं उत्पन्न होऊन झालीं असलीं पाहिजेत. प्रो. पोतदारांच्या मतें मराठी सातव्या शतकाच्या सुमारास अस्तित्वांत आली असावी.

यानंतर शके १०५१ मध्यें चालुक्यवंशीय सोमेश्वर राजानें रचलेला 'अभिलषितार्थ–चिंतामणि' नांवाचा ग्रंथ उपलब्ध झाला आहे. त्यांत मराठी शब्द तर जागजागीं आले आहेतच, पण एका भागांत कांहीं मराठी पद्येंही आलीं आहेत. त्यांतील एक पुढें 'मराठीचे स्थित्यंतर-दर्शक नमुने' या प्रकरणांत देण्यांत येईल. याच ग्रंथांत पुढें महाराष्ट्रांतील बायका कांडतांना ओव्या म्हणतात असा उल्लेख आहे त्यावरून ओवी हा छंद तरी त्यावेळेपासूनचा आहे असें मानावयास हरकत नाहीं. यानंतर शके १०७५–९ मधला एक, शके ११०९ मधला एक, शके ११२६ च्या सुमारचा एक ( हा मंगळवेढचा ताम्रपट म्हणून प्रसिद्ध असून, चुकीनें शके ४१० मधला समजला जात असे ), शके ११३० च्या सुमाराचा एक, शके ११९६ च्या सुमाराचा एक व शके ११९५ चा, पंढरपूरचा महत्त्वाचा व प्रसिद्ध असा एक, इतके ठळक शिलालेख सांपडले आहेत. येथपर्यंत मराठी भाषा हळूं

इळूं सिद्ध होत होती, पण या सुमारास तिला पुरते पंख फुटून तिनें अस्मानांत पहिली भरारी मारली, तीच इतकी उंच गेली कीं, तिनें एकदांच साऱ्या महाराष्ट्राचे डोळे आपणाकडे कायमचे खेंचून घेतले !

शके १२१२ सालीं, म्हणजे इसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या अखेरीस मराठी भाषेस आकल्प ललामभूत झालेली ज्ञानेश्वरांची भगवद्गीतेवरील टीका- 'ज्ञानदेवी' बाहेर पडली. तिच्या थोडा अगोदर मुकुंदराजांचा 'विवेक-सिंधु' प्रसिद्ध झाला होता. ज्ञानेश्वरांचे बरोबर त्यांची समकालीन संत मंडळी 'गोरा कुंभार, विसोबा खेचर, नामदेव, जनाबाई, परिसा भागवत' व भावंडें 'निवृत्तिनाथ, सोपान व मुक्ताबाई' यांची कविता आणि पुढें थोड्या काळांतच (महाराष्ट्र कविकृत) गद्य ग्रंथ 'पंचतंत्र' वगैरे लिखाण मराठींत प्रसिद्ध झालें. यावेळीं महाराष्ट्रांत स्वराज्य होतें. मुसलमानांचा संपर्क अद्याप दक्षिणेला झाला नव्हता. त्यामुळें जात्याच वैराग्यशील अशा या संत मंडळींना धर्मांत माजलेला बखेडा मोडण्याकडे आपल्या कवित्वाचा मुख्यत्वें उपयोग करावा असें वाटणें स्वाभाविकच होतें. ज्ञानेश्वरांची कल्पनाशक्ति अचाट, वर्णनशक्ति अलोट, व अवलोकनशक्ति अत्यंत मार्मिक असल्यामुळें त्यांच्या ज्ञानेश्वरीची छाप लोकसमूहावर व एकंदर मराठी वाङ्मयावर एकदम व कायमचीच पडली, व मराठींत कालमानानें जवळ जवळ पहिलेंच असलेलें हें काव्य गुणमानानेंही साऱ्या भारतवर्षांत, कदाचित् साऱ्या जगांतही पहिलेंच होऊन राहिलें !

ज्ञानेश्वरांची भाषाशैली म्हणजे मराठीच्या अष्टपैलुत्वाचा एक आरसा आहे. त्यांची, नवे अस्सल नत्र्धातु, नामधातु, तत्सम शब्द व समास बनविण्याची हातोटी, मराठीचा शालीन अभिमान, प्रसंगोपात् मराठी वळण देऊन संस्कृत धातूंचा उपयोग करण्याचें चातुर्य, अव्ययांचा व्यंजक उपयोग करण्याची कारवाई, व निर्दोष व्याकरण; हीं सर्व त्यांच्या भाषाप्रभुत्वास, अगाध कल्पनाशक्तीस व अभिजात तत्त्वज्ञानास साजेशींच असल्यामुळें त्यांच्या कवितेनें मराठी भाषेस एकदम वळण लावून तिचें सर्वंकषत्व एकदांच कायमचें सिद्ध केलें. त्यांच्या पूर्वीचें मराठी लिखाण 'मानभावी' ग्रंथांखेरीज फारसें उपलब्ध नाहीं, त्यामुळें ज्ञानेश्वरांनीं स्वतः बनविलेले शब्द व संप्रदाय अमुकच असें जरी आज हटकून सांगतां येणार नाहीं, तरी असले शब्द व संप्रदाय ज्ञानेश्वरांनीं पुष्कळच बनविले आहेत एवढें निश्चित मानण्यास हरकत नाहीं. त्यामुळें मराठीस मिळालेलें ज्ञाने-

श्वरी वळण त्यांच्या समकालीन वाङ्मयांत तर दिसून येतेंच, पण त्यानंतरही आतांपर्यंतच्या सर्व मराठी वाङ्मयांतून त्याची छाप कमी अधिक प्रमाणांत प्रतीत झाल्यावांचून राहत नाहीं.

[ १ ] कृदन्तांतून व क्रियापद रूपांतून 'ऐ' व 'औ' या स्वरांचा संचार, [ २ ] 'ए' व 'ओ' या स्वरांनीं अंत होणारे शब्द, [ ३ ] एकाक्षरी शब्दांचा उपयोग, [ ४ ] 'नञ्धातु' व 'नामधातु' यांचा मुबलक उपयोग, [ ५ ] परभाषीय शब्दांचा अभाव, [ ६ ] उपसर्गयुक्त धातूंचा मराठी वळणानें उपयोग, [ ७ ] प्राकृत भाषांशीं सादृश्य, [ ८ ] नामें, कृदन्तें, व क्वचित् अव्ययें यांच्या अन्तीं 'उ' कार घालणें, [ ९ ] शक्य तों तद्भव व देशज शब्दांवर निर्वाह करून संस्कृत तत्सम शब्दांना वगळण्याची प्रवृत्ति [ १० ] कर्मणि प्रयोगाकडे झुकणारा कल; वगैरे ज्ञानेश्वरी मराठीचे विशेष होत. ह्यांतले बरेच तत्कालीन मराठी कवींच्या भाषेंत व पुढेंही आढळून येतात. 'पा (पाहणें),' 'लो (छंद)', 'से (आठवण)' वगैरे ज्ञानेश्वरी शब्द, आपल्या एकाक्षरी रूपांतच जनाबाई, तुकाराम इत्यादिकांच्या कवनांतून सांपडतात. 'पांगणें,' 'झाकोळणें,' 'वेघणें,' 'वोपणें' वगैरे ज्ञानेश्वरधाटी क्रियापदांचा उपयोग तुकाराम, मुक्तेश्वर, रघुनाथपंडित इत्यादि मंडळीपासून तों मोरोपंतांपर्यंतच्या लिखाणांतून आढळतो. 'चाचरी जाणें,' 'दांत दावणें,' 'वरपडा होणें,' काकुलती येणें,' 'वांकुल्या वाणें,' 'गुतकु ( गु ) ल्या होणें,' वगैरे संप्रदाय; 'सोनियाचा दिवस,' 'रूपेचें धांवणें,' 'मूळ ( बोलविण्यास आलेला माणूस )' वगैरे वाक्प्रचार; आणि 'कानडा,' 'दास,' 'देहुडा,' 'उजरी,' 'आइती,' 'पेणें,' 'केणें,' 'हातियेर,' 'धोकडा' इत्यादि शेंकडों शब्द ज्ञानेश्वरांच्या समकालीन व मागाहून झालेल्या संतांच्या कवनांतून सांपडतात. 'मा,' 'झनें,' 'आहाच,' 'हान,' 'नावानावा' वगैरे ज्ञानेश्वरी अव्ययें थोड्या फार फरकानें अजूनही मराठींत रूढ आहेत. ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञानही उच्च दर्जाचें असल्यामुळें त्यांच्या विचारांची आणि पर्यायानें भाषेची छाप महाराष्ट्रावर पाडण्यास तेंही साधनीभूत झालें आहे.

ज्ञानेश्वरी मराठीची छाप, ज्ञानेश्वरीनंतर थोड्याच दिवसांनीं झालेला गद्यग्रंथ जो 'पंचतंत्र' त्यावरही पडलेली दिसते. 'ऐ व औ' या स्वरांचा उपयोग करून झालेलीं रूपें 'असैल,' 'म्हणौनि' इत्यादि, जरी साधारण गोष्ट म्हणून सोडून दिली, तरी 'दारवठाकार,' 'काठीकार,' 'तणखाइर' वगैरे सामासिक

शब्द निर्विवाद ज्ञानेश्वरी वळणाचे आहेत. 'आख्यात विभक्तीं'चा उपयोग पंचतंत्रांत अधिक केलेला असून वाक्येंही ज्ञानेश्वरीच्या मानानें लहान असतात हा त्याचा विशेष होय.

इसवी सनाच्या चवदाव्या शतकांत झालेल्या कविमंडळींत 'भानुदास,' 'सेना न्हावी,' आणि 'कान्होपात्रा' ही तीन मंडळी प्रमुख होत. त्यांच्या भाषेंतून ज्ञानेश्वरी मराठीची छाप तर दिसून येतेच, पण स्वातंत्र्योन्मुख मराठीचा संस्कृत व प्राकृत यांचें वळण सोडून आपलें वैशिष्ट्य उत्पन्न करण्याचा प्रयत्न दिसून येतो. या शतकांतल्या मराठींत 'ऐ' व 'औ' या स्वरांनीं प्रचुर असलेलीं रूपें कमी होऊन त्यांची जागा 'ए' व 'ओ' या स्वरांना मिळूं लागली, शब्दांच्या अन्तीं येणाऱ्या 'उ' काराचा प्रचार विरळ झाला, कर्मणि रचना कमी होऊं लागली, आणि मराठी नवे शब्द बनविण्याची परंपरा चालूं राहिली. मुसलमानांचा प्रवेश दाक्षिणेंत होऊन त्यांच्या संस्कृतीची हिंदु संस्कृतीशीं धडक सुरूं झाली, त्यांत हिंदु संस्कृतीच्या विश्वबंधुत्वाचें गमकच म्हणून कीं काय, 'भाई' सारखा एखादा ऊर्दु शब्द मराठींत डोकावूं लागला. 'सरता करणें,' 'फळा येणें,' 'निवांत राहणें' 'आळी पुरविणें,' 'सोनियाचा दिवस,' 'कामा येणें,' 'पिसें लावणें' वगैरे ज्ञानेश्वरी वाक्प्रचार आणि इतर अनेक शब्द, सेना न्हावी व भानुदास यांच्या कवितेंत आले आहेत. स्वराज्याच्या विनाशकाळीं होणारे 'धर्मलंडपणा, विषयासक्ति, कर्तृव्यविस्मृति व देहादिकांवर ममता' हे डोहाळे या वेळीं महाराष्ट्र अनुभवित असल्यामुळें या कवि मंडळींची शिकवण त्या धोरणानें वैराग्यपर झाली आहे, व या शतकांतील मराठीवर तिची छाप उमटलेली आहे.

पंधराव्या शतकांत दासोपंत व एकनाथ हे दोन मोठे कवि निर्माण होऊन मराठीच्या ग्रंथसंपत्तींत मोठीच भर पडली. दासोपंतांची भगवद्गीतेवरील टीका सव्वा लक्ष असून एकनाथांची कविताही अशीच उमाप आहे! दासोपंतांच्या किंवा एकनाथांच्या कवितेंत ज्ञानेश्वरांसारखें कल्पनाचातुर्य नसलें, तरी व्यवहारदृष्टि पुष्कळ असल्यामुळें मराठीच्या शब्दसंपत्तींत त्यांनीं पुष्कळ भर टाकली आहे. दासोपंतांनीं नुसत्या एका गाडग्याला प्रसंगोपात् पंधरा प्रतिशब्द सुचवून त्यांची याद दिली आहे! ज्ञानेश्वरी वळण व कल्पना दासोपंतांच्या व एकनाथांच्या कवितेंतून पुष्कळ आढळतात. दोघांच्याही कवितेंतून नवे

मराठी शब्द बनविण्याची प्रवृत्ति आढळते. मुसलमानी राज्य झालें असलें तरी मराठींत मुसलमानी शब्दांनीं अजून फार खोल प्रवेश केला नव्हता. शिवाय मुसलमानी संस्कृति प्रथम तरी फारच वावडी वाटण्याजोगी असल्यामुळें, या दोघांनींही आपल्या साधारण कवितेंतून मुसलमानी शब्द शक्य तों वगळले आहेत. मात्र एकनाथांनी ' खिजमत, तोफा, रयत, मुज्मुदार, साहेब, बंदगी, अर्जदास्त ' वगैरे शब्द राजकारणात्मक व प्रथमच रूढ झालेले असल्यामुळें, मासल्याकरितां म्हणून तसल्याच प्रकारचें कवन मुद्दाम करून उपयोगांत आणले आहेत. एकनाथांच्या कवितेंतून थोडा गुजराथीचा मासलाही आढळतो. मुसलमानांच्या निमित्तानें दाक्षिणेचें उत्तर हिंदुस्थानाशीं दळणवळण वाढल्यामुळें ' नानक, दरवेशी, हपशी, मुल्ला, हकीम ' वगैरे महाराष्ट्रांत चमकूं लागलेल्या व्यक्तींचा उल्लेख एकनाथांच्या कवितेंत आढळतो. या शतकांतल्या मराठींत आख्यातांचा उपयोग पुष्कळ वाढला आणि नवे शब्द व वाक्प्रचार यांची भर पडली. दासोपंत व एकनाथ या दोघांच्यांही भाषेंत अशुद्ध भाषा, व ' भौपत्य, ' ' मनामाजूनि ' असले अपप्रयोगही क्वचित् सांपडतात. ज्ञानेश्वरी भाषेंतील उकार, कर्मणि वळण, ' ऐ, औ ' चें प्राचुर्य आणि प्राकृताशीं सादृश्य या गोष्टी एकनाथी भाषेंत कमी होऊन, मुसलमानी आक्रमणामुळें कुचंबणा झाल्यानें असो, किंवा त्या भाषेच्या मर्दानी थाटाला तोडीस तोड देण्याच्या अहमहमिकेनें असो, एकनाथ–दासोपंतांनीं संस्कृत तत्सम शब्दांकडे ओढा दाखविला आहे. दोघांच्याहि शिकवणीचा झोंक वैराग्यपर असून विपन्न महाराष्ट्राला आपल्या मुक्ततेसाठीं परमेश्वरास आळविण्यास जणुं दोघांनीं सुचविलें आहे.

खुद्द एकनाथ–दासोपंतांनीं मुसलमानी शब्दांना आपल्या भाषेंत फारसा थारा दिला नाहीं खरा, पण राजवटीच मुसलमानी झाल्यामुळें तेराव्या शतकापासून मुसलमानी शब्दांनीं मराठी भाषेवर जें भयंकर आक्रमण केलें तें पुढें पेशवाईचे अखेरपर्यंत कमीअधिक टिकून राहिलें. सरकारदरबारांतले व राजकारणांतले शब्द तर सररास फारशीमय झालेच पण सुखवस्तु लोकांच्या ' मेजवान्यांत, ' ' आतषबाजी, मेवामिठाई, व गुलाबी अत्तर ' इत्यादींचा प्रवेश होऊन लग्नकार्यादि धार्मिक प्रसंगांतही संबळ पांवा वगैरेंना अर्धचंद्र मिळून ' ढोल, ' ' ताशे, ' ' मर्फे, ' इत्यादिकांना त्यांच्या जागीं योजण्यांत आलें. विलासोपयोगी कलावंतांना हटकून बाटवावयाचें असें मुसलमानी राज्यकर्त्यांचें धोरण असल्यामुळें,

'वैद्यक, संगीत, चित्रकला' इत्यादि ललितकलांतून व इतरही बहुतेक व्यवहारांतून कांहीं स्वाभाविक प्रवृत्तीनें, कांहीं अनुकरणेच्छेनें तर कांहीं जबरदस्तीनें मिळून हजारों पर्शियन व अरबी शब्द शिरले!! नाहीं म्हणावयास स्त्रियांच्या घरगुती भाषेंत, धर्मग्रंथांत, कथापुराण व गोंधळ इत्यादि बाबतींत व दूरदूरच्या खेड्या-पाड्यांतील व्यवहारांत मुसलमानी शब्दांनीं फारसें आक्रमण केलें नाहीं. मुसलमानी आक्रमणाचा मासला म्हणून शके १५११ मधील पुढें दिलेलें पत्र वाचण्यासारखें आहे.

" अज रख्तखाने राजश्री बाबाजी राजे भोसले दामदौलतहू

बिजानेबु कारकुनानी हाल व इस्तक बाल व मोकद्मानी कसबे पेडगौऊ पा। पाडेपेडगौऊ बिदानद् सु॥ समान तिसैन व तिसामया द्रवज इनामबदल धर्मादाऊ बे॥

रामेस्वरभट बिन नारायणभट चिंतामनभिट बिन बाळंभट

सेकिन आरबी मुद्गल हर्ची जमीन द्र सवाद् प्रज रामजी चिखलठाणा गज-शरायनी चावर सव्वा एद्मो नख्तयाती व महसुलु कुलबाब कुलकानू दिधले असे दुमाला कीजे अवलादी अफलादी चालो दीजे द्र हरसाल खुर्द खताचा उजूर न कीजे तुम्ही तालीक घेउनु असेली खुर्दखत इनामदारमजकुरापासी दीजे मोर्तबु

तेरीख २५ माहे जमादिलोवलु "

हा उतारा मराठी कां म्हणावा हें सांगणें अवघड आहे!!

स्त्रियांच्या घरगुती भाषेंत मुसलमानी शब्दांनीं प्रवेश केला नाहीं असें वर सांगितलें आहे त्याचें प्रत्यंतर पाहिजे असल्यास स्त्रियांच्या तोंडीं असलेल्या 'कहाण्या' हें आहे. या कहाणीचा उल्लेख रामदासांनीं दासबोधांत केला आहे. मुक्ताबाईनीं एका अभंगांत 'कहाणी ऐकुनी शहाणी झाले' असें म्हणून या कहाण्यांच्या बोधप्रदत्वाचा गौरव केला आहे. यावरून, आणि त्यांच्या भाषेवरून या कहाण्या दहाव्या शतकाच्या पुढें व तेराव्या शतकाचे आधीं झाल्या असाव्या असें दिसतें. तथापि इतक्या जुन्या असूनही मुसलमानी आक्रमणाच्या ऐन अमदानीं-तून त्या आतांपर्यंत सुरक्षित निभावून आल्या आहेत. दरम्यानच्या काळांत त्यांच्या संख्येंत कदाचित् भरही पडली असेल, पण त्यांनीं यवनी शब्दांचा विटाळ आपणांस होऊं दिला नाहीं ही अभिमानाची गोष्ट होय!

सोळाव्या शतकांत 'तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर, विठ्ठल बीडकर, वामन पंडित, आनंदतनय, उद्धव चिद्घन' वगैरे लहान मोठे तिसांहून अधिक कवि निर्माण झाले, व त्यांनीं मराठीच्या संपत्तींत अमूल्य भर टाकली. पूर्वीच्या पिढ्यांच्या शिकवणीला व पुण्याईला फळ येऊन शिवाजीमहाराजांनीं स्वातंत्र्याचा झेंडा उभारला. मराठी भाषेचें एकदेशीयत्व जाऊन नाना प्रकारचीं वृत्तें, सृष्टिवर्णनें, रसाळ आख्यानें, कालानुरूप जोरदार प्रवृत्तिपर उपदेश वगैरे प्रकार मराठींत दिसूं लागले. संस्कृतकडे मराठीचा ओढा झुकूं लागला, व प्राकृत वळण त्या मानानें कमी झालें. मुसलमानी शब्द राजसत्तेच्या जोरावर रूढ झाले असल्यामुळें त्यांना आपलेसे करून घेऊन त्यांचा सररास उपयोग करण्यांत येऊं लागला. तुकारामबोवांची भाषा बरीचशी ज्ञानेश्वरी वळणावर राहिली; पण तिनें पेहेराव मात्र नवा घेतला. त्यांची साधी व सरळ भाषा, भावनांचा जिव्हाळा आणि निर्भीड शब्दयोजना यांमुळें त्यांचें कवन अत्यंत परिणामकारक झालें आहे. मुक्तेश्वर, विठ्ठल बीडकर, वामन पंडित, आनंदतनय व उद्धव चिद्घन यांनीं संस्कृत वळण उचलून, तरतऱ्हेचीं सृष्टिवर्णनें, उपाख्यानें, वृत्तें, शब्दालंकार, व अर्थालंकार मराठींत आणले आहेत. मुक्तेश्वरांची प्रतिभाशक्ति उत्कृष्ट असल्यामुळें त्यांच्या भाषेंत एक प्रकारचा जिवंतपणा आहे. ध्वनिसूचक शब्दयोजना व प्रसंगाचें हुबेहुब चित्र उठविण्याची हातोटी वामनास चांगली साधलेली आहे, पण तो पंडित असूनही त्याच्या भाषेंत 'शब्दांची ओढाताण, विषम योजना व रूढीविरुद्ध प्रयोग' फार आढळतात. रामदासांचा बाणा कांहीं वेगळाच आहे. जोरदार व ओजस्वी शब्दयोजना हा त्यांच्या भाषेचा विशेष असून तेवढें साधल्यावर त्यांनीं भाषाशुद्धीकडे विशेष लक्ष्य दिलेलें नाहीं. या शतकांतील मराठीवर ज्ञानेश्वरी मराठीची छाप, शब्द व वाक्प्रचार एवढ्यांपुरतीच सामान्यतः राहून, मुसलमानींतील मर्दानी शब्द व संस्कृत साहित्यांतील मनोरंजक प्रकार यांचा शिरकाव मराठींत बराच झाला, व त्यायोगानें भाषेला एक नवाच डौल आला.

सोळाव्या शतकांत आलेल्या कवींच्या पिकाला सतराव्या व अठराव्या शतकांतही उत्तरोत्तर बहारच येत गेला. या शतकांत श्रीधर, महीपती, रघुनाथ पंडित, रामजोशी, अमृतराय, अनंतफंदी, शिवदिन केसरी, मोरोपंत पराडकर वगैरे पंचविसांहून अधिक कविमंडळी मराठी वाङ्मयांत आपली भर टाकून राहिली. स्वराज्य झालें होतें, पण भाषेवर बसलेली मुसलमानी छाप खूपच जाणवत

होती. शिवाजीनें ' राज्यव्यवहारकोश ' तयार करवून मुसलमानी शब्दांना आळा घालण्याचा प्रयत्न केला होता, पण तो चांगलासा सफळ न होऊन, राजकारण व त्याचीं अंगें यांतही मुसलमानी शब्दांचें आक्रमण बहुतेक कायमच राहिलें. शिवाजीच्या अंताबरोबरच त्याच्या राष्ट्रिय शिक्षणासंबंधींच्या कल्पकतेची वाढ खुंटली आणि भाषेचा व्याप वाढण्याजोगें कसलेंच क्षेत्र जोपासलें न गेल्यामुळें सामान्यतः कवितेच्या संख्येंत व सौंदर्यांत भर पडूनच काय होईल तेवढा लाभ भाषेला झाला. शिवाय बहुतेक कवींची शिकवण परमार्थपरच रहात गेल्यामुळें तपश्चर्येचें फळ हातांत पडूनही महाराष्ट्र देश व त्याच्याबरोबरच भाषाही तपस्विनीच राहिली. श्रीधर-महीपतींची रसाळ व साधी भाषा, रघुनाथपंडिताच्या प्रतिभेचे उत्कृष्ट विलास, रामजोशी, अमृतराय व अनंतफंदी यांच्या मनोहर लावण्या, पद्यें, कटाव वगैरेंतून स्वराज्याचें समाधान जावणतें, पण उन्माद जाणवत नाहीं. पेशवाईचे अखेरीस मोरोपंत उदयास आले व असलेल्या परिस्थितींत त्यांनीं मायभाषेची बिनमोल सेवा करून दाखविली. त्यांची एकट्यांचीच ग्रथसंपत्ति मराठी भाषेला अभिमान वाटावा इतकी मोठी आहे. मोरोपंतांचें भाषाप्रभुत्व, व्याकरणशुद्ध रचना, प्रौढ शब्दयोजना व अकुंठ वर्णनशैली हीं सर्व नमुनेदार असल्यामुळें त्यांनीं मराठीच्या घटनेस मोठाच हातभार लावला, व भाषेवर आपली जोरदार छाप पाडून ठेवली. या शतकांतल्या मराठींत ' आख्यातां ' चा सरास उपयोग सुरूं झाला, नवे काळ उत्पन्न झाले, वाक्प्रचार वाढले, म्हणींचा संग्रह झाला, व मुसलमानी ऐट, व संस्कृतांतील साहित्याचे शृंगारसाज मराठींत उतरून भाषा एकंदरींत खूप संपन्न व डौलदार झाली.

ज्ञानेश्वरांच्या थोडा अगोदर ' श्रीचक्रधर ' यांनीं काढलेला जो ' महानुभाव ' पंथ, त्यांत चक्रधरांच्या शिष्यांनीं ' श्रीचक्रधर चरित्र ' नांवाचा एक गद्य ग्रंथ लिहिला आहे, तो व त्या नंतरचें महानुभावी लिखाण मराठी गद्यांत सामील केलें पाहिजे. श्रीचक्रधर चरित्र हा ग्रंथ ' महिंधर ' नांवाच्या एका पंडितानें शके ११८५ ते ११९४ च्या दरम्यान केव्हां तरी लिहिला आहे. याच ग्रंथाच्या आधारानें ' केशवराज व्यास ' नांवाच्या एका महानुभावानें ' सूत्रपाठ ' नांवाचा एक गद्य ग्रंथ लिहिला आहे. त्यानंतरही महानुभावांचे अनेक ग्रंथ गद्यांत झाले असून, मराठीचें पहिलें व्याकरण लिहिण्याचा व कोश रचण्याचा अग्रमान

महानुभाव ग्रंथकारांसच आहे. भास्कर कविकृत ' शिशुपाल वध ' हें उत्कृष्ट काव्य शके ११९५ त झालें आहे. महानुभावांनीं आपले ग्रंथ ' सकळ ' व ' सुंदरी ' वगैरे बारा सांकेतिक लिपींत लिहून ठेवल्यामुळें ते दुर्बोध झाले होते. पण इतिहास संशोधक कै. राजवाड्यांनीं ते संकेत ओळखून काढून महानुभावी लिखाण सुबोध केलें. महानुभावी लिखाणांतलि मराठी साधारणतः पंचतंत्रासारखेंच सोपें, लहान वाक्यांचें व जुन्या वळणाचें आहे.

ज्ञानेश्वरकालीन ' पंचतंत्रा ' नंतर सतराव्या शतकाच्या आरंभापर्यंत मराठींत गद्यग्रंथ झालेला उपलब्ध नाहीं ही ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. मध्यंतरींच्या काळांतला गद्य म्हणण्याजोगा जो थोडासा पत्रव्यवहार सांपडला आहे त्यामध्यें ' बहुतेक सर्व फारशी शब्द, प्रत्यय तेवढे मराठी ' आहेत. सतराव्या शतकाच्या आरंभास मात्र गोंवें वगैरे कोंकण प्रांतांत स्थायिक झालेल्या युरोपियन मिशनरींचे मराठी भाषेशीं संबंध येऊं लागले, व त्यांचें पहिलेंच फळ म्हणजे सन १६१६ त छापलेलें स्टीफनचें ख्रिस्तपुराण हें होय. हें गद्य अनेक दृष्टींनीं महत्वाचें आहे. ' एक तर तें पाश्चात्यगद्याच्या वळणावर आहे. शिवाय त्यांतलि पद्यांत ज्या मानानें संस्कृत शब्द आढळतात त्या मानानें गद्यांत कमी आढळतात. गद्याची भाषा जुन्या मराठीच्या वळणावर आहे. ' ऐ ' व ' औ ' या स्वरांनीं युक्त रूपें, शब्दांच्या अखेरचा उकार, यांवरून कवीनें जुन्या मराठीचा चांगला अभ्यास केलेला दिसतो. आश्चर्याची गोष्ट म्हणजे या ग्रंथांत मुसलमानी शब्द बहुतेक आढळत नाहींत. नाहीं म्हणावयास ' व ' हें पर्शियन अव्यय मात्र आलेलें सांपडतें. ' याचें कारण कदाचित् कोंकणी मराठींत अद्यापि मुसलमानी शब्दांनीं आक्रमण केलें नव्हतें हें होय.

' बखरी ' हें जें गद्य वाङ्मयाचें इतिहासात्मक अंग त्याला शिवाजीच्या वेळेपासून सुरवात झाली. शिवाजीच्या पांच, त्यानंतर शाहूच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंतच्या अनेक, व पुढें पानिपतच्या लढाईवर दोन, अशा अनेक बखरी सोळाव्या व सतराव्या शतकांत झाल्या. या दोन शतकांतल्या बखरी व किरकोळ पत्रें यांची छाननी केली तर, बखरींची मराठी भाषा चांगली तर मजकूर भाविक अतएव अविश्वसनीय; व पत्रांतील भाषा सुमार पण मजकूर विश्वसनीय असतो असें दिसून येईल. ह्या बखरी अतिशयोक्ति-प्रचुर असल्या तरी त्या लिहिणाऱ्या ' चिटणीस; ' ' सभासद '

वगैरे प्रभु व देशस्थ मंडळींचें महाराष्ट्र भाषेवर ऋण मोठें आहे हें कबूल केलें पाहिजे. शिवाजीच्या अगोदर देखील विजयनगरच्या रामदेवरायाच्या कांहीं बखरी व 'बिंबस्थान'ची बखर, अशा कांहीं बखरी लिहिल्या गेल्या होत्या. त्याचप्रमाणें 'कामशास्त्र, मंत्रशास्त्र व रसायन क्रिया' इत्यादि विषयांवर कांहीं लिखाणें झालीं होतीं, पण तीं विशेष महत्त्वाचीं नाहींत.

पेशवे मंडळी, व त्यांचे सरदार हे स्वतः कारकून म्हणजे कुशल पत्रलेखक तर होतेच, पण 'राधाबाई, गोपिकाबाई, व आनंदीबाई' या पेशव्यांच्या घराण्यांतील स्त्रिया; आणि 'अहल्याबाई' होळकर, शिंदे, आंग्रे व पटवर्धन घराण्यांतील बायका; त्याचप्रमाणें त्रिंबकराव पेठ्यांची पत्नी इत्यादि स्त्रीवर्गाचीं पत्रें हे चांगल्या मराठीचे नमुने आहेत. तुकारामबुवांनीं व इतर संतमंडळींनीं जोपासलेली कीर्तन संस्था पेशवाईत भरभराट पावली, व तिनेंही जुन्या कवींची आणि मोरोपंतादि नव्या कवींची कविता यांचा पेंड, थेट स्त्रीवर्गापर्यंत आणि खालच्या जातींपर्यंत गद्याच्या द्वारें पोंचवून मराठीच्या वाढीस हातभर लावला. त्याचप्रमाणें पुराणिक मंडळीनींही पण मराठीच्या घटनेस चांगलें साह्य केलें आहे.

मुसलमानी राजवटींत पर्शियन व उर्दु शब्दांनीं मराठीवर केलेलें आक्रमण पेशवाईतहि तसेंच टिकलें किंबहुना वाढतच राहिलें ही आश्चर्याची गोष्ट तर खरीच पण पेशवाईचे अखेरनिंतर इंग्रेजी राजवटींत मराठीस चलन मिळालें व मुसलमानी आक्रमणाचा पूर बराच ओसरला हें त्याहून आश्चर्य आहे! आतां शिल्लक राहिलेली मुसलमानी भाषेची छाप मराठीनें आत्मसात् केलेली अतएव तिला उपकारकच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'इमारत, सराई, दरवाजा, दालन, हौद, महाल, दौत, ओसरी, बंदूक, संदूक, आरसा, देवळी, कप्पा, घुमट, फरशी, नक्त, दप्तर, हलका, कुलूप, किल्ली, छप्पर, तालीम, कारंजें, बुरूज, गच्ची, जमीन' इत्यादि शेंकडों शब्द; 'अलबत, बस, बेषक, खूप, वाहवा, देखील, ते, बरोबर, नजीक, बद्दल, बिलकूल, बेहेत्तर, जलद, यंदां, पेस्तर, गुदस्ता, व, वापस,' इत्यादि बरींच अव्ययें; आणि 'केला गेला', मारिला जाईल,' 'खालीं (रिकामा) करणें' इत्यादि कांहीं वाक्प्रचार; हे आतां मुसलमानी संपर्काचे अवशेष भाषेंत आपुलकीनें राहिले असून तिला शोभादायकच आहेत.

कानडी भाषेचाही कांहीं संस्कार मराठीला झाला आहे. शके बाराशेंच्या पूर्वींचा मराठीचा इतिहास जरी विशेष मिळत नाहीं, तरी कानडीचा मिळतो.

त्यावरून कानडी भाषा ख्रिस्ती शकाच्या आरंभाच्या सुमारास उत्पन्न झाली असून, तिची उत्तरोत्तर वाढ होत जाऊन बाराव्या शतकांतल्या देवगिरीच्या यादव घराण्यांतील 'महादेव' राजाच्या कारकीर्दीपर्यंत तरी तिचा विस्तार 'आ कावेरीयिंद् आ गोदावरीवरेगम्' ( कावेरीपासून गोदावरीपर्यंत ) वाढला होता. पण बाराव्या शतकानंतर ज्ञानेश्वरांनीं मराठीला जें अद्भुत चलन दिलें त्यामुळें व पुढच्या मुसलमानी राजशाहींत बसलेल्या धक्क्यामुळें कानडी भाषा दक्षिणेकडे हटली व तिची सीमा मर्यादित झाली. दरम्यानच्या काळांत कानडी संसर्ग मराठीस बराच झाला. विशेषेंकरून पटवर्धनी संस्थानें कानडीच्या सरहद्दीवर असल्यानें त्यांच्यांतील मराठीस तो विशेष जाणवला. पण तो देखील मर्यादित स्वरूपाचा असून अपाय करण्याइतका प्रबळ नाहीं. "अण्णा, नाना, ताई, अक्का" इत्यादि नात्यांचे वाचक शब्द; " बोट, पोट, मांडी, गळा, बगल, झिपरी " इत्यादि अवयव-सूचक शब्द; " वर, खालीं, बिगिबिगि, सकट " इत्यादि थोडीं अव्ययें; व " पायांत जोडा, अंगांत अंगरखा, तोंडांत मारणें, पाठीस लागणें, वरलीकडेस ( उगवतीस )" इत्यादि कांहीं वाक्प्रचारांच्या लकबा; व पांचचारशें शब्द हाच काय तो कानडीच्या संसर्गाचा अवशेष आतां मराठींत शिल्लक राहिला आहे.

अठराव्या शतकाचे अखेरीनंतर लवकरच पेशवाई बुडाली व मराठी भाषेचा राजाश्रय नाहींसा झाला. परंतु मराठीचें पद्य अंग राजाश्रयापेक्षां पूर्व संस्कारानेंच विशेष प्रेरित असल्यामुळें एकोणिसाव्या शतकांतही मराठी कवींची परंपरा चालूंच राहिली. या शतकांत 'विठोबा अण्णा दप्तरदार,' 'ज्योतिपंत,' वगैरे चांगले कवि, आणि पेशवाईच्या अखेरच्या शाहिरी तालमींतले 'प्रभाकर, दादावीर, बचुफंदी, महादु सुतार, होनाजी बाळा, मल्हारी, धोंडीबापू, सगनभाऊ, परशुराम, अप्पा यशवंत' इत्यादि शाहीर उदयास येऊन त्यांनीं उत्कृष्ट पद्यें, लावण्या व पोवाडे यांची भाषेंत भर टाकली. या शाहीर मंडळींनीं मुसलमानी शब्दांतील गोड जनानी शब्द लावण्यांच्या बनावटीस व कडक मर्दानी शब्द पोवाड्यांच्या सजावटीस योजून मराठीला जें एक सोपें, ऐटबाज, व भावनोत्पादक वळण लावून दिलें त्याचा पडसाद, 'किर्लोस्कर, देवल, केशवसुत, गडकरी, टिळक, पटवर्धन, कानेटकर, यशवंत' इत्यादि अठराव्या व एकोणिसाव्या शतकांतलि संधिकालच्या कवींच्या कवितेंतून स्पष्ट स्पष्ट उमटला आहे. इंग्रेजी संस्कृतीची छाप उत्तरोत्तर पडत गेल्यामुळें व इंग्रेजी

भाषेच्या संसर्गानें एक प्रकारची चिकित्सक दृष्टि उत्पन्न झाल्यानें मराठी कवितेचें जुनें स्वरूप पालटून तिनें बहुतांशीं नवें रूप धारण केलें. या कवींच्या भाषेंत संस्कृत शब्दांची प्रवृत्ति कमी होऊन पर्शियन व मराठी शब्दांकडे विशेष ओढा दिसून येतो. कवितेचें क्षेत्र वाढून, वेगवेगळ्या विषयांवर पद्यरचना केलेली दिसते व त्यांतून इंग्रेजी काव्यपद्धतीच्या वेगवेगळ्या प्रकारांचें अनुकरण केलेलें आढळतें.

इंग्रेजी अमलांत मराठी गद्यास चलन मिळालें ही संतोषाची गोष्ट आहे. जांभेकर, छत्रे, दादोबा, मंडलीक, माडगांवकर, लेले शास्त्रीबुवा इत्यादि ग्रंथकार इंग्रेजी राजवटीच्या पहिल्याच पिढींत उदयास येऊन, त्यांनीं व्याकरण, गणित, इतिहास, भूगोल, ' वगैरे विषयांवर गद्य ग्रंथ केले. या मंडळींची मराठी भाषा मुंबई वळणाची, म्हणजे साधी, सरळ वाक्यरचना, आटोपशीर वाक्यमर्यादा आणि व्यावहारिक शब्द यांनीं युक्त आहे. मुंबईचा प्रतिध्वनि लवकरच पुण्यास उमटला. पेशवाईत विद्यावृद्धीसाठीं श्रावणमासीं दक्षिणा वांटीत असत ती इंग्रेज सरकारनें निराळी काढून विद्यावृद्धीकडे खर्च करण्याचा उपक्रम केला. पुणेरी वळणाचे पहिले पहिले ग्रंथकार म्हणजे ' कृष्णशास्त्री चिपळूणकर ( १८२४–१८७८ ), कृष्णशास्त्री राजवाडे, तळेकर, हरि केशवजी, माधवराव रानडे, गुंजीकर, पंडित, दादोबा पांडुरंग, छत्रे, कृष्णशास्त्री गोडबोले, विनायक कोंडदेव ओक, परशुरामपंत गोडबोले ' इत्यादि मंडळी होत. यांचें मराठी प्रायः प्रौढ व संस्कृत वळणाचें आहे. पुण्याच्या पाठशाळेंत असलेले दोघे इंग्रेज़ गृहस्थ ' मोलस्वर्थ व क्यांडी ' हे मराठीचे अभिमानी असल्यामुळें त्यांनीं मराठी ग्रंथोत्तेजनास चांगली सहानुभूति दाखविली. क्यांडी यांनीं देशी पंडितांच्या साह्यानें मराठीचीं क्रमिक पुस्तकें तयार केलीं, व मोल्सवर्थ यांनीं मोठ्या परिश्रमानें मराठीचा कोश तयार करवून भाषेवर मोठें ऋण करून ठेवलें.

याच सुमारास छापखाने, वर्तमानपत्रें व मासिकें हीं सुरू झालीं व मुंबईच्या आणि पुण्याच्या मराठीचें दळणवळण वाढून मराठी गद्याचें एक नवीनच रम्य स्वरूप तयार झालें. मात्र पहिल्या पिढींतले बहुतेक लेखक पाश्चात्य संस्कृतीच्या छापेनें दिपलेले असल्यामुळें त्यांचें—विशेषतः त्यांतले एक विद्वान् ' लोकहितवादी ' ( १८२३–९२ ) यांचें लिखाण एकांगी निपजूं लागलें. पुण्यास स्थापन झालेल्या ' वक्तृत्वोत्तेजक ' सभेनें घडवून आणलेल्या व्याख्यानांनींही

भाषेच्या जोपासनेस चांगली मदत केली. या काळचें उत्तम मराठी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें होय. ' अरबी भाषेंतील सुरस गोष्टी, ' ' साक्रेटिसाचें चरित्र, ' रासेलस, ' अनेक विद्या–मूलसंग्रह ' व ' शालापत्रकां ' तील लेख, हें लिखाण इंग्रेजीवरून व ' साकीबद्ध मेघदूत ' हें त्यांनीं संस्कृतवरून भाषांतरित केलें आहे.

कृष्णशास्त्री ' दक्षिणा प्राइझ कमिटी ' चे चिटणीस असल्यामुळें त्यांच्या उत्तेजनानें मराठींत प्रसिद्ध संस्कृत नाटकांचीं भाषांतरें झालीं. याच सुमारास ग्रांट डफूचा मराठी इतिहास भाषांतर रूपानें बाहेर पडला. लोकहितवादींचें लिखाण प्रायः निबंधात्मक असे. त्यांनीं कांहीं भाषांतरेंही केलीं आहत.

इंग्रेजी संस्कृतीच्या पहिल्या धडाक्यानें मराठी भाषेंत इंग्रेजी शब्द, इंग्रेजी विचार, व इंग्रेजी वळण शिरून जो थोडा अपाय झाला त्या मानानें फायदाही पुष्कळच झाला. पाश्चात्य इतिहासाच्या वाचनानें व ज्ञानाच्या संसर्गानें स्वाभिमानाची ज्योत महाराष्ट्रांत पेटली, व तिचा प्रभाव भाषेंतही दिसूं लागला. पहिल्या लोंढ्यानें अंध झालेली दृष्टि लवकरच निवळली व इंग्रेजी संस्कृतींतील चांगलें तेवढेंच वेंचून घेण्याकडे प्रवृत्ति उत्पन्न झाली. दुसऱ्या पिढींतले गद्यलेखक प्रायः या धोरणानें लिहीत गेले. विष्णुशास्त्री चिपळूणकर ( १८५०–१८८२ ) हे या पिढींतले मुख्य लेखक होत. यांचें मराठी प्रौढ, जोरकस, अभिमानी, विनोदी व खोंचदार असे. यांनीं आपल्या लिखाणानें मराठीच्या इतिहासांत मोठीच विचार-क्रान्ति घडवून आणली.

या पिढींत व नंतरच्या पिढींत ' बाळ गंगाधर टिळक ( १८५६–१९२० ), गोपाळ गणेश आगरकर ( १८५६–१८९५ ), श्रीपाद कृष्ण कोल्हटकर( १८७१ ) विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ( १८६४–१९२६ ), चिंतामण विनायक वैद्य ( १८६१ ), हरि नारायण आपटे ( १८६४–१९१९ ), नरसिंह चिंतामण केळकर ( १८७२ ), शिवराम महादेव परांजपे ( १८६४ ), महादेव शिवराम गोळे ( १८५८–१९०७ ), वासुदेव गोविंद आपटे ( १८७२ ), विनायक लक्ष्मण भावे ( १८७२–१९२७ ), दत्तो वामन पोतदार, वासुदेवशास्त्री खरे, वामन मल्हार जोशी, श्रीकृष्ण नीळकंठ चाफेकर, लक्ष्मण गणेश लेले, पांगारकर, इत्यादि लहान मोठे अनेक ग्रंथकार होऊन त्यांनीं मराठीच्या वैभवांत चांगलीच भर टाकली आहे.

आजच्या मराठींत शब्दसंख्या जवळ जवळ सव्वा लक्ष असून त्यांत, 'कानडी, तेलगू, तामीळ, हिंदी, गुजराथी, बंगाली, अरबी, फारशी, उर्दू, तुर्की, फ्रेंच, पोर्तु-

गीज, स्पॅनिश, इंग्रेजी, व इटालियन¹ इतक्या परभाषांतून कमीअधिक प्रमाणांत शब्द आले आहेत. आजच्या मराठींतील लिखाणाचें सामान्यतः शतमान पुढील प्रमाणें निघेल.

| भाषा | शंभर मराठी भाषेतल्या शब्दांत | सांपडणारे शब्द. |
|---|---|---|
| शुद्ध संस्कृत | १०० | १४ |
| विकृत संस्कृतें | ,, | १८ |
| प्राकृतिक | ,, | २० |
| देशज व प्रादेशिक | ,, | १६ |
| कानडी | ,, | २ |
| तामीळ व तेलगू | ,, | जवळजवळ ० |
| हिंदी | ,, | १/२ |
| गुजराथी | ,, | १/२ |
| अरबी, परशियन, उर्दु, व तुर्की | ,, | १७ |
| इंग्रजी, पोर्तुगीज इ०पाश्चात्य भाषा | ,, | ३ |
| बेपत्ता शब्द | ,, | ९ |
| | १०० | १०० |

आजची मराठीची स्थिति एकंदरींत समाधानकारक आहे. सर्व व्यवहार चालविण्याइतकी संपन्नता भाषेच्या ठिकाणीं आली असून तिची व्यंजकता व परिणामकारिता हीं दोनी अंगें पुरेशीं प्रभावी झालीं आहेत. तिचा व्यापही दिवसेंदिवस वाढत आहे. आतां विषम परिस्थितीमुळें शास्त्रीय अंगानें तिची वाढ अद्याप व्हावी तशी झाली नाहीं हें खरें, पण अनुकूल परिस्थितींत ती होऊं लागल्यास संस्कृत भाषेच्या व इतर भाषांच्या साह्यानें पारिभाषिक शब्द बनविण्याची सोय तिजपाशीं केव्हांही आहेच. सामान्यतः तिचें आजचें क्षेत्र ‘ साहित्य, काव्य, इतिहास, नाटकें, कादंबऱ्या, मनोरंजक गोष्टी, प्रचलित राजकारण ’ इत्यादि विषयांपुरतें मर्यादित असून “ भौतिक ” शास्त्रांच्या क्षेत्रांत तिचा व्हावा तसा संचार झाला नाहीं हें खरें, पण तो परिस्थितीचा दोष असल्यामुळें परिस्थितीबरोबर पालटेल अशी आशा करण्यास जागा आहे.

---

# पाठ सव्विसावा.



## मराठीचे मासले.

३४१ सहाव्या शतकापासून आतांपर्यंत मराठीचीं जीं स्थित्यंतरें झालीं त्यांचा त्रोटक इतिहास मागील प्रकरणांत दिला आहे. या प्रकरणांत त्यांची प्रत्यक्ष कल्पना व्हावी म्हणून दरम्यानच्या काळांतील उपलब्ध झालेल्या लिखाणांतून मराठीचे कांहीं नमुने पुढें देतों.

१. शके ६५८ मधील चिकुर्डे येथील ताम्रपट.

" जनमेजय चक्रवर्ति हस्तिनापुरी सुखसंकथा विनोदी राज्यं करित दक्षिण दिसावरे दिग्विजयात्री विजयं करवुन करहाट कंबलेश्वर देवासंनिधी कटकमेलिकार करवुतन पित्रुसत्रुनिमिती सर्पयाग करित अहेंद्रभक्षक स्वाहा..."

२. शके १०५१ मधील चालुक्य राजा सोमेश्वर यानें रचिलेल्या मानसोल्लास अथवा अभिलषितार्थचिंतामणि या ग्रंथांतील पद्यरचनेचा नमुना.

**" जेणें रसातळ उणु मत्स्यरूपें वेद आणियले, मनुशिवक वाणियेले ॥**
**तो संसार सायरतारण मोह (हं) ता रावो नारायणू ॥ ४३ ॥ "**

३. शके ११०९ मधील परळ येथलि शिलालेख, यांत कोंकणच्या अपरादित्य नांवाच्या एका राजानें श्रीवैद्यनाथ देवास साष्टी माहुलीजवळील कांहीं उत्पन्न दिल्याचा उल्लेख आहे.

**"अथ तु जो कोणुहु वि ए शासन लोपी तेया श्रीवैद्यनाथ**
**देवाची भाल सकुटुंबी आपडे ॥ "**

४. शके ११२८ मधला पाटणचा महत्वाचा शिलालेख.

" इयां पाटणीं जें केर्णे उघटे तेहाचा असिं आउं जो राउला होता ग्राहकापासी तो मढा दीन्हला । ब्राम्हणां जें विकतेया पासीं ब्रह्मोत्तर तें ब्राम्हणीं दिन्हलें ॥ " ( या पाटणांत जो माल विकावयास येतो त्यावरील राजानें घ्याव-

याचा जो कर तो मठास दिला. माल विकणारांपासून मिळणारें ब्रह्मोत्तर, तेंही ब्राह्मणांनीं मठाला दिलें ).

५. शके ११८५–९४ च्या दरम्यान महानुभाव पंथांतिल व्यास ऊर्फ महिंधरभट याच्या गद्यरचनेचा नमुना.

आवैसीः गोसावियातें पुसिलेंः जीजीः हें देह सांडिलेयांः अनंतरें हा जीवू कोण देहे पावेः आनः कैसें सांडीः सर्वज्ञें भणितलेः बाई लिंगदेहेंसी निगेः "

६. इ. सनाच्या तेराव्या शतकांतील 'पंचतंत्रां' तला उतारा.

" पिंगलकु पुसे दमनकु सांघे, म्हणे कोणे एके नगरीं यज्ञदत्त नामें ब्राह्मणु असे. तो दुर्बलु. तयातें ब्राम्हणीनें म्हणितलें तुम्ही कांहीं उदीम न करा....... म्हणोनि उदकारणें हिंडतां तंव एकु अड देखिला."

७. शके १२१२ मधील ज्ञानेश्वरांचे अमृतोद्गार.

तवं श्रोते म्हणती दैवं। कैसी बोलाची हवाव ॥
काइ नादातें हान वरिवं। जीणौनि आले ॥ १ ॥
हां हो नवल नोहे देशी। मऱ्हाटी बोलिजे तरि ऐसी।
वाणें उमटत आहे मा आकाशीं। साहित्या रंगाचें ॥ २ ॥
कैसें उन्मेख चांदिणें तार। आणि भावार्था पडतसे गार ॥
हेंचि श्लोकार्थ कुमुदिं तरि फार। सेवितां होतें ॥ ३ ॥

८. शके १३०० च्या सुमाराचें बाहिरंभट पिसा याचें मराठी.

"लौकरी चालागे साजणीं। पुत्रेंसी वोवाळूं बाळंतिणी ॥
शीघ्र ल्या गे लेणीं। तांतडी सारिखीं ॥
नेसलियां रुचीचीं वस्त्रें। वाणें परिचीं विचित्रें ॥
आळंकारादि कर्णपत्रें। मोतिलगें ॥
नेत्रीं सूदलें आंजन। पाहावया यश्वदेचें निधान ॥
कैसें तांबोळें वदन। सुरंग दिसे ॥

९. शके १४८७ च्या सुमारचा कवि चोंभा याचें मराठी.

"गीताचेनि नादें। चरों विसरलीं स्वापदें ॥
हरिणीं नोडविलें कर्ण। तियें राहिलीं नादबोधें ॥

रागें व्यापिलें अंबर । पंश्रुजाती नेघती चारा ॥
विसरौनु येक जाले । पंचानन आणि कुंजर ॥

१०. शके १४२९ मधील कऱ्हाडच्या गिजऱ्यांकडे मिळालेला एक मोडी लेख.

"॥ श्री स्वस्तिश्री साकु १४२९ वरीखे परभा वछरे आस्विनु वादि पंचमी आद्यातवारु तेया दिवसी करुवे थाळ देको पाटेलु वा नेगो पाटेलु वीगकरु वा वाटगुडी पिसळवा साइंदे पाटेलु वा तुकदेऊ वा रामीदेऊ वा सोनु गुडी वाडिका वाडिगा गुडी पु हे मुख्य करुनु सामारता पाटेलु गिजरेया भानाभट गोविद भटेसी ...इ० ॥"

११. शके १५०० च्या सुमारास एकनाथ स्वामींनीं लिहिलेल्या गद्याचा एक नमुना.

"अर्जदास्त अर्जदार । बंदगी बंदेनवाज, अलेकं सलाम । साहेबांचे सेवेसी, बंदे शरीराकार । जीवाजी शेखदार, बुधाजी कारकून । प्रगणे शरीराबाद, किल्ले कायापुरी । सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार जालों तो प्रगणे मजकुरीं येऊन सरकार काम करावयास लागलों।"

१२. एक जुन्या काहणीचा मासला. धरित्रीची कहाणी.

"ऐका परमेश्वरा ! धरित्रीमाय ! तुझी कहाणी. आटपाट नगर होतं, नगरांत एक ब्राह्मण होता. त्या ब्राह्मणाची स्त्री काय करी ? धरित्री मायेचें चिंतन करी, वंदन करी, 'धरित्री माय, तंच थोर, तूंच समर्थ, कांकणलेल्या लेकी दे, मुसळ-कांड्या दासी दे, नारायणासारखे पांच पुत्र दे, दोघी कन्या दे, कुसुंबीच्या फुला-सारखं स्थळ दे,' हा वसा कधीं घ्यावा ? आखाड्या दशमीस घ्यावा, कार्तिक्या दशमसि संपूर्ण करावा. इ०"

१३. शके १५०० च्या सुमाराचें दासोपंती मराठी.

"तुझी दासी । बहुता काळाची ॥
नव्हे कामाळु । जाणतासि ठाईची ॥
बैस म्हणसी । तेथें बैसेन ॥
दोन्ही चरण । नयनीं पाहिन ॥
पुरे पुरे उच्छिष्टु । येकुचि कवळू ॥
दिगंबरा मी नव्हे भुकाळू ॥"

१४. शके १५५० च्या सुमाराचें मुक्तेश्वराचें मराठी.

**" पवित्र शीतळ जळ माथां मंदाकिनी ।**
**कंठीं धरिलिया वन्ही नवल काय ? ॥**
**गरुडारूढ मधुसूदन हृदयीं वसे पूर्ण ।**
**कंठीं सर्पाभरण नवल काय ? ॥**
**सिंहावरी वोळंगत अंकीं गिरिजा स्वस्थ ।**
**मारिला कुंजर दैत्य नवल काय ? ॥**
**अहो लीला विश्वंभरा कृपामूर्ति जगदोद्धारा ।**
**तारिसी मुक्तेश्वरा नवल काय ? ॥ "**

१५. शके १५९६ च्या मार्गशीर्ष पौषाच्या सुमारास रामदासांनीं स्वतः लिहिलेलें पत्र.

" उत्तम गुणाळंकृत रघुनाथभक्ति परायेण परोपकार राजमान्य राजश्री रघुनाथभट गोसांवी यांसी स्नेहपूर्वक सूचना तुमचा निरोप घेउनु हेलवाकिहून स्वार जालों ते सुखरूप चाफलास पावलों संकल्पाची समारादनाहि जाली पुढें शरीराचा उपचार हि हळु हळु होतो तुमचें मन मजवरी बहुत आहे ते तुमचे इ० "

१६. शके १६४५ चे सुमारचे मध्वमुनीचें मराठी.

**" देह देवाच्या हा कारणीं कीं पडो । मनोभावें घडो सेवा त्याची ॥**
**हरहर महादेव वदत वदनीं । देह नैवेद्य अर्पुनी सिद्ध झाला ॥**
**राया शस्त्र उचलोनी लावी कंठनाळी । तेव्हां चंद्रमौळी गजबजला ॥**
**मध्वनाथ म्हणे ऐकुनीया कींव । धामें सदाशिव डवडवला ॥ "**

१७. शके १६८० मधील बाळाजी बाजीराव पेशव्यांचें पत्र.

" मा॥ अनाम माणको मोरेश्वर देशपांडे ता॥ परलखोरे यासि बालाजी बाजीराव प्रधान सु॥ तीसां खमसैन मया व अलफ वेदमूर्ति रा॥ दिवाकरभट महाबलेश्वरकर यांनीं हुजूर येऊन विदित केले कीं कीले सजनगड येथें श्रीस्वामींचें स्थळीं मठचें व श्रीदेवसंनीध उपाध्येपण...... "

१८. शके १५०० च्या सुमारास लिहिलेल्या राक्षसतागडीच्या लढाईच्या बखरींतील एक उतारा.

" देखिलें जे आपुले कानींचे मोतीं तोडून घेत होते बैसले सिंहासन हिरोन घेत असे आपणासी दूत येऊनु वोढीत ऐसे पाहुनु घाबिरा होऊनु उठिला सर्वेची थोर थोरे जोइसी व पंडित व वेदशास्त्री व ग्राम जोशी बहुता इ० "

१९. शके १५३८ च्या सुमारच्या फादर स्टीफनच्या ख्रिस्तपुराणांतल्या मराठीचा नमुना.

" भावाथिया बरवेया ख्रिस्तावानो, ह्या पुराणांतु स्वामिया जेसुख्रिस्ता तारकाची कथा लिहिली आहे. तो कैसा मनुष्य संसारीं आला; आणि कवण कार्यासी आला, त्या योगाचा विवेकु केला. "

२०. सतराव्या शतकांतील आनंदतनयाचें मराठी.

**" कांहीं आठवतें गड्या शिशुपणीं साळेंतलें खेळणें ॥**
**नाना हास्यविनोद मोद सगडी कुस्ती करूं हेळणें ॥**
**मी तूं हा मज तूज भेद न जगीं ते मूळ मैत्री भली ॥**
**येते कीं स्मरणास जाण सखया ! पुण्यें बहू लाधली ॥ १ ॥"**

२१. शके १७११ च्या वैशाख शु. ४ स मोरोपंतांनीं गयेहून आपल्या बंधूस लिहिलेलें पत्र.

" चिरंजीव राजश्री आबाजी बापूजी यांसः—मोरो बापूजी आशीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत वैशाख शुद्ध चतुर्थीपर्यंत मुक्काम श्रीगया येथें सुखरूप असों विशेष. येथें आल्यास वीस एकवीस दिवस जाले. गयावृजनास प्रारंभ जाला आहे. वटश्राद्ध दोचौं रोजां होईल. यंदां येथें धारण तूर्त गहूं सा पासरी, मीठ सात शेर येणेंप्रमाणें आहे. "

२२. प्रभाकर शाहीरानें काढलेलें पेशवाईच्या अखेरीचें शब्दचित्र.

**" जे श्रीमंत सकुमार ते वनांतरी भटकत फिरती ॥**
**कळलें तिकडे भरदिवसास प्रभु कांट्यामधिं शिरती ॥**
**आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारुनि धरिती ॥**
**खालीं पसरुन उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करिती ॥**
**अस्तमानीं कधिं रात्रीं भात भाक्षिती पाटावरती ॥**
**दरकुच दरमजलीस कृपेंतिल सेवक अंतरती ॥ "**

२३. याच सुमाराचा होनाजीचा मर्दानी बाणा.

"आज्ञी प्रलयंगता तुझी ग बुध नाहीं कामाची ॥
आलीं धन्याचीं पत्र आम्हांला जलदी जाण्याचीं ॥ धृ० ॥
या लष्करची सुख साजणी नये ग सांगाया ॥
आहे धन्याची मर्जी आम्हांवर कुरपेची छाया ॥
उठुनी ताजीम देती ठाव, पंगतिचा जेवाया ॥
पोऱ्या खिजमतगार कोतवाल घोडा बसाया ॥ चाल ॥
स्वारी जपुन चाले। नउशें रंगीत भाले। वीटे पटेवाले।
हत्ती बिनीवर चाले। नौबद कडाक्याची ॥
नामजाद शिपाई पुढें जिलीब गारद्याची ॥ १ ॥"

२४. सन १८२९ मधील छत्रेकृत इसापनीतिंतिला उतारा.

"एक साधाभोळा गांवढेकरी उंदीर होता. त्याच्या घरीं दर्शनसंतोष, पुष्ट, असा एक नगरकरी उंदीर आला. त्याची याची जुनी ओळख होती. त्यावरून गांवढेकऱ्यानें त्याचा फारच पाहुणचार केला."

२५. इ. स. १८३६ मधील जांभेकर शास्त्र्यांचें मराठी.

"पृथ्वी वर्तुळाकार आहे अशी कल्पना केली असतां वर लिहिलेले सर्व गोष्टींस मिळती. आणि या सिद्धांताशीं विरुद्ध जा दुसऱ्या कल्पना लोकांनीं काढल्या आहेत त्या या वर सांगितल्या प्रमाणांतून कोणत्या तरी एकाशीं विरुद्ध दिसून येतात."

२६. इ. स. १८४१ मधील हरि केशवजीचें मराठी.

"नंतर खिस्ती कांहींसा एकीकडेस होऊन आपल्या आशावान् सोबत्यास बोलतो. अहो ह्या गृहस्थ तर मला मधुरवाणीपुरांतील कृत्रिमहेतुक दिसतो; आणि ह्या जर तोच गृहस्थ असला तर एथें जे सोदे आहेत त्यांमध्यें यापेक्षां कोणी मोठा सोदा नाहीं. आशावान् उत्तर देतो, तो कोण आहे, हें त्यास पुसावें."

२७. जुन्या कोंकणी मराठीचा एक नमुना.

"हरिची कथा, हरिची कथा, सैंधों देवळाक मेलें ॥
कायगो थैंची आरबकुपल जागरणान मेलें ॥
खांदार टोणको, बामण रोडको, मागां पुढां जातां ॥
धावगो कुष्ण्या! धावगो कुष्ण्या! असांच कायसां सांगतां ॥"

२८. इ. स. १८५० मधील ' ज्ञानोदय ' पत्रांतील उतारा.

" सरकारानें सर्व चांगलीं कामें करावीं, असें आमचें म्हणणें नाहीं. लोकांनींच स्वतः मेहनत व खर्च करून चांगलीं कामें करावीं हें अधिक बरें आहे. परंतु सोडत, व इतर जुगार, कित्येक दुष्ट कर्मे बंद करावीं ह्म सरकारचा धर्म आहे. "

२९. सन १८५४ मधील ज्ञानप्रकाशांतला एक उतारा.

" आपल्या मुंबइचा नवा गवरनर लार्ड एलफिनस्तन, ह्या मागील पेशवाई राज्याच्या अखेरीस एथें होता, व ज्याणें मोठें नांव संपादन केलें आणि जो अद्याप पावेतों एतद्देशीय लोकांच्या स्मरणांतून गेलेला नव्हे जो मोर स्टुआर्ट एलफिनस्तन ज्यास अलफिष्टन साहेब या नांवानें ओळखतात त्याचा हा पुतण्या लागतो "

३०. सन १८४८ मधील 'लोकहितवादी' च्या मराठीचा नमुना.

" सांप्रत काळीं तर आपलें शास्त्रांत व देशांत काय आहे व इंग्रज लोक हे कोठून येऊन राज्य करितात व यांची व्यवस्था काय आहे हें कोणास माहीत आहे कां म्हणून विचारिलें तर नाहीं म्हणून बहुतेक शपथ करितील. तेव्हां...हें.. अज्ञान काय वर्णावें ! "

३१. सन १८५९ मधील परशुरामतात्या गोडबोल्याचें मराठी.

" अरे तुझ्या पोरपणास धिक्कार असो. काय हें भलतेंच बोललास. हे शस्त्रधारी वीर सामान्य नव्हत. मोठे कठीण आणि निर्दय आहेत. पोरांचें देखील असलें अमर्याद भाषण ते सोसणार नाहींत. आमचा राजा चंद्रकेतु हातांत धनुष्यबाण घेऊन ऋषींचें रमणीय आश्रमस्थान पहावयास दूर गेला आहे. "

३२. इ. स. १८६१ मधील कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें मराठी.

" ठशांनीं अक्षरें छापण्याची युक्ति प्रथमतः युरोपखंडांत प्रकट झाली; पण ही युक्ति काढिली कोणी ह्याचा पक्का निश्चय होत नाहीं. ही कल्पना आमच्या शहरांत उत्पन्न झाली म्हणून ह्या खंडांतल्या पुष्कळ शहरांतल्या लोकांच्या ह्या मानाविषयीं बहुत दिवस वाद चालला आहे. "

३३. गोव्यांतील शिमगा.

" हंजाणा शिमगो अशिल्लो, त्यान्ना हांव भुग्गो. पोक शेणैन चीट बरैली, शिम्याक येऊंक जाय " ( हंजाणे येथें शिमगा होता, तेव्हां मी लहान होतों. पोक शेण्याची चिटी आली कीं शिमग्याला येऊन जा.)

३४. 'निबंधमालें'तील विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें मराठी.

"आमच्या पुस्तकाचा दुसरा मोठा विशेष हा होय कीं, त्यांत लौकिक विषयांवर कधींही विवरण असत नाहीं. जगांत घडणाऱ्या घडामोडीविषयीं किंवा सामान्यतः आढळणाऱ्या लोकस्थितीविषयीं निबंधरचना करणें झाल्यास तें काम सुलभतेचें आहे हें उघड आहे."

**३४२** येथपर्यंत दिलेल्या उताऱ्यांवरून व मागील प्रकरणांतील भाषेच्या इतिहासावरून, वाक्यसमूहांची ऐतिहासिक व व्याकरणदृष्ट्या छाननी करूं लागल्यास, कांहीं आडाखे बसवितां येतात. ते असेः—

( क ) भाषेच्या स्वरूपांत ठळक दिसण्याजोगा फरक साधारणतः शंभर वर्षांत पडतो.

( ख ) ग्रंथकाराला कळून अगर न कळून त्याच्या लिखाणावर त्याच्या काळाची छाया पडतेच.

( ग ) कोणत्याही भाषेला 'शिष्ट' व 'अशिष्ट' अशीं दोन रूपें नेहमीं विद्यमान असतात. त्यांच्या स्वरूपावरून लेखकाच्या विद्वत्तेसंबंधी स्थूल अनुमान प्रतीत होतें.

( घ ) पद्यापेक्षां गद्य हें लोक व्यवहाराचें अतएव ऐतिहासिक दृष्ट्या कालनिर्णयाचें अधिक खात्रीचें गमक होय, कारण पद्यांत थोडासा कृत्रिमपणा उत्पन्न होतो तो गद्यांत नसतो.

( ङ ) एखाद्या लिखाणांतील पाठांविषयीं मतभेद आल्यास लेखकाच्या समकालीन अन्य शिष्ट लेखकांच्या लिखाणाशीं ज्याचें रूपसादृश्य अधिक तो पाठ अधिक प्रशस्त होय.

( च ) भाषेवर सत्ता न चालल्यामुळें किंवा विशिष्ट प्रकारच्या हौसेमुळें झालेले किंवा केलेले अपप्रयोग विद्वत्तेचें गमक होणार नाहींत.

( छ ) एकाच काळच्या दोन लेखकांच्या लिखाणांत मोठा स्वरूपभेद दिसून आल्यास, त्यांतलि शिष्ट लिखाण अधिक प्रमाण मानलें पाहिजे, व अशिष्ट लिखाणांतील रूपभेद अज्ञानजन्य, लेखक-प्रमादजन्य किंवा अन्यकारणोद्भव समजला पाहिजे.

( ज ) दोनी लिखाणें शिष्ट असल्यास समकालीन अन्य शिष्ट लेखकांच्या लिखाणाशीं जें अधिक मिळतें असेल तें प्रशस्त होय.

( झ ) परक्या संस्कृतीची छाप ज्या मानानें अधिक त्या मानानें व्याकरण-शुद्धता कमी असते.

( ञ ) एकाच पाठाच्या अर्थाविषयीं मतभेद आल्यास ऐतिहासिक पुरावा सर्वांत अधिक ग्राह्य; व्याकरणात्मक पुरावा त्यानंतर; व औचित्यादि इतर दृष्टीचा पुरावा त्यानंतर ग्राह्य समजावा.

( ट ) प्रत्येक लेखकाची एक स्वाभाविक शैली असते, तिला अनसरून कांहीं विशिष्ट रूपें, शब्द वगैरे त्याच्या भाषेंत हटकून येतातच. वादग्रस्त बाबतींत या शैलीचा रूपनिर्णयास उपयोग होतो.

( ठ ) लेखावरून वाचल्या जाणाऱ्या लिखाणापेक्षां पाठांत उतरलेल्या लिखाणांत पाठभेद उत्पन्न होण्याचा संभव अधिक असतो.

**३४३** आतां अभ्यासाकरितां कांहीं वाक्यांची अशी चिकित्सा करून पाहूं, व कांहीं प्रश्नांची छाननी करू.

## १ अभ्यासपाठ.

" कलम (३४१) २३ मधील होनाजी बाळच्या उताऱ्यावरून त्यांच्या विद्वत्तेविषयीं अनुमान काढा. " मूळ सुभाषित ' स्त्रीबुद्धिः प्रलयं गतः ' असें असून तें होनाजीनें अगदींच विकृत केलें आहे. शिवाय ' बुध ' वगैरे प्रयोगावरून त्याला व्याकरणाचें ज्ञान विशेष असेलसें वाटत नाहीं. तथापि त्याच्या इतर ठाकठीक रचनेवरून व सुभाषिताच्या मार्मिक उपयोगावरून तो बहुश्रुत असावा. ( कलम ३४२ ग )

## २ अभ्यासपाठ.

**" समर्थु कां रिणियां । मागों आला बाइणियां ।**
**न लोटे तैसा प्राणियां । पडे तो भोगु ॥ १ ॥ "**

या ज्ञानेश्वरी ओवीतील ' बाइणियां ' शब्दाचे ' ( १ ) बायको व ( २ ) वायद्याला, मुदतीला ' असे दोन अर्थ करतात. यांतला कोणता अधिक ग्राह्य व कां ?" ज्ञानेश्वरांचे वेळीं मुसलमानी भाषेचा संसर्ग दक्षिणेंतल्या भाषांना झाला

नव्हता, आणि 'वायदा' शब्द तर अरबी आहे; अर्थात् 'बाइणियां' चा दुसरा अर्थ शक्य नाहीं (३४२ ञ), सबब पहिला अर्थ ग्राह्य आहे.

### ३ अभ्यासपाठ.

" राजवाड्यांचीच ज्ञानेश्वरी इतर ज्ञानेश्वरीच्या प्रतींहून व्याकरणदृष्ट्या अधिक ग्राह्य कां हें एखादें उदाहरण देऊन सांगा. " उदाहरणार्थ कुंट्यांच्या व राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरींतील एकाच ओंवीचे पाठ घेऊं.

**नातरी भौमा नाम मंगळ । रोहिणीतें ह्मणती जळ ।**
**तैसा सुखप्रवाद बरळ । विषयिक हा ॥** ( कुंटे )
**ना तरि भौमा नावं मंगलु । रोहिणीतें ह्मणिजे जलु ।**
**तैसा सुखप्रवादु बरलु । विषइकु हा ॥** ( राजवाडे )

राजवाडी ओंवींतिला उकार ज्ञानेश्वरांचें समकालीन जें 'पंचतंत्र' त्यासारख्या शिष्ट मराठींत सांपडतो व पुढेंही पुष्कळ वर्षें तो भाषेंत होता. त्यामुळें तो अधिक ग्राह्य होय ( कलम ३४२ ङ ). त्याचप्रमाणें तत्सम शब्दांहून तद्भव शब्दांकडे ज्ञानेश्वरांचा ओढा अधिक असल्यानें 'नाम' पेक्षां 'नावं,' व 'विषयिक'पेक्षां 'विषइकु' असेंच प्रयोग ते करतील हें अधिक संभवनीय आहे ( ३४२ ट ). कुंट्यांच्या ज्ञानेश्वरींत देखील 'नांव' असेंच रूप 'नाम' या रूपाहून अधिक आलें आहे. सबब राजवाड्यांचा पाठच अधिक ग्राह्य होय.

### ४ अभ्यासपाठ.

**" ठेविल भगवान तैसेंचि राहणें ।**
**तूप साखर पोळी, खीर, भात खाणें; ॥**
**केव्हां भाकर भाजी, स्वीकार करणें ।**
**केव्हां नूतन बारिक वस्त्र परिधान करणें ॥"**

ही भाषा कोणच्या काळची असावी ? यांत खाण्याच्या पदार्थांच्या आलेल्या नांवांवरून हा उतारा अगदीं अलीकडचा दिसतो. शिवाय शब्दांचीं रूपें व प्रयोगही जुने नाहींत. याहून नक्की कालनिर्णय करण्याजोगें साधन या उताऱ्यांत नाहीं.

### ५ अभ्यासपाठ.

" ज्ञानेश्वर व नामदेव हे समकालीन असतां नामदेवाची भाषा अलीकडची दिसते, या विरोधाचा मेळ कसा घालावा ? " नामदेव अलीकडचे असते तर

त्यांच्या अभंगांत मुसलमानी शब्द यावयास पाहिजे होते. ( कलम ३४२ ख ). ते आलेले नाहींत यावरून ते मुसलमानी आक्रमणाच्या अगोदरचे आहेत. अर्थात् त्यांची भाषा त्या काळच्या भाषेशीं सुटून दिसली तरी त्यांचा काळ अलीकडे येऊं शकत नाहीं. तो दोष अपपाठांचा मानला पाहिजे. ( कलम ३४२ छ ), व हे अपपाठ ज्ञानेश्वरीहून नामदेवाचे अभंग फार लोकांच्या तोंडीं अधिक भिन्नतेनें आल्यामुळें उत्पन्न झाले असले पाहिजेत, ( कलम ३४२ ठ ).

### ६ अभ्यासपाठ.

मोरोपंतांनीं एका आर्येत ' देवि ! त्रैलोक्यसुंदरि ! पुनीते ! ' असें म्हटलें आहे. ' पू ' धातूचें भूतकालीं कर्मणि धातुसाधित ' पूत ' होतें, ' पुनीत ' होत नाहीं. तेव्हां अशी ढोबळ चूक करणारे मोरोपंत अविद्वान् होते असें अनुमान काढतां येईल काय ? " मोरोपंतांच्या प्रचंड लिखाणांत असली चूक एखाददुसरीच सांपडते. पण त्यांचे मोठमोठे संस्कृत समास व वाक्यें हीं व्याकरणशुद्ध असल्याचा पुरावा उलट बाजूला आहे. अर्थात् यमकाच्या नादानें वरील अपप्रयोग केला आहे. ( ३४२ च ).

### ७ अभ्यासपाठ.

**" एया लागीं दुष्कृती जऱ्हीं जाला। तऱ्हीं अनुतापतीर्थीं न्हाला॥**
**न्हाउनियां मज आंतु आला। सर्व भावें॥ १॥**
**तरि आतां पवित्र तेयाचें कुल। आभिजात्य तेंचि निर्मल॥**
**जन्मलेयाचें फल। तेयाचियाचि जालें॥ २॥ "**

ह्या ओव्या आजच्या मराठींत लिहा. या उताऱ्यांत ' जऱ्हीं–तऱ्हीं ' चा उपयोग ' जरी–तरी सुद्धां ' अशा अर्थानें केला असून, त्या वाक्यांत अर्थपूर्ति होत नाहीं हें ध्यानांत ठेवून त्याचें रूपांतर करावयाचें आहे. तें असें होईल:—

**" ह्या लागी दुष्कृती जरि झाला।**
**तरी ( किंवा आणि )अनुतापतीर्थीं न्हाला॥**
**न्हाऊनि मज आंत आला।**
**सर्व भावें॥ १॥**
**तरी आतां पवित्र त्याचें कुळ।**
**आभिजात्य त्याचेंचि निर्मळ॥**
**जन्मल्याचें फळ।**
**त्यातेंचि झालें॥ २॥ "**

---

# पाठ सत्तावि सावा.

## वाङ्मय व त्याचे भेद.

३४४ " भाषेंत जें जें बोललें किंवा लिहिलें जातें तें वाङ्मय. वाङ्मयांत 'सारस्वता' चा समावेश होतो. बरी, वाईट, ही छान वाङ्मयांत नसते, ती निवड सारस्वत करितें. उदार, ललित, अभिजात व नागर असा जो गद्य-पद्य-प्रबंध तो सारस्वत. "-राजवाडे. " प्रत्येक पिढिची अभिरुचि व स्मरणशक्ति या दोन चाळणीच होत. ह्या जोड चाळणींतून प्रत्येक पिढींत कांहीं कांहीं लेख सरस्वतीच्या गंगाजळींत पडतात व हे गाळींव लेख मिळून जो संग्रह होतो त्याचेंच नांव वाङ्मय "—न. चिं. केळकर.

३४५ " म्यरस्तजभ्नगैलान्तैरेभिर्दशभिरक्षरैः ।
समस्तं वाङ्मयं व्याप्तं त्रैलोक्यमिव विष्णुना ॥ १ ॥ "

म-य-र-स-त-ज-भ-न-ल-ग, या दहा गणांनीं मोजतां येण्याजोगा भाषेचा विस्तार तो सारा वाङ्मय, अशी वाङ्मयाची व्याख्या संस्कृतांत केली असून ती राजवाड्यांच्या व्याख्येशीं मिळणारी आहे; तर उपनिषत्कारांच्या मतानुसार कै. हरिभाऊ आपटे यांनीं 'सत् व असत् यांच्या मधील भेद ओळखण्याचें ज्ञान देणारा, शुद्ध आनंदाची प्राप्ती करून देणारा आणि ऐकणारांच्या मनांतलें किल्मिष घालवून त्याला श्रेष्ठ पदवीला पोंचविणारा वाक्यसमूह' अशी वाङ्मयाची व्याख्या केली आहे.

३४६ 'सारस्वत' शब्दाचा मूळ अर्थ संस्कृतांत 'कौशल्यपूर्ण भाषण' अथवा 'वक्तृत्व' असा आहे. तथापि 'वाङ्मय' व 'सारस्वत' या दोन्ही शब्दांचे अर्थ पुढें पुढें संकुचित होत जाऊन हल्लीं त्यांचा अर्थ 'निवडक उत्कृष्ट भाषाविस्तार' इतकाच सामान्यतः मानला जातो. " अंतःकरणाच्या खोल खळबळीचें गोड आविष्करण म्हणजे सारस्वत होय. " ( द. वा. पोतदार. )

३४७ 'साहित्य' शब्दाचा मूळ अर्थ 'काव्य' इतकाच असून पुढें पुढें त्याची व्याप्ति वाढलेली दिसते. हल्लीं त्याचा उपयोग वाङ्मय किंवा सारस्वत याच अर्थानें बहुधा करितात. 'सहितस्य भावः (हितकारकत्व किंवा एकत्रित विचार) अशी त्या शब्दाची कोणी व्युत्पत्ति मानतात व 'हितकारक वाङ्मय' किंवा 'विद्वानांचे एकत्रित विचार' तेवढेंच साहित्य, अशी त्या शब्दाची अर्थमर्यादा मानतात.

३४८ तथापि हल्लीं तरी 'वाङ्मय,' 'सारस्वत' व 'साहित्य' हे तिन्ही शब्द जवळजवळ 'Literature' या इंग्रेजी शब्दाशीं समानार्थक झाले आहेत, व हडसननें केलेली त्या इंग्रेजी शब्दाचीं व्याख्या या मराठी शब्दांना लागू आहे असें समजावयास हरकत नाहीं. "Literature is a vital record of what men have experienced of it, what they have thought and felt about those aspects of it which have the most immediate and enduring interest for all of us," (मानवी हिताशीं अत्यंत निगडित असलेल्या गोष्टींच्या अनुभवासंबंधीं शहाण्या माणसांनीं केलेली विचारांची व भावनांची नोंद) ही हडसनची 'Literature' शब्दाची व्याख्या असून, तिचा आणखी थोडा संकोच करून 'सत्य,' 'शिव' आणि 'सुंदर' असा जो वाक्यसमूह तो वाङ्मय, सारस्वत व विशेषतः साहित्य होय असें रा. वासुदेवराव आपट्यांचें मत आहे.

३४९ साहित्याचे भेद दोन, 'गद्य' व 'पद्य.' 'केवळ भाषणाला उपयोगी व काल, मर्यादा, आणि चाल यांच्या मर्यादेंत न सांपडणारें साहित्य," तें गद्य; व "विशिष्ट चालीवर, विशिष्ट वेळांत व विशिष्ट मर्यादेंत म्हणावयाचें साहित्य" तें पद्य होय. "गद्याचा हेतु मनुष्याच्या विचारशक्तीला जागृत करणें हा असतो, व पद्याचा हेतु मनुष्याच्या कल्पनाशक्तिला संबोधावयाचा असतो. गद्याचा संबंध मेंदूशीं असून त्याचा उद्देश बोध, व पद्याचा संबंध मनुष्याच्या हृदयाशीं असून त्याचा उद्देश आनंद हा आहे."–चिं वि. वैद्य.

३५० गद्य व पद्य यांतील शास्त्रीय भेद महत्त्वाचा आहे. मुखांतील वेगवेगळ्या स्थानांवर येऊन पृथ्वीतत्वानें दूषित झालेल्या स्वरांत गद्याचा उच्चार होतो, त्यामुळें त्याचा बहुधा एकच विकृत स्वर असतो. मनोविकारांच्या तीव्रतेमुळें प्रसंगीं हा स्वर चढला तरी देखील तो विकृतच राहतो; व संगीतोपयोगी स्वरांच्या कक्षेंत

येऊं शकत नाहीं. पद्याचा संबंध हृदयाशीं असल्यानें त्यांत वर्णापेक्षां स्वरांच्या उच्चाराला प्राधान्य येतें, त्याचे स्वर एकाहून अधिक व संगीतोपयोगी असतात, ते मुखांतील स्थानांच्या स्पर्शानें दूषित होत नाहींत, आणि त्यांच्या उच्चाराला कालाचें प्रमाण लागू होतें. गद्याचें संगीतदृष्ट्या स्वरलेखन होऊं शकत नाहीं, पण पद्याचें होतें; जसें:—

( क ) **हें पांखरूं मजसि येइल काय कामा** ॥
गऽ गऽम गऽ गगग गऽगग गऽम गऽगऽ
**ऐसें नृपा न वद पूरित लोक-कामा** ॥
रेऽगऽ रेसाऽ धसारे गऽरेग रेऽग साऽसा ॥

या स्वरलेखनांत 'ध' (धैवत), 'सा' (षड्ज), 'रे' (ऋषभ), 'ग' (गांधार), व 'म' (शुद्धमध्यम) असे पांच स्वर आले आहेत.

( ख ) **विसांवा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला** ॥
सागऽरेसा साऽरेगरेऽ नीसारे सारेगऽरेऽ सासानीसाऽ
**नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला** ॥
प नीऽसाऽसाऽरेऽगरेऽनीसारे सारेगऽरेऽ नी सारेसा ॥

या स्वरलेखनांत 'प' (पंचम), 'नी' (निषाद), 'सा' (षड्ज), 'रे' (ऋषभ) व 'ग' (गांधार) असे पांच स्वर आले आहेत.

( ग ) **ओंनमो आद्या । वेदप्रतिपाद्या** ॥
**जय स्वसंवेद्या । आत्मरूपा** ॥ १ ॥
नीऽनीऽसा साऽसाऽ । साऽसाऽनीसासाऽसा ॥
नीनीसासाऽरेसा । साऽरेसासाऽ

या स्वरलेखनांत 'नी' (निषाद), 'सा' (षड्ज), व 'रे' (ऋषभ) एवढे तीनच स्वर आले आहेत.

( घ ) **भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा** ।
पनीऽ साऽसासाऽ सासाऽ साऽसासाऽ गगऽग गगगरे सारेऽ
**धारीसि तरि हरिचा सेवक सुधा** ॥
मगरे सासा पपनीऽनीसा सासा रेसा

या स्वरलेखनांत 'प', 'नी', 'सा', 'रे', 'ग,' व 'म', इतके सहा स्वर आले आहेत.

**३५१** पद्याला जरी संगीताचे स्वर लागतात तरी तें संगीताहून अगदीं भिन्न आहे हें विसरतां कामा नये. कारण, (१) पद्यांतले स्वर बहुधा एकेरी असतात तर संगीतांतले स्वर मागच्या पुढच्या स्वरांचा अंश घेऊन जातात; (२) पद्यांतल्या स्वरांत वर्णोच्चारापेक्षां स्वरोच्चाराला प्राधान्य असलें तरी वर्णोच्चार स्पष्ट व ठराविक मुदतींत करण्याची जबाबदारी स्वरावर असते, पण संगीतांत वर्णोच्चार हा भाग अगदींच गौण होतो व त्यावर स्वरानें किती वेळ रहावें याविषयीं निबंध असत नाहीं; (३) संगीतांतील स्वररचना रागांच्या स्वरूपाला अनुसरून केलेली असल्यानें संगीताच्या धोरणानें स्वर उच्चारल्या-बरोबर कोणत्या तरी रागाची छाया स्पष्ट उमटते, पण पद्यांतील वर्णरचना अर्थाच्या धोरणानें केलेली असल्यानें त्याच्या उच्चारांत रागाची छाया बहुधा उमटत नाही. जुनी मराठी पदें, श्लोक, संस्कृत वृत्तें, अभंग, पोवाडे, लावण्या, छकडी इत्यादि सर्व प्रकारची पद्यरचना व उस्तादी गायकांच्या चिजा यांत वर सांगितलेला भेद आहे, तथापि प्रसंगी वर्णोच्चाराचें महत्त्व कमी करून व स्वररच-नेंत जरूर तो बदल करून पद्येंही चिजांप्रमाणें म्हणतां येतील.

## अभ्यासपाठ १.

"पुराणिक, किंवा हरिदास प्रसंगोपात्त गद्याला संगीताचे स्वर लावतात. तें त्यांचें बोलणें गद्य होईल की पद्य होईल?" गद्याच्या व्याख्येला सोडून त्यांत संगीताचे स्वर येत असल्यामुळें तें गद्य नव्हे (कलम ३५०); व पद्याच्या व्याख्येप्रमाणें त्याला चाल व काल यांची जी आवश्यकता आहे ती त्यांत नसल्यामुळें तें पद्यही नव्हे (कलम ३४९). अर्थात् तें गद्य व पद्य यांचें मिश्रण आहे.

## अभ्यासपाठ २.

"मोटेच्या, नांगराच्या, किंवा गाडीच्या बैलाला उद्देशून शेतकरी लोक जें 'गीत' म्हणतात त्याचें स्वरूप कोणचें?" त्याला कालाची व चालीची मर्यादा नसल्यानें तें पद्य नव्हे (कलम ३४९); संगीताचे स्वर बहुधा लागत नाहींत व लागले तरी राग उमटत नाहीं, म्हणून तें संगीत नव्हे (कलम ३५१, (३)); व एकाहून अधिक स्वर असल्यामुळें गद्यही नव्हे (३५०); तर तें संगीताचें

अनुकरण ऊर्फ उपसंगीत आहे. ‘गझल’ वगैरे चिजांचे अंतऱ्यांत ठेका बंद ठेवून जो मजकूर म्हणतात तोही उपसंगीतच होय.

## अभ्यासपाठ ३.

“कलम ३५० (क) मधील पद्य संगीत चिजेप्रमाणें म्हणावयास काय करावें लागेल?” स्वररचना बदलून रागदृष्ट्या करावी लागेल (कलम ३५१ (३)); कालाची व उच्चाराची मर्यादा मोडावी लागेल (कलम ३५१ (२)); व अक्षरोच्चार करतांना स्वरांना मागील पुढील स्वरांचे अंश देत उच्चार करावा लागेल (कलम ३५१ (१)).

---

# पाठ अठ्ठाविसावा.



## गद्याचें वर्गीकरण.



**३५२** गद्याचे ( १ ) विदग्ध किंवा ललित वाङ्मय, आणि ( २ ) गंभीर वाङ्मय असे दोन वर्ग होतात. पहिल्या वर्गांत ' कादंबऱ्या, नाटकें, गोष्टी, विनोदी लेख व कहाण्या ' हे प्रकार येतात व दुसऱ्या वर्गांत ' इतिहास, चरित्रें, शास्त्रीय ग्रंथ, प्रवासवृत्तें, स्थलवर्णनें, निबंध, पत्रलेखन, नियतकालिकांतील लेख, जाहिराती ' इत्यादि प्रकार येतात.

**३५३** संस्कृत साहित्यकारांनीं ' विदग्ध ' वाङ्मयाचें लक्षण " रसादि-योग–प्रबंधन–कौशलम् " ( वेगवेगळ्या रसादिकांची योजना करण्यांतलें चातुर्य ) असें केलें आहे. अर्थात् विदग्ध किंवा ललित वाङ्मयाचा उद्देश ' सौंदर्याच्या आश्रयानें आनंद उत्पन्न करणें ' म्हणजे परंपरेनें मनोरंजन करणें हाच होय. तथापि आनंदोत्पत्तीबरोबरच सत्यदर्शन घडविणें हा त्याचा अंतिम हेतु असतो. गंभीर-वाङ्मय **धोपट** मार्गानें जें सत्य सांगतें तेंच सत्य ललित वाङ्मय तिखटमीठ लावून, लुसलुशीत किंवा चुरचुरीत शब्दप्रयोगांनीं सांगतें, हा दोन्हींत फरक आहे.

**३५४** ' कादंबरी ' म्हणजे कथानक, पात्रें व क्रिया या तीन अंगांच्या द्वारें व्यक्त केलेलें, समाजाच्या व्यवस्थेचें गुणदोष दाखविणारें निरूपणात्मक शब्द-चित्र होय. विषय, उद्देश व लेखनपद्धति यांवरून कादंबऱ्यांचे असे नऊ प्रकार होतातः—( १ ) वस्तुस्थितिदर्शक; जसें:–हरिभाऊ आपटे यांची 'मधली स्थिति.' ( २ ) ध्येयात्मक; जसें:–' मी, ' ' यशवंतराव खरे. ' ( ३ ) अद्भुत जसें:–' मंजुघोषा, ' ' विचित्रपुरी. ' ( ४ ) तत्वविवेचनपर. जसें:–' रागिणी. ' ( ५ ) मनोविकासदर्शक. जसें:–बंगाली कादंबऱ्या. ( ६ ) ऐतिहासिक. जसें:–' उषःकाल. ' 'शापित महाराष्ट्र ' इ. ( ७ ) आत्मचरित्रपर. जसें:–' पण लक्ष्यांत कोण घेतो ! ' ' वांईकर भटजी. ' ( ८ ) विशिष्ट हेतुप्रधान. जसें:–' जीवनरहस्य, ' ' दुःखा-

अंतीं सुख.' ( ९ ) भविष्यदर्शक. जसें:–'आणखी शंभर वर्षांनीं,' 'चंद्रलोकची सफर' इ.

**३५५** भरतांचार्यांनीं नाटकाची व्याख्या अशी केली आहे. 'यो यः स्वभावो लोकस्य सुखदुःखसमन्वितः। सोंऽगादभिनयोपेतो नाट्यमित्यभिधीयते ॥' धनंजयानें 'दशरूपक' नांवाच्या आपल्या नाट्यग्रंथांत नाटकाची व्याख्या 'अवस्थानुकृतिर्नाट्यम्' अशी केली आहे. गोपाळ वामन बापट यांनीं 'नाट्यविषयक व्यापक विचार' या पुस्तकांत नाटकाची व्याख्या अशी केली आहे. 'नाटक हें काल्पनिक अथवा खरोखरी होऊन गेलेल्या एखाद्या व्यक्तीच्या व तिच्याशीं संबंध असलेल्या इतर व्यक्तींच्या आयुर्वृत्तांतील कांहीं भागाचें दृश्य रूपानें मर्यादित कालांत दाखविलेलें व मनोरंजन करून उपदेश करणारें दृश्य काव्य (शब्दचित्र) आहे. कादंबरीप्रमाणेंच नाटकालाही संविधानक, पात्रें व क्रिया हीं तीन अंगें असून त्याचें स्वरूप बहुतांशीं संवादात्मक असतें.

**३५६** संस्कृत साहित्यकारांनीं नाटकाचे (१) नाटक, (२) प्रकरण, (३) व्यायोग, (४) भाण, (५) समवकार, (६) वीथि, (७) प्रहसन, (८) डिम, (९) अंक व (१०) ईहामृग असे दहा प्रकार व कित्येकांनीं तर दुसरे अठरा प्रकार सांगितले आहेत. इंग्रेज साहित्यकारांनी नाटकाचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें केलें आहे. ( १ ) Pastoral (ग्राम्य). ( २ ) Religious ( धार्मिक ). ( ३ ) Melo-drama ( अद्भुतप्रधान ). ( ४ ) Comedy ( उल्हासजनक ), व ( ५ ) Tragedy ( विषादजनक ). अलीकडे कोणी कोणी नाटकाचे 'गद्य' व 'संगीत' असे दोन भेद मानतात, पण ते तात्विकदृष्ट्या बरोबर नाहींत. कोणी कोणी 'सामाजिक' व 'ऐतिहासिक' असेही नाटकाचे दोन प्रकार मानतात.

**३५७** सजावटीच्या दृष्टीनें नाटकें व कादंबऱ्या यांच्या रचनेंत पुढील गोष्टी जरूर लक्ष्यांत ठेवण्यासारख्या आहेत.

( १ ) अद्भुतादि वगळून कथानक स्वाभाविक असावें, म्हणजे त्यांतले प्रसंग संभवनीय वाटावे.

( २ ) कथानकाचा एकच सुसूत्र धागा असावा. कदाचित् अधिक धागे जोडल्यास ते परस्परांशीं सुसंगत व एकजीव असावे.

( ३ ) कथानकांत एक कोणती तरी ' मध्यवर्ती कल्पना '(Central idea) असावी, व ती चांगली परिणामकारक निवडून तिच्याभोंवतीं कथानकाची रचना केलेली असावी. ही कल्पना म्हणजेच साहित्यांतलें 'शिव' किंवा मंगल होय.

( ४ ) कथानकांतील घटनांचा क्रम स्वाभाविक असावा.

( ५ ) पात्रांच्या स्वभावांत विविधपणा असावा.

( ६ ) पात्रांच्या वर्तनक्रमांतून घटना उत्पन्न व्हाव्या. घटनासाठीं पात्रें आणूं नये.

( ७ ) कथानक व पात्रांचा स्वभाव या दोहोंची प्रगति शक्य तों संवादाच्या द्वारें व्हावी, व शक्य तों थोडक्यांत संवादांत शक्य तितकें अधिक स्वभावाविष्करण व्हावें.

( ८ ) पात्राच्या तोंडची भाषा त्या पात्राच्या योग्यतेनुरूप असावी.

( ९ ) कथानकाचा शेवट जगांत ' नेहमीं कसा होतो ' या दृष्टीनें करण्यापेक्षां ' कसा व्हावा ' या दृष्टीनें करावा. हेंच साहित्यांतलें ' सत्य ' म्हणजे तत्वदर्शन होय.

( १० ) कथानकांतील क्रिया शक्य तों प्रत्यक्ष असावी.

**३५८** नाटकें व कादंबऱ्या यांत महत्वाचा फरक आहे. कादंबरीपेक्षां नाटक हें रचनेच्या दृष्टीनें अधिक अवघड असतें. कादंबरी श्राव्य आहे तर नाटक दृश्य आहे. कादंबरीकाराइतकें अमर्याद लेखनस्वातंत्र्य नाटककाराला असत नाहीं. कादंबरी मुख्यतः निरूपणात्मक असते व तिचें कथानक सृष्टिवर्णनानें सजवितां येतें तर नाटक हें मुख्यतः संवादात्मक असल्यानें त्यास अशा प्रकारच्या साधनांचा उपयोग फारसा करून घेतां येत नाहीं. सामाजिक नाटकें व कादंबऱ्या आणि ऐतिहासिक नाटकें व कादंबऱ्या यांतही अशाच कारणांनीं भेद झाला आहे. ऐतिहासिक पात्रें वाचकांच्या ओळखीचीं असल्यानें यांचा स्वभावपरिपोष विशिष्ट मर्यादेंतच करावा लागतो. उलट पक्षीं सामाजिक पात्रें काल्पनिक असल्यानें त्यांच्या स्वभाव–परिपोषांत बरेंच स्वातंत्र्य घेतां येतें. ऐतिहासिक कथानकांत पात्रांची व प्रसंगांची भर घालणें हें देखील याच कारणास्तव अवघड कार्य होतें.

( क ) सिनेमांतील नाटकांना अभिनयाच्या द्वारेंच कथानक समजून द्यावें लागत असल्यानें अभिनयालाच सारें महत्व येऊन, त्याच्या कथानकाची

रचना, पात्रांची योजना आणि क्रियेची घटना हीं इतर नाटकांहून अवघड होतात.

३५९ " थोडकींच पात्रें व थोडेच प्रसंग घेऊन एकच कल्पना संपूर्णत्वानें जिच्यामध्यें चटकदार भाषेंत मांडलेली असते तिला ' लघुकथा ' म्हणतात. " अर्थात् कादंबरी व छोट्या गोष्टी यांत फरक आहे. कादंबरीचा व्याप छोट्या गोष्टींहून मोठा असतो. कादंबरींत पात्रांचा स्वभावविकास दाखवितां येतो तसा छोट्या गोष्टींत येत नाहीं. कादंबरींत गोष्टी, विचार, कल्पना व सिद्धांत यांची गर्दी असते, तर छोट्या गोष्टींत एकाच प्रसंगाचा उद्देश, क्रम व परिणाम एकतानतेनें दाखविलेला असतो.

३६० " आमच्या स्त्रीवर्गांत ' कहाण्या ' म्हणून गोष्टी प्रसिद्ध आहेत. हें कहाण्यांचें वाङ्मय मराठींत फार नामीपैकीं आहे. कहाण्यांतलि सोपी, सरळ, रसाळ व शुद्ध मराठी भाषा वाचून फार आनंद वाटतो. त्यांतलि नीत्युपदेश फारच मार्मिक आहे. मला तर कैकवेळां असें वाटतें कीं, या कहाण्या म्हणजे मराठींतील उपनिषदेंच होत, अशी यांची अव्याजमनोहरता व माधुरी अलौकिक आहे." प्रो. पोतदार.

३६१ ' इसापनीती ' सारख्या पशु-पक्ष्यांच्या सूचक गोष्टी व ' अरबी भाषेंतील सुरस गोष्टी ' सारख्या मोठ्या नवलकथा, हे गोष्टींचे प्रकारही आतां मराठी गद्यांत प्रविष्ट झाले आहेत. पैकीं पहिल्या प्रकारचा उद्देश करमणुकीबरोबर बोध करणें हा असतो व दुसऱ्या प्रकारचा उद्देश मुख्यतः मनोरंजन हा एकच असतो. त्यांत कथानकाची मर्यादा, घटनांची संभवनीयता, पात्रांचा स्वभावपरिपोष वगैरे कसलाच निर्बंध पाळलेला नसतो.

३६२ गंभीर वाङ्मयापैकीं ' इतिहास ' या शब्दाची व्याख्या शुक्रनीतींत

**' प्राग्वृत्तकथनं चैव राजकृत्य-मिषादितः ।**
**यस्मिन् स इतिहासः स्यात्पुरा वृत्तः स एव हि ॥ १॥ '**

अशी केली असून ती इकडील परंपरागत व्यक्तिप्रधान राजसंस्थेस साजेशीच आहे. अलीकडे त्या शब्दाची अर्थव्याप्ति बरीच वाढली असून " एखाद्या राष्ट्राचें किंवा समाजाचें राजकारण, व्यापार, कला, धर्म, आचारविचार, वाङ्मय, इत्यादि अनेक दृष्टींनीं कालाच्या व स्थलाच्या मर्यादेंत केलेलें यथार्थ

वृत्त-निरूपणात्मक व चिकित्सात्मक शब्दचित्र " असें तिचें साधारण स्वरूप मानितात. व्यक्तिविषयक इतिहासाला चरित्र असें म्हणतात. इतिहासापेक्षां चरित्राची व्याप्ति मर्यादित असते, व त्यांतील प्रसंगहि लहान प्रमाणांत असतात. इतिहासांतील बोध समाजाला उद्देशून तर चरित्रांतील बोध व्यक्तीला उद्देशून असतो. इतिहासांतील नीति राजकीय स्वरूपाची असते, तर चरित्रांतील नीतीची कसोटी व्यावहारिक दृष्ट्या पाहिली जाते.

३६३ निबंधाची कल्पना इकडे पाश्चात्यांच्या द्वारें आलेली आहे. " मर्यादित स्थलांत एखाद्या विषयाची केलेली मांडणी " म्हणजे निबंध. ( १ ) उपोद्घात ( २ ) विकास व ( ३ ) उपसंहार हे निबंधाचे तीन मुख्य भाग होत. उद्देशावरून ( १ ) कथात्मक, ( २ ) वर्णनात्मक, ( ३ ) विवेचनात्मक व ( ४ ) चर्चात्मक; असे निबंधाचे चार प्रकार होतात. कोणत्याहि प्रकारचा निबंध लिहिणें झाल्यास वर सांगितलेल्या तीन अंगांस धरून त्यांतील मुद्दे काढले म्हणजे लिहावयास सोय होते. टीकात्मक लेख, प्रवासवृत्तें हे सुद्धां निबंधाचेच प्रकार होत.

३६४ उद्योगधंदे, कला, शास्त्रें वगैरे भारदस्त विषयांचें निरूपण करणारे ग्रंथ ते शास्त्रीय ग्रंथ होत. अशा प्रकारचे ग्रंथ मराठींत अद्यापि म्हणण्याजोगे झाले नाहींत, तथापि इतर देशी भाषांच्या तुलनेनें मराठींत असले ग्रंथ बरेच आहेत असें म्हटलें पाहिजे. पत्रलेखनें हीं खासगी स्वरूपाचीं असतात, तथापि त्यांच्या जुनेपणाला भाषेच्या दृष्टीनें व प्रसंगाच्या दृष्टीनें एक प्रकारचें महत्त्व येतें. विशेषेंकरून ऐतिहासिक व्यक्तींचीं पत्रें इतिहासाला फार उपयोगी होतात. नियतकालिकांतील लेख हे बहुधा प्रासंगिक विषयावर लिहिलेले असतात, तथापि त्यांतील कांहीं निबंधांच्या स्वरूपाचे असतात व त्यांस कायमचें महत्त्वही येतें.

३६५ टीकात्मक लेखांत प्रायः दुसऱ्याच्या मताचें, कल्पनांचें व ज्ञानाचें इत्यादि परीक्षण करावयाचें असल्यानें दोषदर्शन ही बाब अवश्य होते. तथापि टीका नेहमीं ' मुद्देसूद, व्यापक, निर्मत्सर, विधायक व व्यक्तिगत दोषाविष्करणानें दूषित नसलेली ' अशी असावी, हा शिष्टसंप्रदाय आहे.

३६६ गद्यलेखनाचा सामान्य उद्देश ' यथार्थ ज्ञान ' हा होय. गंभीर वाङ्मय तो स्पष्ट व सरळ शब्दांत करितें व ललित वाङ्मय तो मृदुमधुर शब्दांत करितें.

पहिल्यांत मनोरंजन हें गौण अंग असल्यामुळें, साधी व यथार्थ शब्दयोजना, रसांचा अभाव, मुद्देसूद मांडणी, निःपक्षपातपणा, व सरळ कथासूत्रग्रथन हेच त्याचे गुण होतात. उलट दुसऱ्यांत मनोरंजन हें प्रधान अंग होत असल्यानें, मृदु-मधुर शब्द, रसादिकांची योजना, चटकदार भाषा, अलंकारांचा व तसल्याच अन्य साधनांचा उपयोग इत्यादि त्याचे गुण होतात. कालस्थलादिकांचें औचित्य दोहोंतही संभाळावें लागतें. एकास दुसऱ्याचे गुण मुद्दाम जोडून दिल्यास त्याची योग्यता तात्काळ कमी होते, असा त्यांच्या प्रकृतींत विरोध आहे. गंभीर वाङ्मय हा निसर्ग आहे, ललित वाङ्मय ही कला आहे. गंभीर वाङ्मयाचा परिणाम उघड असतो, ललित वाङ्मयाचा व्यंग्य असतो. गंभीर वाङ्मय राजरस्त्यानें व उजळ माथ्यानें चालतें तर ललित वाङ्मय आडवळणांनीं व नटत मुरडत जातें.

## अभ्यासपाठ १

"'राष्ट्रीय शिक्षण' या विषयावर सुमारें तीस ओळीपर्यंत निबंध लिहा." प्रथम असे मुद्दे काढावे. १ उपोद्घातः—आज त्या विषयाचें महत्व–राष्ट्रीय शिक्षणाची व्याख्या–त्या शब्दांत अंतर्भूत होणारी व्यापक कल्पना. २ इतिहास, ३ चालू शिक्षण व राष्ट्रीय शिक्षण यांतील फरक. ४ विकासः—राष्ट्रीय शिक्षणाची दिशा–त्यास येणाऱ्या अडचणी–त्या दूर करण्याचे उपाय इ०. ५ उपसंहारः—राष्ट्रीय शिक्षणानें झालेल्या फायद्याचा दाखला–त्यासंबंधी सर्वमान्य सूचना इ०.

## अभ्यास पाठ २

"वेळेचें महत्व दाखविणारा दोन अथवा तीन मुलांचा सुमारें तीस ओळी-पर्यंत संवाद लिहा." पुढीलप्रमाणें मांडणी करावी. दोन अथवा अधिक मुलें शाळेंतून घरीं चाललेलीं आहेत व त्यांतील एकादोघांस शिक्षा झाली आहे अशी भूमिका. नाटकी थाटाची भाषा. ज्यास शिक्षा झाली नाहीं अशाच्या तोंडून वेळेची बचत आपण कशी करून अभ्यास केला याचा उल्लेख.

## अभ्यास पाठ ३

"जबरदस्तीपेक्षां गोडीगुलाबीनें आपला मतलब हटकून साधतो अशा तात्पर्याची एक कल्पित गोष्ट लिहा." इसापनीतींत पुढील गोष्ट आहे. दोघांत बलिष्ट कोण या विषयीं सूर्य व वायु यांची पैज–वाटच्या वाटसरूच्या अंगावरचें घोंगडें जो बाजूस करवील तो श्रेष्ठ ही कसोटी-वायु जोरानें वाहून तें उडवायचा प्रयत्न

करूं लागला—वाटसरू अधिकच लपेटून घेऊं लागला—सूर्यानें चोरटा उकाडा उत्पन्न केला—वाटसरूनें घोंगडी आपोआप टाकली.

## अभ्यास पाठ ४

" एखाद्या इतिहासांत अलंकारिक वर्णन कुठपर्यंत घालतां येईल ? " फक्त अर्थव्यक्ति चटकदार होईल इतकेंच घालतां येईल. मजकुराचा भलताच अर्थ होईल इतकें घालतां येणार नाहीं. ' राघोबादादा पेशवे विजेच्या वेगानें मोहीम करीत ' असें म्हणतां येईल. पण ' राघोबादादा सकाळीं पुण्याहून निघून संध्याकाळीं अटकेस पोचले ' असें म्हणतां येणार नाहीं.

## अभ्यास पाठ ५

" खर्ड्याच्या लढाईवर एक कादंबरी लिहावयाची असें मानून कथानक तयार करा. " प्रास्ताविक प्रकरण—नायक ' क्ष ' व त्याचें पुण्यांतील किंवा जवळच्या एखाद्या खेड्यांतील घर—हैद्राबाद येथील दरबारांत सोंगें आणून पेशव्याची अप्रतिष्ठा—नाना फडणिसांस काळ्यांचें पत्र—लढाईची सिद्धता—नायक ' क्ष ' यांचें नायिका ' ज्ञ ' हिच्याशीं लग्न ठरलें असतां ऐन समारंभाचे वेळीं त्यास लढाईवर जाण्याबद्दल हुकूम—इत्यादि.

## अभ्यास पाठ ६

" पुढील संवादांतील दोष दाखवा. " **नाना फडणीसः**—पाटीलबुवा, सातारप्रांतांत एका पाळेगारानें बंड उभारल्याची तार आली आहे. तर तुम्ही स्वतः जाऊन तें बंड मोडलें पाहिजे. **महादजी शिंदेः**—ठीक आहे. रात्रीच्या मेलनेंच निघतों. सैन्याकरितां मात्र स्पेशल सोडावी लागेल. **नानाः**—ती व्यवस्था मी ट्रॅफिक मॅनेजरला अगाऊच कळवून केली आहे. हा खर्चाकरितां शिलोत्री बँकेवर एक लाखाचा चेक घ्या. ( चेक देतात ). **शिंदेः**—हा निघालों पहा. ( जातात ).

---

# पाठ एकोणतिसावा.

## पद्याचें वर्गीकरण.

३६७ पद्यालाच सामान्य अर्थानें वृत्त म्हणतात. ' वृत्त ' म्हणजे अक्षरांच्या संख्येच्या किंवा मात्रांच्या संख्येच्या मर्यादेंत येणारा शब्दसमूह. वृत्तांचें मुख्यतः दोन प्रकारांनीं वर्गीकरण करितात. एक अक्षर–वृत्तें व दुसरीं मात्रावृत्तें. मात्रा-वृत्तांचाच ' गणवृत्तें ' म्हणून एक भेद आहे, त्याची माहिती पुढें येईल. अक्षर–वृत्ताच्या आवर्जात किंवा चरणांत अक्षरांची विशिष्ट संख्या भरली म्हणजे कार्य होतें. तीं ह्रस्व किंवा दीर्घ, अमुकच क्रमानें आलीं पाहिजेत असा, किंवा त्यांच्या मात्रांची एकंदर संख्या अमुकच भरली पाहिजे असाही निर्बंध नाहीं. मात्रावृत्ताच्या आवर्जात किंवा चरणांत अक्षरें कितीही किंवा कशींहि आलीं तरी चालतात; फक्त त्यांच्या मात्रांची संख्या विशिष्ट भरली म्हणजे कार्य होतें.

( क ) हें वर्गीकरण, पद्याच्या व्याख्येनुरूप त्याला कालमापनाची व स्थल-सीमेची आवश्यकता असल्यामुळें झालें आहे. ' मात्रा ' म्हणजे कालाचा माप-नाच्या दृष्टीनें मानलेला सर्वांत लहान घटक. सामान्यतः मनुष्याच्या नाडीच्या एका ठोक्यास लागणाऱ्या वेळेला ' मात्रा ' असें म्हणतात. तरी पण तिचें प्रमाण इच्छेनुरूप कमी अधिक ठेवतां येतें. हें प्रमाण एकदां निश्चित केल्यावर, त्याचा सारखा प्रवाह चालू झाला म्हणजे त्यास ' लय ' असें म्हणतात. स्थलाची जी मर्यादा ठरली असेल तेथपर्यंत मात्रा मोजून झाल्या म्हणजे एक तुकडा पुरा झाला असें समजून पुन्हा पहिल्या मात्रेपासून तेवढ्याच लांबीचा दुसरा तुकडा मोजण्यास प्रारंभ करितात. अशा प्रकारच्या प्रत्येक तुकड्यास ' पद ', ' चरण, ' ' आवर्त ' किंवा ' आवर्ज ' असें म्हणतात. चरणाच्या-पहिल्या मात्रेला ' सम ' किंवा 'समीची ' जागा असें म्हणतात. कालमापनाच्या दृष्टीनें चरण नियमित मात्रासंख्येंत चालले आहेत कीं नाहींत हें पाहण्याकरितां संगीतांत ' समी ' चें महत्व असतें; कारण गायकाच्या पद्याचे चरण मृदंगवाला किंवा तबलजी ठेक्याच्या रूपानें मोजीत असतो त्यामुळें समीच्या स्थानावर

जर दोघे मिळाले नाहींत तर दोघांतून कोणाचें तरी कालमापन चुकलें आहे असें तात्काळ अनुमान होतें.

३६८ ऱ्हस्व स्वराला एक मात्रा व दीर्घ स्वराला दोन मात्रा मानिल्या आहेत. हृदयांतून आलेला स्वर मुखांतल्या एखाद्या स्थानावर येऊन व्यंजनाशीं संलग्न झाला म्हणजे त्याचा उच्चार पुरता होत असल्यानें, दोन मात्रांहून अधिक काळ एका व्यंजनस्थानावर ठरण्याची स्वराला आवश्यकताच उरत नाहीं. पण ही भाषेंतील स्वराची गोष्ट झाली. संगीतांतील स्वरांत व्यंजनोच्चार हें अंगच मुळीं गौण असल्यानें एखादा स्वर एखाद्या व्यंजनस्थानावर वाटेल तितक्या मात्रा भरून होईपर्यंत ठरूं शकतो.

३६९ एखादा स्वर मूळचा ऱ्हस्व असूनही आघातानें दीर्घ होतो. हे आघात म्हणजे अडथळे व्यंजन, विसर्ग व विराम यांनीं उत्पन्न होतात. जसें:–'दुःख,' 'चक्र,' यांत 'दु' पुढें विसर्ग आल्यानें व 'च' पुढें क् हें अर्ध व्यंजन आल्यानें त्यांतील 'उ' व 'अ' हे स्वर दीर्घ झाले आहेत. ' साम्राज्य भू–जलनिधीवरि चालवून ' या चरणांतील शेवटचा ' न ' ऱ्हस्व असला तरी त्यावर विराम असल्यामुळें तो दीर्घ झाला आहे. सारांश, अनुस्वारयुक्त स्वर, ज्यांच्यापुढें जोडाक्षर किंवा विसर्ग आला आहे असा स्वर, व वाक्याच्या किंवा चरणाच्या अखेरचा स्वर हे दीर्घच समजावयाचे असतात.

३७० मराठींत उच्चाराचा नियम संस्कृत इतकाच कडक असला पाहिजे, पण प्राकृत भाषांच्या वळणांवरून या बाबतींत मराठीस कांहीं सवलत मिळाली आहे. ती अशीः—

( १ ) कृदन्तांतील स्वर बहुधा पद्यरचनेपुरते ऱ्हस्व, दीर्घ किंवा विकृतही करतां येतात.

जसें:—' म्हणून, म्हणोनी, म्हणुनि, म्हणुनी, म्हणवुनि ' इ०

( २ ) जोडाक्षरामुळें येणारें द्वित्त्व तद्भव, देशज व परभाषीय शब्दांत मानलें जात नाहीं.

जसें:—' पेरण्यास, ' ' पाठच्या ' इ०. पण ' लावण्यास ' ( सौंदर्यास ) यांत मात्र ' व ' ला दोन मात्रा आहेत, कारण तो संस्कृत शब्द आहे. पण लाव–ण्यास ( लागू करण्यास ) येथें द्वित्त्व नाहीं.

( ३ ) अस्सल मराठी शब्दांतील अनुनासिकामुळें मागल्या स्वरास द्वित्व येत नाहीं.

जसें:—‘ भरंवसा, दुंव, जंव ’ इ०.

( ४ ) परभाषीय शब्दांतून मराठींत आलेल्या ‘ छ ’ मुळें मागल्या स्वराला द्वित्व येत नाहीं.

जसें:—‘ चिनछूट. ’ पण संस्कृत शब्दांतून आलेल्या ‘ छ ’ नें येतें. जसें:— ‘ स्वच्छ. ’

**३७१** अस्सल मराठी अक्षरवृत्तें ( १ ) अभंग, ( २ ) ओंवी व ( ३ ) घनाक्षरी हीं तीन होत. पैकीं अभंगाचे चार प्रकार आहेत ते येणेंप्रमाणें:—

| प्रकार | चरणसं. | पहिल्या चरणांत अ. | दुस. चर. अ. | तिस. चर. अ. | चव. च. अ. |
|---|---|---|---|---|---|
| १ ला | ४ | ६ | ६ | ६ | ४ |
| २ रा | २ | ८ | ८ | ० | ० |
| ३ रा | २ | ८ | ७ | ० | ० |
| ४ था | ४ | ८ | ८ | ८ | ७ |

उदाहरणें:—( १ ) **काय वानूं आतां। न पुरे हे वाणी ॥**
**मस्तक चरणीं। ठेवियेलें ॥ १ ॥** ( तुकाराम. )

या प्रकारांत दुसऱ्या व तिसऱ्या चरणांच्या अन्त्याक्षरांवर यमक असतें.

( २ ) **वसुदेव चिंता मनीं। तेज न माये गगनीं ॥ १॥**
( नामदेव. )

या प्रकारांत चरणांच्या अन्त्याक्षरावर यमक असतें.

( ३ ) **एकविधपणें राहूं। वाचे गाऊं विठ्ठल ॥** ( एकनाथ. )

या प्रकारांत पहिल्या चरणाचें अन्त्याक्षर व दुसऱ्याचें चवथें अक्षर यांचें यमक असतें.

( ४ ) **पैल मेरूचे शिखरीं। एक योगी निराहारी ॥**
**मुद्रा लावूनि खेचरी। समाधिस्थ बैसला ॥ १ ॥**
( ज्ञानेश्वर. )

या प्रकारांत पहिल्या तीन चरणांचे अखेरीस यमक असतें.

(क) **ओंवी** वृत्तांत चार चरण, पहिल्या तीन चरणांत आठ आठ अक्षरें व अन्त्याक्षरीं यमक आणि चवथ्या चरणांत चार अक्षरें असतात. जसें:—

**'तेयाचि तुलिगासवें। वीरवृत्तिचेनि थावें।**
**दिव्य शंखु भीष्मदेवें। आस्फुरिला॥ १॥** (ज्ञानेश्वर)

(ख) ओंवीचा दुसरा एक प्रकार आहे, त्यांत पहिल्या तीन चरणांत सह सहा अक्षरें असून चवथ्यांत चार असतात व तिचें वजन अभंगासारखें असतें. या ओंव्या फक्त स्त्रियांच्या तोंडीं आढळतात. जसें:—

**"यज्ञासाठीं भूमि। नांगरीतां धन्या।**
**सांपडली कन्या। सीतादेवी॥ १॥"** (मोरोपंत)

**"दारवंटां उभी। काळ्या पातळाची॥**
**उभ्या कपाळाची। तारूबाई॥ १॥"**

(ग) एका मानभावी ग्रंथांत ओंव्यांचे सोळा प्रकार उदाहरणांसह दिले आहेत.

(घ) **घनाक्षरी** छंद पहिल्या प्रकारच्या चार ओंव्या मिळून होतो. अर्थात् तिला सोळा चरण असतात. पहिल्या तीन चरणांत ओंवीप्रमाणेंच अक्षरें व यमक असून चवथ्या चरणांत मात्र अक्षरें सात असतात. प्रत्येक चौकाच्या अखेरीस यमक राखलेलें असतें. जसें:—

**अहो कैकेयी! हें काय। तुवां केलें हाय हाय॥**
**न म्हणवे तुज माय। जन्मोजन्मीं वैरिणी॥ १॥**
**सर्व जगदभिराम। वना धाडिला तो राम॥**
**केलें विख्यात कुनाम। कीं हे पतिमारिणी॥ २॥**
**तुझ्या वधें न अधर्म। तुज मारावें हा धर्म॥**
**परि निंदील हें कर्म। राम पापकारिणी॥ ३॥**
**नाहीं तरी प्राण आज्य। तुझे घालूनियां प्राज्य॥**
**जाळूनियां साम्राज्य। दाखवितों करणी॥ ४॥** (वामन)

**३७१** मराठी अक्षरवृत्तांचें इंग्रेजी वृत्तांशीं साम्य आहे. इंग्रेजी वृत्तें अवयवांच्या (Syllables) वजनाच्या ठोक्यावर मोजलीं जातात, त्याचप्रमाणें मराठी अक्षरवृत्तें अवयवांच्या म्हणजे अक्षरांच्या वजनावर नियमिलीं जातात.

ऱ्हस्व दीर्घ हा भेद दोनींतही पाहिला जात नाहीं. चरणांत विशिष्ट अवयवांची संख्या भरली म्हणजे चालतें. पण इंग्रेजींतला ' अवयव ' आणि मराठींतलें ' अक्षर ' यांच्या रचनेंत एक मोठा फरक आहे. तो हा कीं इंग्रेजींत एकंदरींत स्वरांची संख्या कमी असल्यामुळें व्यंजन च्या मानानें त्यांच्या शब्दांतील स्वरांचें प्रमाण कमी असतें यामुळें इंग्रेजींतील एखाद्या शब्दांत वर्णांची संख्या पुष्कळ दिसत असली, तरी त्या शब्दांतील अवयव म्हणजे अक्षरें थोडींच भरतात. पण मराठींत बहुधा प्रत्येक व्यंजनागणिक स्वर येत असल्यानें मराठी शब्दांत अवयव अधिक होतात. उदाहरणार्थ Perspiration ' हा बारा वर्णांचा इंग्रेजी शब्द घेऊं. त्यांत ' Per, ' ' spi, ' ' ra, ' आणि ' tion ' असे चार अवयव आहेत. पण त्याच अर्थाचा व तितक्याच बारा वर्णांचा ' घर्मोद्रवन ' हा मराठी शब्द घेतला तर त्यांत अवयव पांच आहेत. या फरकामुळें मराठींत स्वरांच्या सूक्ष्म प्रमाणांत बहुधा सारखें वांटून जाणारें शब्दांचें वजन इंग्रेजींत ठोबळ अवयवांच्या मधून वांटलें जातें; व इंग्रेजी वृत्ताची लय वजनाच्या ठोक्यावरून, व मराठी पद्याची लय मात्रेच्या विभागानें नियमिली जाते.

३७३ मराठींतील मात्रावृत्ताला ' पद ' असें मोघम नांव आहे, पण या पदाचे प्रकार पुष्कळच आहेत. त्यांतील कांहीं रागांच्या नांवावरून, कांहीं रचनेच्या रीतिवरून, कांहीं प्रसंगांच्या सूचकत्वावरून, कांहीं संगीतांतील तालांवरून व कांहीं रसोत्पादक धर्मावरून प्रसिद्ध आहेत. जसें:–' भूपाळी ' म्हणजे त्या रागांत म्हणावयाचें पद्य. ' दिंडी व साकी ' हीं विशिष्ट रचनात्मक पद्यें आहेत. ' अंगाई, पाळणे, आरत्या ' इत्यादि पद्यें ' झोंप, जन्मोत्सव, ओंवाळणें ' इत्यादि प्रसंगाचीं आहेत. ' झंपे, होन्या, धृपदें ' वगैरे पद्यें पांच मात्रा, सात मात्रा, बारा मात्रा, इत्यादि मात्रांच्या तालांचीं द्योतक आहेत. ' वीर, कडक, ' वगैरे कांहीं पदें रसांचीं सूचक आहेत, तर ' कटाव ' हा प्रायः वर्णनात्मक आहे. ' लावण्या ' बहुधा शृंगारात्मक व क्वचित् भक्तिप्रधानही असतात, तर ' फटके ' बहुधा उपदेशपर असतात. ' छकडी ' या स्त्रीपुरुषांच्या संवादात्मक लावण्या होत. ' चकवा ' हें खलाशांच्या गीताचें नांव आहे. ' पोवाडे ' बहुतकरून वीररसात्मक असतात.

३७४ इंग्रेजी कवितेंतील पद्यरचनेच्या प्रकारांना अशींच नांवें दिलेलीं आहेत. जे प्रकार अलीकडे मराठींत आले असून त्यांच्याकरितां वेगवेगळ्या पद्यांचा

उपयोग केला जातो. तो असाः—( १ ) Pastoral ग्राम्य गीतें. यांत खेडवळ संस्थांच्या वर्णनात्मक मजकूर असतो व तो कुणबाऊ मराठींत वेगवेगळ्या चालींच्या मात्रावृत्तांनीं दाखवितात. ( २ ) Descriptive किंवा वर्णनात्मक. हा प्रकार वेगवेगळ्या मात्रावृत्तांनीं व गणवृत्तांनीं मराठींत दाखवितात. ( ३ ) Narrative निवेदनात्मक. हा प्रकार इकडे जुना असून मोरोपंतादिकांनीं वेगवेगळ्या मात्रावृत्तांतून साधिला आहे. ( ४ ) Epic वीररसात्मक काव्य. हा प्रकार संस्कृतांत व मराठींत वेगवेगळ्या गणवृत्तांत साधलेला आढळतो. ( ५ ) Romantic अद्भुत. हा पौराणिक आख्यानांतून सर्व प्रकारच्या वृत्तांनीं मराठींत आलेला प्रकार आहे. ( ६ ) Ballad शाहिरीकवन. हा मराठींत पोवाड्यांच्या द्वारें व अलीकडे वेगवेगळ्या मात्रावृत्तांच्या द्वारें आला आहे. ( ७ ) Diadactic बोधपर कवन. हा प्रकारही वेगवेगळ्या वृत्तांतून विशेषतः फटक्यांतून मराठींत आला आहे. ( ८ ) Reflective मननात्मक. हा नवीन प्रकार अर्वाचीन कवींनीं वेगवेगळ्या वृत्तांतून साधला आहे. ( ९ ) Ode भावनात्मक स्तोत्र. हाही असाच एक नवीन प्रकार आहे पण अलीकडे मराठींत आला आहे. ( १० ) Elegy विलापात्मक काव्य. हा प्रकार संस्कृतांत होता व मराठींतही आहे. ( ११ ) Lyric ‘ लायर ’ नांवाच्या वाद्यावर म्हणावयाचें कवन किंवा वीणाकवन, हा प्रकार मराठींत अगदीं नवीन असून तो वेगवेगळ्या वृत्तांतून दाखविला जातो व त्यांत विचारापेक्षां विकाराचें प्राबल्य असतें. ( १२ ) Sonnet चतुर्दशपदात्मक कवन. हें मराठींत बहुधा गणवृत्तांतून साधतात, व त्याला चवदा ओळी असतात. त्यांत थोडा फरक करून हल्लीं दहा ओळींची, अठरा ओळींचीं अशींहीं कवनें करण्याची चाल पडली आहे. ह्या प्रकारांत एकामागून एक येणाऱ्या भावनांची जोडी, दोन प्रसंग व प्रसंगांनंतरची भावना दाखविलेल्या असतात. दोन्ही भावना तुल्यबळ असतात. अर्थाचें आंदोलन रचनेंतही व्यक्त होतें. ( १३ ) Burlesque नक्कल आणि Parody विडंबनात्मक रचना हे नवे प्रकार असून दुसऱ्या कवींचें व्यंग दाखवून त्यावर टीका करण्याच्या उद्देशानें रचले जातात. मराठींत हे मात्रा वृत्तांतून थोडथोडे आले आहेत. ( १४ ) Mystic गूढ काव्य हा प्रकार मराठींत जुना आहे. नामदेव, तुकारामादिकांचीं ‘ कूटें ’ यापैकींच होत. सृष्टीचे गूढ व्यापार अत्यंत व्यंग्यार्थानें सूचित

करणें हें या प्रकारांचें मुख्य रूप असून तें ज्ञानेश्वरांच्या कवितेंत उमाप पहावयास सांपडतें. अर्वाचीन कवींनीं हें भिन्नभिन्न वृत्तांतून मराठींत आणण्याचा यत्न केला आहे.

**३७५** मराठी अस्सल मात्रावृत्तें ऊर्फ ‘पदें’ हीं ‘वाचण्यापेक्षां’ ‘ह्मणण्या’च्या उद्देशानें बनविलेलीं आहेत, अर्थात् त्यांचा गायनांतील तालाशीं अधिक संबंध येतो. विशिष्ट तालाची जी मात्रासंख्या तिच्या एक किंवा अनेक आवर्जांनीं भागतां येईल इतकी आपल्या चरणांतील मात्रासंख्या ठेवून, व त्या तालाच्या वजनास अनुसरून आपल्या चालीचें वजन राखून मराठी मात्रावृत्त चालतें. क्वचित् तालाच्या आवर्जांनीं जर पद्याच्या चरणांत असलेल्या मात्रासंख्यांचा भाग तुटत नसेल तर आवश्यक जागीं जरूर तेवढा स्वरांचा विराम करून मात्रासंख्या भरून दाखवावी लागते. उदाहरणार्थ, **दिंडी** हें २४ मात्रांचें वृत्त आहे, व सहा मात्रांच्या ‘दादरा’ या तालाचे दिंडीच्या एका चरणांत चार आवर्ज व्हावे लागतात. पण दिंडीच्या प्रत्यक्ष रचनेंत एकोणीसच मात्रा ठेवलेल्या असतात. अर्थात् राहिलेल्या पांच मात्रा विरामांनीं भरून काढूनच दिंडी म्हणावी लागते; जसें:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (क) हंस | मिळणें हें | कठिण मही | लो ऽ ऽ ऽ ऽ | कीं ऽ |
| ४,५,६ | १,२,३,४,५,६ | १,२,३,४,५,६ | १,२,३,४,५,६ | १,२,३ |
| सो नि | या चा तो | न व ल हें वि | लो ऽ ऽ ऽ ऽ | कीं ऽ |
| ४,५,६ | १,२,३,४,५,६ | १,२,३,४,५,६ | १,२,३,४,५,६ | १,२,३ |

(ख) साकी, हें बत्तीस मात्रांचें वृत्त असून, त्यांत प्रत्यक्ष मात्रा सव्वीसच असतात, सबब ‘धुमाळी’ ह्या आठ मात्रांच्या तालांचे चार आवर्ज पुरे होण्यासाठीं त्याच्या चरणांत सहा मात्रा विराम करावा लागतो.

| | | | |
|---|---|---|---|
| चं द्र का न्त रा | जा ची क न्या | स गु ण रू प खा | णीऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ। |
| १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८। |

(ग) हिंदुस्थानी चिजांवरून बनविलेल्या पदांतही असला प्रकार आढळतो. जसें:—

| | | | |
|---|---|---|---|
| “दे हा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ | ता ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ। |
| १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८। |
| ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ शरणाग । ता इ० ” | | |
| १,२,३,४,५,६,७,८ | १,२,३,४,५,६,७,८। १ | | |

**३७६** संस्कृत मात्रावृत्तांपैकीं दोन मात्रावृत्तें मराठींत विशेष उपयोगांत आलीं आहेत. तीं दोन्ही ' गावयाच्या ' किंवा ' म्हणावया'च्या कामीं उपयोगांत न आणतां ' वाचावया'च्या उपयोगीं लावण्याचा विशेष प्रचार असल्यामुळें त्यांच्या मात्रा विरामांनीं वाढविण्याचा प्रसंग येत नाहीं. हीं वृत्तें येणेंप्रमाणें:—

| वृत्ताचें नांव. | चरणसंख्या. | प. च. मात्रा. | दुस.चर.मात्रा. | तिस.च.मा. | चौ. च. मा. |
|---|---|---|---|---|---|
| १ आर्या | ४ | १२ | १८ | १२ | १५ |
| २ गीति | ४ | १२ | १८ | १२ | १८ |

उदाहरणें:--( १ ) **आर्येच्या प्रथम पदीं ।**
**द्वादश मात्रा, तशाच तिसऱ्याला ॥**
**अष्टादश दुसऱ्याला ।**
**मात्रा चवथ्यास पंचदश ॥ १ ॥**

( २ ) **जामानिमा तुमाना ।**
**कंठीं घालूनि चांगल्या माळा ॥**
**नटला नटसा, परि त्या ।**
**हरिकीर्तन नावडे गुलामाला ॥ २ ॥** ( मोरोपंत )

( क ) मोरोपंती आर्या बहुतेक ' गीति ' वृत्तांत असूनही त्यांना ' आर्या ' म्हणण्याचा प्रघात पडला आहे. आर्येच्या या दोन प्रकारांशिवाय आणखीहि कांहीं प्रकार मोरोपंतानें उपयोगांत आणले आहेत, पण ते फार विरळ आहेत.

( ख ) मोरोपंती आर्या हरिदास लोक कथाकीर्तनांत म्हणतात त्यावेळीं तालाशीं मिळत्या करून घेण्याकरितां विरामांनीं वाढवितात, पण तो प्रकार कृत्रिम असून आर्यावृत्त हें मराठी ' पदाप्रमाणें ' तालाच्या वजनानें जाणारें वृत्त नाहीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

**३७७** मराठींत पद्यरचनेचे नियम कडक रीतीनें असे एकट्या मोरोपंतानें, व बऱ्याच शिस्तींत असे तुकाराम, ज्ञानेश्वर, विठोबा अण्णा दप्तरदार, राजाराम प्रसादी इत्यादि वेचक मंडळींनीं पाळलेले आढळतात. इतरांनीं अक्षरवृत्तें, मात्रावृत्तें व गणवृत्तें या सर्वांतून रचनेचे दोष केलेले आहेत. पण 'वृत्त हा वाक्याला दिलेला एक प्रमाणबद्ध देह असल्यामुळें ' अक्षरें किंवा मात्रा कमी अधिक

करणें, शब्दांची ओढाताण करणें, दीर्घऱ्हस्वादि स्वरांचें आकारमान बिघडविणें' इत्यादि प्रकार हे रचनेंतले मोठे दोष होत व ते वृत्ताचा डौल बिघडवितात, हें उघड आहे.

## अभ्यास पाठ १

**" हें कोण बोललें बोला। राजहंस माझा निजला ॥'**

या ओळींतल्या मात्रा मोजून त्या ' धुमाळी ' या आठ मात्रांच्या तालाशीं मिळत्या व्हावयास काय केलें पाहिजे तें सांगा. "

वरील ओळींत मात्रा २+२+१+२+१+२+२+२ । २+१+२+१+२+२+१ +१+२ मिळून अठ्ठाविस आहेत. सबब त्यांत चार मात्रा विरामांनीं वाढविल्या म्हणजे धुमाळीच्या चार आवर्जांशीं त्या मिळत्या होतील.

## अभ्यास पाठ २

" घोड्याची, मारी, देखोनी, चाकरी, बदाबदा, लागे, गाईसी, गोड " या शब्दांपासून पहिल्या प्रकारच्या अभंगाची ओळ तयार करा.

या शब्दांत यमक साधण्याजोगे शब्द दोनच आहेत.

ते ' मारी ' व ' चाकरी ' हे होत. अर्थात् हे दुसऱ्या चरणाचे अखेरीस व तिसऱ्या चरणाचे अखेरीस अनुक्रमें आले पाहिजेत ( कलम ३६९, १. ) ' बदा-बदा ' हें क्रियाविशेषण ' मारी ' जवळ ठेवलें आणि ' गाईसी देखोनी ' यांचा व त्यांचा अन्वय केला म्हणजे

**' गाईसी देखोनी। बदाबदा मारी ॥**
**घोड्याची चाकरी। गोड लागे '**

अशी ओळ लावणें सोपें आहे.

## अभ्यास पाठ ३

" आर्येच्या एका सबंध ओळींत १२–१८ अशा तीस मात्रा असतात. त्या मात्रांबद्दल तीस ऱ्हस्व अक्षरें असावयास पाहिजेत. असें असतां मोरोपंतांच्या ' लघ्वक्षर रामायणांत ' एका आर्येच्या ओळीमध्यें ' दशमुखवधमति विधिसुरनुत-पद जगदधिप अजित वरद हरि ' अशीं एकोणतीसच अक्षरें कां ? " ओळीच्या

अखेरचें अक्षर ऱ्हस्व असलें तरी त्यास दोन मात्रा असल्यामुळें तीस अक्षरें घालणें शक्य नाहीं. ( कलम ३६७ ).

### अभ्यासपाठ ४.

" **न्याहरिचा वकुत होईल। मैतरिणी बेगिबिगि चाल** " ह्या 'यशवंत' कवीच्या पद्यांत इंग्रजींतल्या कोणत्या कवनप्रकाराचें अनुकरण आहे ?" यांत शेतकऱ्याच्या परिस्थितीचें सुंदर वर्णन असल्यामुळें हें पद 'Pastoral ग्राम्यगीतांत' मोडेल ( कलम ३७२, १ ).

### अभ्यासपाठ ५.

" एका मुलाला सारख्या प्रमाणांत तीन मोरोपंती आर्या म्हणावयाला दीड मिनिट लागतें, तर त्याच्या मात्रेचें प्रमाण काय आहे ? " तीन आर्यांत मिळून १८० मात्रा होतात, व त्या उच्चारावयास ९० सेकंडें लागलीं, यावरून त्याची मात्रा दोन सेकंडांची आहे.



# पाठ तिसावा.



## गणवृत्तें.



३७८ गणांची कल्पना वैदिक कालापासून प्रचलित आहे. " 'गण' म्हणजे विशिष्ट मात्रांनीं मर्यादिलेला, विशिष्ट क्रमानें आलेल्या ऱ्हस्व दीर्घादि अक्षरांनीं बनविलेला व ज्याचें वजन व आकार निश्चित झाला आहे असा शब्दाचा साचा किंवा देह." आदि, मध्य, व अन्त, या तिन्ही अवस्था दर्शविण्याच्या हेतूनें गणाची रचना तीन अक्षरांची मानलेली आहे, तथापि वृत्ताच्या चरणांत तीन अक्षरी गणांचे भाग तुटून एखाद दुसरें अक्षर सुटें राहिल्यास तें मोजण्याकरितां एकाच ऱ्हस्व अक्षराचा एक, व एकाच दीर्घ अक्षराचा एक असे दोन वेगळे वेगळे मूलभूत गण मानिले आहेत. गणांचे सांचे नियमित झालेले असल्यामुळें त्यांच्या मात्राही निश्चितच असतात, म्हणून गणवृत्तांत मात्रामापन हा भाग गौण होतो. त्याचप्रमाणें गणांचें वजन व आकारमान हींही निश्चितच असल्यामुळें त्यांच्या मात्रासंख्येइतक्या दुसऱ्या रचनाप्रकारानें त्या विशिष्ट गणाचें काम होऊं शकत नाहीं.

३७९ गणांची कल्पना वेदकालीन असली तरी गणांच्या रचनेला नियमित करून वजनदार वृत्तांत वैदिक छंदांची रचना केलेली आढळत नाहीं. किंबहुना वैदिक छंदांचें वजन अक्षरांच्या आकारमानापेक्षां स्वरोच्चाराच्या पद्धतीला अधिक अनुसरून असतें असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. गणांनीं नियमित केलेल्या सारख्या ओळींच्या एक किंवा दोन जोड्या लावून बांधेसूद वृत्त बनविणें ही कल्पना पौराणिक कालीं निघालेली व त्यानंतर अलीकडच्या संस्कृत साहित्यकारांनीं पूर्णावस्थेस नेलेली आहे. मराठींत हीं गणवृत्तें विठ्ठल बीडकर, मुक्तेश्वर, वामन इत्यादि मंडळींनीं आणलीं, पण त्यांचा निर्दोष उपयोग मोरोपंतानेंच केला आहे.

३८० गणांच्या लिपींत ऱ्हस्व अक्षराचें लेखन '⏑' या खुणेनें व दीर्घ अक्षराचें लेखन '—' या खुणेनें करितात. अर्थात् गणांचा निर्देश या खुणाक्रमानें

भाडून होतो. तीन अक्षरांचे आठ व एक अक्षराचे दोन मिळून पुढीलप्रमाणें एकदर दहा गण आहेत.

| गण | मात्रासंख्या | आकार | लक्षणशब्द | रूपाचें वर्णन |
| --- | --- | --- | --- | --- |
| १ म | ६ | – – – | मानावा | तीन्ही अक्षरें दीर्घ. |
| २ य | ५ | ‿ – – | यमाचा | पहिलें अक्षर मात्र ऱ्हस्व. |
| ३ र | ५ | – ‿ – | राधिका | मधलें अक्षर मात्र ऱ्हस्व. |
| ४ स | ४ | ‿ ‿ – | समरा | शेवटचें अक्षर मात्र दीर्घ. |
| ५ त | ५ | – – ‿ | ताराप | शेवटचें अक्षर मात्र ऱ्हस्व |
| ६ ज | ४ | ‿ – ‿ | जनास | मधलें अक्षर मात्र दीर्घ. |
| ७ भ | ४ | – ‿ ‿ | भास्कर | पहिलें अक्षर मात्र दीर्घ. |
| ८ न | ३ | ‿ ‿ ‿ | नमन | सर्व अक्षरें ऱ्हस्व. |
| ९ ल | १ | ‿ | ल | एक ऱ्हस्व अक्षर. |
| १० ग | २ | – | ग | एक दीर्घ अक्षर. |

( क ) पुढील आर्येंत गण लक्षण-शब्दांसह सांगितले आहेत.

**“ मानावा म, यमाचा य, राधिका र, समरा स, ताराप ॥**
**त, भ भास्कर, नमन न, ज जनास, ल–गा लघुगुरू, गणव्याप ॥१॥”**

**३८१** म्हणते वेळीं, वृत्त मोठें असल्यास दोन व मध्यम असल्यास एक जागीं तरी विसांवा घेण्यास थांबावें लागतें. या जाग्यास ‘ यतीची जागा, ’ व विरामास ‘ यति ’ असें म्हणतात. यतीच्या जाग्यावर जर शब्द पुरा झाला नाहींच तर निदान शब्दाच्या वजनाचा मध्यभाग तरी समान तुटावा, असा निर्बंध कालिदासादि शिष्टांनीं व मोरोपंतादि शिष्टांनींही पाळला आहे. पण तसें न होतां, जर यतीच्या जागेवर शब्द प्रमाण सोडून तुटूं लागेल तर तो ‘ यतिभंगाचा ’ दोष मानला जातो. जसें:—

( १ ) ‘ कशासाठीं मी रो—दन तुजपुढें आज करितों ! ’ यांत ‘ रोदन ’ शब्द प्रमाण सोडून तुटल्यामुळें यतिभंग अक्षम्य आहे.

( २ ) ‘ कशासाठीं संभा-वित जन अहोरात्र झटती ’ यांत ‘ संभावित ’ शब्द वजनाच्या मध्यावर तुटल्यामुळें हा यतिभंग क्षम्य आहे. पण,

( ३ ) ‘ कशासाठीं सारे जन वद अहोरात्र झटती ’ या रचनेंत यतीच्या जागीं शब्द पुरता झाल्यानें ही रचना अगदीं निर्दोष आहे.

३८१ गणवृत्तांचे ' समवृत्तें, ' ' अर्धसमवृत्तें, ' व ' विषमवृत्तें ' असे तीन भेद आहेत. ज्या वृत्तांचे चारी चरण सारखे तीं ' समवृत्तें; ' ज्यांचे पहिला व तिसरा आणि दुसरा व चवथा, असे चरण सारखे असतात तीं अर्धसमवृत्तें; व ज्यांचे चारी चरण विषम असतात तीं विषम वृत्तें होत. मराठींत रूढ झालेल्या आणि विशेष प्रचारांत असणाऱ्या वृत्तांची माहिती पुढें दिली आहे.

## ( क ) समवृत्तें.

| वृत्त. | अक्षरसंख्या. | यति. | गण. | लक्षणपंक्ति. |
|---|---|---|---|---|
| १ माणवक | ८ | · | भ, त, ल, ग | माणवकीं भातलगा । |
| २ विद्युन्माला | ८ | · | म, म, ग, ग | मा-मा-गा-गीं-विद्युन्माला । |
| ३ अनुष्टुप् | ८ | · | | अनुष्टुप् आठ अक्षरीं । |
| ४ कामदा | १० | ५ | र, य, ज, ग | कामदा बने तीं र-या-ज-गीं |
| ५ शुद्धकामदा | ११ | ६ | न, र, र, ल, ग | न-र-र-ला-ग हे शुद्ध कामदीं । |
| ६ इंद्रवज्रा | ११ | · | त, त, ज, ग, ग | ती इंद्रवज्रा त-त-जा-ग- गांहीं । |
| ७ उपेंद्रवज्रा | ११ | · | ज, त, ज, ग, ग | उपेंद्रवज्रा ज-त-जा-ग-गांहीं । |
| ८ शालिनी | ११ | ४ | म, त, त, ग, ग | मा-ता-ता-गा गा-गणीं शालिनी ती। |
| ९ दोधक | ११ | · | भ, भ, भ, ग, ग | दोधक भा-भ-भ-गा-ग गणांनीं । |
| १० रथोद्धता | ११ | · | र, न, र, ल, ग. | रा-न-रा-ल-ग गणीं रथोद्धता । |
| ११ स्वागता | ११ | · | र, न, भ, ग, ग. | स्वागता र-न-भ-गा-ग-गणांनीं । |
| १२ भुजंगप्रयात | १२ | ६ | य, य, य, य. | भुजंगप्रयातीं ' य ' हे चार येती । |
| १३ द्रुतविलंबित | १२ | · | न, भ, भ, र. | द्रुतविलंबित ना-भ-भ-रा गणीं । |
| १४ वंशस्थ | १२ | · | ज, त, ज, र. | सुवृत्त वंशस्थ ज-ता-ज-रा गणीं। |
| १५ इंद्रवंशा | १२ | · | त, त, ज, र. | ती इंद्रवंशा त-त-जा-र या गणीं। |
| १६ तोटक | १२ | · | स, स, स, स. | जरि चार 'सकार'हि तोटक तें । |
| १७ स्त्रग्विणी | १२ | · | र, र, र, र. | चार 'रा' येउनी होतसे स्त्रग्विणी । |
| १८ प्रमिताक्षरा | १२ | · | स, ज, स, स. | प्रमिताक्षरेंत गण सा-ज-स-सा । |
| १९ प्रभावती | १३ | ४,९. | ज, भ. स, ज, ग. | प्रभावती ज-भ-स-ज-गा गणीं बने । |
| २० मंजुभाषिणी | १३ | · | स, ज, स, ज, ग | स-ज-सा-ज-गा मिळुनि मंजुभाषिणी । |
| २१ प्रहर्षिणी | १३ | ३ | म, न, ज, र, ग. | मा-ना-जा-र-ग गण हे प्रहर्षिणीचे । |
| २२ मत्तमयूर | १३ | ४ | म, त, य, स, ग. | मा-ता-या-सा-गा मिळुनी मत्तमयूरीं । |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २३ | विभावरी | १३ | ० | न, भ, ज, ज, ग | न-भ-ज-जा-ग गणयुक्त विभावरी। |
| २४ | वसंततिलका | १४ | ० | त, भ, ज, ज, ग, ग | होते वसंततिलका त-भ-जा-ज-गा-गीं। |
| २५ | मालिनी | १५ | ८ | न, न, म, य, य. | न-न-म-य-य गणांनीं मालिनी वृत्त होतें। |
| २६ | चामर | १५ | • | र, ज, र, ज, र. | चामरांत रा-ज-रा-ज-रा असे विराजती |
| २७ | पंचचामर | १६ | • | ज, र, ज, र, ज, ग. | ज-रा-ज-रा-ज-गा मिळून पंचचामरीं गण। |
| २८ | शिखरिणी | १७ | ६ | य, म, न, स, भ, ल, ग. | य-मा-ना-सा-भा-ला-ग गण। मिळुनीयां शिखरिणी। |
| २९ | पृथ्वी | १७ | ८ | ज, स, ज, स, य, ल, ग. | ज-सा-ज-स-य-ला-ग हे गण मिळून पृथ्वी बने। |
| ३० | हरिणी | १७ | ६,१०. | न, स, म, र, स, ल, ग | मिळति हरिणीमध्यें ना-सा-म-रा-स-ल-गा गण। |
| ३१ | मंदाक्रान्ता | १७ | ४,१०. | म, भ, न, त, त, ग, ग. | मंदाक्रान्ता म-भ-न-त-त-गा-गा-गणीं सिद्ध होते। |
| ३२ | विबुधप्रिया | १८ | • | र, स, ज, ज, भ, र | रा-स-जा-ज-भ-रा असे मिळुनी बने विबुधप्रिया। |
| ३३ | शार्दूलविक्रीडित | १९ | १२. | म, स, ज, स, त, त, ग. | मा-सा-जा-स-त-ता-ग हे गण भले शार्दूलविक्रीडितीं। |
| ३४ | स्रग्धरा | २१ | ७,१४, | म, र, भ, न, य, य, य. | मा-रा-भा-ना-य-या-या गण मिळुनि असे स्रग्धरा वृत्त होतें। |
| ३५ | अमृतध्वनि | २२ | • | त, भ, य, ज, स, र, न, ग. | रम्यामृतध्वनि त-भा-या-ज-सा-र-न-ग ऐशा गणीं प्रकटते। |
| ३६ | मंदारमाला ऊर्फ अश्वधाटी | २२ | • | त, त, त, त, त, त, त, ग. | मंदारमाला त-ता-ता-त-ता-ता त-गा ह्या गणीं होय रम्याकृति। |
| ३७ | उमा | २२ | • | भ, भ, भ, भ, भ, भ, भ, ग. | होय उमा भ-भ-भा-भ-भ-भा-भ ग हे गण येति जिच्या चरणीं। |
| ३८ | मदिरा | २३ | • | भ, भ, भ, भ, भ, भ, भ, ग, ग | भा-भ-भ-भा-भ-भ-भा-ग-ग हे। गण येउनियां मदिरा सजताहे। |

## (ख) अर्धसमवृत्तें

| | | | |
|---|---|---|---|
| ३९ माल्यभारा. | ११ | स, स, ज, ग, ग | विषमीं स-स-जा-ग-गा, समानीं । |
| | १२ | स, भ, र, य. | स-भ-रा-या गण माल्यभारवृत्तीं ॥ |
| ४० वियोगिनी | १० | स, स, ज, ग | विषमीं स-स-जा-ग हे, समीं । |
| | ११ | स, भ, र, ल, ग | स-भ-रा-ल-ग, तदा वियोगिनी ॥ |
| ४१ पुष्पिताग्रा | १२ | न, न, र, य | विषम चरण ना-न-रा-य-शाली, । |
| | १३ | न, ज, ज, र, ग | सम न-ज-जा-र-ग-युक्त पुष्पिताग्रीं। |

## (ग) विषम वृत्तें.

| | | | |
|---|---|---|---|
| ४२ उद्गता प. चरण | १० | स, ज, स, ल. | पहिल्या पदांत स-स-जा-ल, |
| दु० च० | १० | न, स, ज. ग | न-स-ज-ग दुज्यांत, भा-न-जा- |
| ति० च० | ११ | भ, न, ज, ल. ग | ला-ग मिळुनि तिसऱ्यांत, पुढें |
| च० च० | १३ | स, ज, स, ज, ग | स-ज-सा-ज-गा जमुनि उद्गता बने |

**३८३** वर दिसेल्या वृत्तांशिवाय आणखी पुष्कळच संस्कृत गणवृत्तें आहेत, व त्यांतलीं कांहीं मराठींत आलेलींही आहेत. पण त्यांचा विशेष प्रचार नसल्या-मुळें तीं येथें दिलीं नाहींत. वर दिलेल्या वृत्तांचें पृथक्करण करून पाहिल्यास असें दिसून येईल कीं, गणांची बेरीज, वजाबाकी व उलटापालट यांवरून बहुतेक वृत्तें बनलीं आहेत. उदाहरणार्थ 'प्रमाणिका' नांवाच्या वृत्ताची दुप्पट म्हणजे 'पंचचामर' वृत्त होय. 'सोमराजी' चे दोन चरण मिळून भुजंगप्रयाताचा एक चरण होतो. 'वसंततिलके' च्या चार अक्षरांनंतरचीं तीन अक्षरें काढून टाकलीं म्हणजे 'इंद्रवज्रा' शिल्लक राहते. 'स्रग्धरा' वृत्तांतील चार अक्षरांपुढची चार अक्षरें गाळलीं म्हणजे 'मंदाक्रान्ता' शिल्लक राहते. 'शिखरिणी'चीं अक्षरें मागें पुढें करून 'हरिणी' ची ओळ होते, इत्यादि.

**३८४** सजातीय वृत्तांच्या जोडींचें मिश्रण करून 'उपजाति' करण्याची वहि-वाट संस्कृत कवींनीं पाडली असून ती मराठी कवींनींही प्रचारांत आणलेली आहे. 'इंद्रवज्रा-उपेंद्रवज्रा', 'वंशस्थ-इंद्रवंशा', 'स्वागता-रथोद्धता' 'असंबाधा–मध्यक्षामा' इत्यादि जोड्या असें मिश्रण करावयास चांगल्या आहेत सामान्यतः ऱ्हस्वदीर्घ मिश्र अक्षरें ज्यांत येतात, ज्यांचे तुकडे वजनदार पडतात, ज्यांच्यांत यती सहज येतो अशींच वृत्तें रचनेस सोपीं व म्हणूनच विशेष प्रचारांत आहेत.

**३८५** मात्रावृत्तांहून गणवृत्तें अवघड आहेत हें उघड आहे. मात्रावृत्तांत नुसत्या मात्राच भरावयाच्या असल्यामुळें सामान्यतः कोणताही शब्द कोणत्याही

ठिकाणीं बसूं शकतो, पण गणवृत्तांत अक्षरांचा विशिष्ट क्रमच राखावयाचा असल्यामुळें एखादा शब्द गणांच्या आकारमानांत बसेनासा होऊन अडचण पडते व मग अर्थहानि होऊं न देतां प्रकारान्तरानें रचना करणें कठिण होतें; उदाहरणार्थ, 'तो प्रस्रवण पर्वतास आला' हा मजकूर वसंततिलकेंत सांगावयाचा आहे असें समजूं. 'प्रस्रवण' हें नांव त्या वृत्तांत कुठेंही बसण्याजोगें नाहीं, आणि छंदोभंग तर होऊं द्यावयाचा नाहीं, अशा स्थितींत हें एरवीं उत्कृष्ट असलेलें वृत्तही प्रसंगीं निरुपयोगी होऊन 'तो पातला स्रवणनाम नगा प्र-पूर्वा' (वनविहार) अशी क्लिष्ट रचना करणें भाग पडलें. वृत्तरचनेसंबंधीं पुढील गोष्टी अवश्य ध्यानांत ठेवण्याजोग्या आहेत.

(१) वृत्तरचना करितांना गणवृत्ताची निवड भाषेवर चांगली सत्ता असल्याविना सहसा करूं नये. कदाचित् केल्यास प्रचारांतील सोपीं वृत्तें घ्यावीं.

(२) छंदोभंग केव्हांही होऊं देऊं नये. 'अपि माषं मषं कुर्यात् छंदोभंगं न कारयेत्' असा साहित्यवेत्त्यांचा कटाक्ष आहे.

(३) उद्दिष्ट मजकुरांत जीं विशेषनामें असतील तीं ज्यांत बसूं शकतील असेंच वृत्त निवडावें, कारण इतर शब्दांना पर्याय शब्द सांपडतात तसे विशेषनामांना सांपडत नाहींत.

(४) एकादा मजकूर आपण योजलेल्या पद्धतीनें बसेनासा झाला म्हणजे तो तसाच जबरीनें वृत्तांत बसविण्याचा प्रयत्न करूं नये. शब्द मागें पुढें करून, पर्याय शब्द घालून, किंवा रचनेचा प्रकार बदलून सर्व प्रकारच्या अडचणी हटकून टाळतां येतात.

(५) एखाद्या वृत्ताला गणाचे नियम नाहींत एवढ्याकरितां हवे तसे शब्द घालून वृत्ताचें वजन मोडूं नये. उदाहरणार्थ 'अनुष्टुप्' वृत्ताला गणाचे नियम नाहींत म्हणून सात दीर्घ अक्षरें प्रथम घालून मग एक ऱ्हस्व घालणें, असले प्रकार करूं नयेत.

(६) 'अर्थ' हा आत्मा व 'वृत्त' हें शरीर, हें नातें नेहमीं ध्यानांत ठेवावें. सर्वांत अर्थाला अधिक जपावें, त्याच्या खालोखाल वृत्ताला जपावें, व तीं दोन्ही संभाळून अलंकार, यमकें इत्यादिकांना जपावें.

(७) रचना करितांना व्याकरणाला सोडून अपप्रयोग होऊं देऊं नयेत.

३८६ पद्यरचनेंतील ठळक दोष पुढीलप्रमाणें आहेतः—( १ ) कर्णकठोर, अप्रसिद्ध किंवा क्लिष्ट शब्दांचा उपयोग. ( २ ) व्याकरणदृष्ट्या अशुद्धरचना ( ३ ) शब्दांची ओढाताण ( ४ ) भिन्नभाषीय शब्दांचे समास ( ५ ) मिश्र शब्दयोजना; म्हणजे प्रौढ शब्द आणि ग्राम्य शब्द यांची भेसळ ( ६ ) एकाच शब्दाचा एकाच अर्थानें पुन्हां पुन्हां उपयोग. ( ७ ) 'च', 'हि' इत्यादिकांचा पादपूरणार्थ उपयोग. ( ८ ) रसाला प्रतिकूल वृत्तयोजना. ( ९ ) शब्दांचें अवास्तव व अर्थशून्य अवडंबर इ०.

३८७ पद्यरचनेंतले ठळक गुण येणेंप्रमाणेंः—( १ ) मृदु, ललित व प्रचारांतील शब्दयोजना. ( २ ) व्याकरणशुद्धता. ( ३ ) सफाईदार, व सुबोध अर्थसिद्धि ( ४ ) वेचक व व्यंजक शब्दांचा उपयोग. ( ५ ) औचित्य म्हणजे प्रसंगाला अनुरूप अशी भाषा व वृत्त यांची निवड ( ६ ) रचनेचा सहजपणा इ०.

## अभ्यास–पाठ १ ला.

" पाषाणांतुनि गांग हें उदक हें कवितारुपें संभवे " या श्रीवेणाबाईच्या वृत्तचरणांत रचनेचे दोष कोणते आहेत तें सांगा व ते दूर करा. " वजनावरून व डोलावरून हा शार्दूल-विक्रीडिताचा चरण आहे व त्यांत एक अक्षर अधिक आहे, व तें ' कवि ' हीं दोन ऱ्हस्व अक्षरें एका दीर्घ अक्षराबद्दल पडल्यामुळें आलें आहे. तेथें ' काव्य ' हा शब्द घालून पुढें ' स्वरूपें ' व अखेरीस " स्रवे " असे शब्द घालून जोडल्यानें ' रूपें ' असा शब्द योजून झालेली ओढाताण दूर होऊन अक्षराचीही बचत होईल. जसेंः— पाषाणांतुनि गांग हें उदक हें काव्यस्वरूपें स्रवे. अद्यापि यांत एक दोष राहिला आहे तो ' हें ' शब्दाची एकाच अर्थीं पुनरुक्ति हा होय ( ३८६, ६ ). तो काढण्यासाठीं ' जान्हवेयजल हें ' किंवा ' गांग रम्य जल हें ' किंवा ' गांग वारि बरवें ' असें कांहीं तरी म्हणावें.

## अभ्यासपाठ दुसरा.

' किष्किंधा ', ' सुग्रीव ' व ' ऋष्यमूक ' हे तिन्ही शब्द कोणत्या वृत्ताच्या एकाच ओळींत बसतील ? पहिल्या शब्दाचा 'म' गण आहे, व दुसऱ्याचा 'त' गण आहे. तिसऱ्यांत आरंभीं 'र' गण असून पुढें ऱ्हस्व अक्षर आहे. इतक्या अडचणी संभाळणारें वृत्त ' स्रग्धरा ' आहे. सबब हे शब्द

**' किष्किंधा ऋष्यमूकानिकट कपि-पुरी, तेथ सुग्रीव राजा ॥ '**

अशी त्या वृत्ताची ओळ तयार करून घालतां येतील. मात्र असें करतांना ' ऋष्यमू ' पुढचा ' क ' त्या वृत्ताच्या डौलानुसार दीर्घ करावा लागला आहे.

## अभ्यासपाठ तिसरा.

" म्हणुनी, मीना, हरिजनचि, न, राहे, नुरविति, खळ, सखे, यां, त्यजिती, पदीं, न, निववविति, खरे, नदी, हे, जरी, नमितां, न, दरा, नमीना, खेद " इतक्या शब्दांपासून मोरोपंती पुष्पिताग्रा वृत्ताचा श्लोक बनवा. मोरोपंताच्या अभिरुची-प्रमाणें त्याचें यमक मोठें पाहिजे. तशीं पुष्पिताग्रेच्या अखेरीस बसण्याजोगीं यमकें यांत ' सखे दरा हे--न खेद राहे ' व ' पदीं नमीना-नदी न मीना ' हीं दोन आहेत. राहिल्या शब्दांतून पुष्पिताग्रेच्या डौलानुरूप विषम चरणांत प्रथम सहा अक्षरें ऱ्हस्व पुरविणारे शब्द ठेवून ' हरिजनचि खरे ', ' निवविति न जरी ' असे विषम चरणांचे प्रारंभ होतील. राहिलेला मजकूर भरून

**" हरिजनचि खरे सखे, दरा हे ।**
**नुरविति यां नमितां न खेद राहे ॥**
**निवविति, न जरी पदीं नमीना ।**
**खळ म्हणुनी त्यजिती नदी न मीना ॥ १ ॥**

असा श्लोक होईल.

## अभ्यासपाठ ४.

' अमृतहि पितां न स्वास्थ्याला वरील गदी क्षण ' या ' हरिणी ' वृत्ताच्या चरणाचा ' शिखरिणी ' चरण बनवा. शिखरिणीचे चरण ' य, म, न, स, भ, ल, ग ' हे आहेत. वरच्या ओळींत 'म' गण एकच आहे व त्याच्या आधीं घालण्या-जोगा ' य ' गण मुळींच नाहीं. तथापि ' वरील ' हा ' ज ' गण आहे व त्याच्यापुढें ' स्वास्थ्याला ' हा शब्द ठेवल्यास जोडाक्षरानें मिळणाऱ्या द्वित्वाचा फायदा मिळून ' ज ' चा ' य ' गण होईल. अर्थात् ' वरील स्वास्थ्याला ' अशी सुरवात होईल. पुढें शिखरिणीच्या डौलाप्रमाणें पांच ऱ्हस्व अक्षरें घालून व बाकीचा मजकूर अखेरीस बेतानें ठेवून " वरील स्वास्थ्याला अमृतहि पितां न क्षण गदी " अशी ओळ होईल.

---

# पाठ एकतिसावा.

## काव्य.

३८८ काव्य हा साहित्याचा भाग नसून तें त्याचें एक विशिष्ट रूप आहे. कलांत ज्याप्रमाणें संगीत त्याप्रमाणें वाङ्मयाच्या क्षेत्रांत काव्य हें अनादि काळापासून अग्रमान मिळवून राहिलें आहे. आणि इतक्या दीर्घ परिचयानंतरही त्याची सर्वसंमत व्याख्या अद्याप कोणाला करितां आली नाहीं. ब्रह्माचें ज्याप्रमाणें वेदांनीं ' नेति, ' ' नेति, ' असें वर्णन नकारात्मक करून अखेर अनुभवावरच हवाला दिला आहे, तसाच कांहींसा प्रकार काव्याचा झाला आहे. काव्याची व्याख्या संस्कृत साहित्यकारांनीं ' चमत्कृतिजनकं रसात्मकं वाक्यम् ' अशी लक्षणात्मक केली असून, प्रख्यात इंग्रज रसिक कॉलेरिज यानें "Poetry is the blossom and fragrance of all human knowledge, human thoughts, human passions, emotions and language" अशी काव्याची लक्षणा केली आहे. शेक्सपियरनें " The poets' eye in a fine frenzy rolling, doth glance from heaven to earth from earth to heaven, and as imagination bodies forth the forms of things unknown, the poet's pen turns them to shapes and gives to airy nothings a local habitation and a name" अशा प्रकारें कवीची दृष्टी, प्रतिभा व लेखणी यांच्या व्यापाराचा समन्वय केला आहे. रामदास स्वामींनीं व ड्रायडन यानें कवींना अनुक्रमें ' शब्दसृष्टीचे ईश्वर ' व ' Maker ' असें म्हणून गौरविलें आहे. मराठी साहित्याचे आचार्य ज्ञानेश्वर यांनीं " वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वींहि परतत्व-। स्पर्श जैसा ॥ " असें कवितेचें परमोच्च रूप सांगितलें आहे.

३८९ काव्य ही उल्लसित मनाची एक वृत्ति आहे. ' गै ' धातू पासून झालेला ' गायक ' शब्द ज्याप्रमाणें उल्लसित मनोवृत्तीचे व्यापार संगीत स्वरांनीं प्रकट करतो, त्याप्रमाणें ' कु ' धातूपासून झालेला ' कवि ' शब्द तसलेच

व्यापार 'कवना' नें म्हणजे अनुरणनात्मक ध्वनींनीं प्रकट करितो अर्थात् काव्य व संगीत हीं दोन्ही एकाच तऱ्हेच्या उल्लसित मनोवृत्तीचीं दोन निराळीं परिणत रूपें आहेत. एक जो भाव मातृकात्मक शब्दांनीं प्रकटवितें तोच भाव दुसरें सूक्ष्म स्वरांनीं प्रकट करितें. दोन्हींतही (१) एखाद्या विषयाशीं संवेदना उत्पन्न होणें, (२) त्या योगें मनोवृत्ति उचंबळून येणें, व (३) अशा उचंबळलेल्या वृत्तीला अनुरणनात्मक ध्वनीची जोड मिळणें; इतक्या बाबीपुरतें पूर्ण साम्य आहे. मात्र कंठांतून बाहेर पडल्यावर काव्याचें क्षेत्र 'शब्द' होतात, व संगताचें क्षेत्र गायनाचे स्वर होतात, हा दोनींत मोठा फरक आहे. पुढें देखील शब्दांच्या अर्थव्यंजनेमुळें व ध्वनींच्या अनुरणन धर्मामुळें काव्यांत जशी रसोत्पत्ति होते तशीच संगीतांत स्वरांच्या तीव्रकोमलत्वामुळें व त्यांतून प्रकटणाऱ्या रागधर्मामुळें रसोत्पत्ति होते. काव्याचा संगीताशीं अशा प्रकारें सहोदर संबंध आल्यामुळें व तें नेहमीं अनुरणनात्मक ध्वनिरूप घेऊन उमटत असल्यामुळें पुरातन कालापासून छंदांत प्रकटत आलें इतकेंच, एरवीं काव्याला पद्याची आत्यंतिक आवश्यकता आहे असें नाहीं. मात्र ही गोष्ट खरी आहे कीं, काव्याच्या या विशिष्ट स्वरूपामुळें गद्यापेक्षां पद्य हें त्याच्या संचाराला अधिक अनुकूल क्षेत्र होतें.

३९० काव्याची ही मीमांसा लक्ष्यांत ठेवली म्हणजे स्थल–काल–परिस्थित्यादि मर्यादा काव्यास घालतां येणार नाहींत हें उघड आहे. काव्य उत्पन्न झाल्यावर त्याचे परिणाम पाहून व धर्म तपासून लक्षणें बांधतां येतील, व तशीं तीं प्राच्य व पाश्चात्य साहित्यकारांनीं बांधलींहि आहेत; पण काव्याला शास्त्रनियमांत गोवून त्याची 'कला' बनविण्याचा प्रयत्न केल्यास तो काव्याच्या बाह्यांगापुरताच यशस्वी होणार हें उघड आहे. 'संगीता' ला कला बनवून गायकांनीं ती पूर्णतेस नेली आहे, तरी देखील एखाद्या कसबी गायकाचें गाणें सुद्धां वेळेला 'जमत' नाहीं, त्याचप्रमाणें काव्यकलेचे सर्व नियम संभाळून शब्दरचना केली तरी त्यांत हटकून काव्याचा जिव्हाळा उतरेलच अशी ग्वाही देतां येत नाहीं.

३९१ बाह्यांगाच्या दृष्टीनें काव्याचे होणारे इंग्रेजी साहित्यांतले प्रकार कलम ३७४ मध्यें सांगितलेच आहेत. संस्कृत साहित्यकारांनीं काव्याचे (१) खंडकाव्य, व (२) महाकाव्य असे दोन प्रकार मानले आहेत. पैकीं खंडकाव्याचें लक्षण 'खंडकाव्यं भवेत्काव्यस्यैकदेशानुसारिच' असें केलें आहे, व महाकाव्याचें लक्षण अशा आशयाचें आहे:—'त्याचें कथानक ऐतिहासिक किंवा तत्-

लेंच दुसरें सुरस पाहून घ्यावें, त्यापासून चारी पुरुषार्थ साधावे, त्यांतला नायक चतुर व उदात्त असावा, त्यांत सर्व प्रकारचीं सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें असावीं, विवाह, पुत्रजन्म वगैरे मंगल प्रसंग असावे, तें काव्य विस्तृत असून त्यास रसालंकारांची जोड असावी, प्रत्येक सर्गाला एकच वृत्त ठेवून फक्त अखेरीस वृत्तवैचित्र्य साधावें, अशा प्रकारचें काव्य प्रलयकाळपर्यंत टिकतें.' (साहित्यदर्पण ५५९ पहा.) या लक्षणांना धरून मराठींत महाकाव्य रचण्याचा पहिला प्रयत्न विठ्ठल बीडकरानें केलेला दिसतो. या दृष्टीनें वामनादिकांचीं स्फुटप्रकरणें व केकावलीसारखीं स्तोत्रेंही मराठींतील 'खंडकाव्यें' व मोरोपंताचीं रामायणें, महाभारताख्यानें इत्यादि महाकाव्यें म्हणतां येतील, पण ज्ञानेश्वरीसारखें सर्वोत्कृष्ट काव्य कुठल्याच वर्गात घालतां येणार नाहीं!

**३९१** काव्याच्या मीमांसेंत ही एक गोष्ट नेहमीं लक्ष्यांत ठेवली पाहिजे कीं, कवीला एखाद्या विषयाबद्दल होणारी संवेदना ही, त्या विषयाच्या साक्षात् अनुभवानें उत्पन्न झालेला हर्षशोकादि मनोविकारांचा दूषित उमाळा नसून, त्या विषयाशीं सहानुभूतीच्या भावनेनें उत्पन्न झालेली उदात्त, सूक्ष्म, शुद्ध व निर्मल अशी एक वृत्ति आहे. विषयानुभूतीच्या बऱ्यावाईट धर्मानुसार उत्पन्न होणारे विकारांचे मलिन उमाळे काव्यजनक होऊं शकतच नाहींत, तर त्यांचा गढूळ पूर ओसरून गेल्यावर राहिलेली किंवा त्यांच्या काल्पनिक तादात्म्यानें बनलेली मनाची उदात्त वृत्तीच काव्य प्रसवूं शकते. अजराजा स्वतः कवी असता तरी देखील इंदुमती मेलेली पाहून त्याला मनुष्य स्वभावानुसार जो दुःखावेग प्रथमच उत्पन्न झाला असता त्याचा उद्रेक, कालिदासानें त्याच्या तोंडीं घातला आहे त्याहून फार वेगळ्या तऱ्हेनें बाहेर पडता. कालिदासाला मात्र अजाच्या दुःखाची उत्कृष्ट संवेदना झाल्यामुळें, व तिचे दिव्य उमाळे शब्दांत उतरविण्याइतकी त्याला प्रतिभा असल्यामुळेंच 'अजविलाप' इतका उत्कृष्ट उतरला आहे. ही संवेदना कमी अधिक प्रमाणांत सर्वांनाच असते; पण शब्दांनीं ती व्यक्त करण्याचें सामर्थ्य सर्वांना असत नाहीं. त्याचप्रमाणें संवेदनाशक्ति पूर्व संस्कारानुसार ज्या मानानें तीव्र किंवा मंद असते त्या मानानें तिचा प्रवाह जोरदार किंवा मंद असतो. काव्याच्या या उपपत्तीस अनुसरूनच कीं काय, उपनिषदांनीं 'ना ऋषिः कुरुते काव्यम्' (संवेदनावान् विद्वान् म्हणजे ऋषी काव्य करूं शकतो) असें म्हटलें आहे.

३९३ काव्याचें सौंदर्य रसोत्पत्तींत आहे हें तर उघडच आहे. ही रसोत्पत्ति उत्पन्न करणाऱ्या शब्दांमध्यें ( १ ) शब्द, ऊर्फ अर्थसूचक अनुरणनात्मक ध्वनि, ( २ ) रूप, ऊर्फ अर्थाची कल्पना बरोबर आणून देणारी व्यंजकता, ( ३ ) स्पर्श ऊर्फ भावनोत्पादक धर्म, ( ४ ) रस ऊर्फ वर्णाची मधुरता व ( ५ ) गंध ऊर्फ अर्थजन्य कल्पनेचा साक्षात् अनुभव आणून देण्याइतकी परिणामकारकता; असे पांच धर्म कमी अधिक प्रमाणांत असतात ( ज्ञानेश्वरी ६; १५-२१ ), व ते काव्यांत ज्या मानानें उतरले असतील त्या मानानें रसोत्पत्ति होते अन्य शब्दांत बोलायचें म्हणजे एकाच वेळीं जितक्या अधिक इंद्रियांना आनंद देईल तितकें तें काव्य सुंदर होय. कवीची प्रतिभा जोरदार असेल तर त्याला होणारी संवेदना उत्कृष्ट कल्पनेनें प्रकट होईल. पण पुढें ती शब्दांत उतरतांना शब्दांची योजना जर चांगली होईल तरच रसोत्पत्ति होईल. अर्थात् उत्कृष्ट काव्यप्रसव-शक्ति ही ईश्वरी देणगी आहे, व चांगल्या काव्यांच्या परिशीलनानें काव्याच्या बाह्य संप्रदायांचें अनुकरण जरी थोडें फार करितां आलें तरी जातिवंत काव्याचा उमाळा त्यांत उतरणार नाहीं.

३९४ काव्याच्या बाह्य लक्षणावरून साहित्यकारांनीं त्यांच्या चांगुलपणाच्या कांहीं कसोट्या ठरविल्या आहेत. संस्कृत साहित्यकारांनीं उत्कृष्ट काव्याचे ( १ ) श्लेष, ( २ ) प्रसाद, ( ३ ) समता, ( ४ ) माधुर्य, ( ५ ) सुकुमारता, ( ६ ) अर्थ-व्यक्ति, ( ७ ) उदारत्व, ( ८ ) ओज, ( ९ ) कान्ति व ( १० ) समाधि, असे दहा गुण सांगितले आहेत, तर कित्येकांच्या मतें ( १ ) माधुर्य, ( २ ) ओज व ( ३ ) प्रसाद हे तीन गुण काव्याच्या श्रेष्ठत्वाला पुरेसे होत. कित्येकांनीं 'व्यंग्य व वाच्य' असे काव्याचे दोन वर्ग कल्पून 'व्यंग्य' म्हणजे ज्यांतील शब्दप्रयोग सूचक असतील व अर्थ व्यंजनेनें प्रकट होईल तें उत्तम काव्य; व 'वाच्य' म्हणजे ज्यांतील शब्दप्रयोग उघड व अर्थ स्पष्ट फोड करून सांगितल्यासारखा असेल तें काव्य अधम; अशी काव्याच्या बरे-वाईटपणाची कसोटी सांगितली आहे. क्षेमेंद्रादिकांनीं 'औचित्य' ही काव्याच्या उत्कृष्टत्वाची कसोटी ठरविली आहे. पाश्चात्य संस्कारांची छाप ज्यांच्यावर विशेष पडलेली आहे अशा अर्वाचीन रसिकांपैकीं कांहींच्या मतें 'नव्या व बहारीच्या कल्पना' हें उत्तम काव्याचें गमक होय, तर कित्येकांच्या मतें 'भावनोत्पादकता' हें उत्तम काव्याचें लक्षण आहे.

३९५ काव्यासंबंधीं अलीकडे प्राच्य व पाश्चात्य संस्कृतींच्या विरोधांतून पुढील प्रश्न उपस्थित झाले आहेतः—( १ ) जुन्या व नव्या कवींची तुलना, ( २ ) पौर्वात्य आणि पाश्चात्य काव्यांतील फरक. ( ३ ) कवीचा परिस्थितीशीं संबंध. ( ४ ) कवीचें शील कसें असावें ? ( ५ ) कवितेचे विषय कोणते असावे ? ( ६ ) वीणाकाव्यें वगैरे इंग्रेजी प्रकार मराठींत शिरणें इष्ट आहे काय ? ( ७ ) कवितेचें पद्य सयमक असावें कीं निर्यमक असावें ? इत्यादि. पैकीं पहिल्या प्रश्नासंबंधी जुने कवि व नवे कवि यांची तुलना करितांना ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, दोन्ही कवींच्या भूमिका, परिस्थिति व कार्यक्षेत्रें वेगळीं असल्यानें दोघांचें साम्य असें थोड्याच बाबतींत आहे. जुने कवि भाविक, वैराग्यप्रवण, धर्मजागृतीच्या बुद्धीनें प्रेरित झालेले व धोपटमार्गी असल्यामुळें त्यांची कविता श्रद्धाप्रधान, भक्तिरसात्मक, व साधी उतरली आहे. अर्वाचीन कवि चिकित्सक, व्यवहार-दृष्टि, देशोन्नत्यादि विविध कर्तव्यांनीं प्रेरित झालेले आणि बहुनीतिकुशल असल्यामुळें त्यांची कविता भावनाप्रधान व विचारप्रधान, विविधरसात्मक, व अष्टपैलु उतरली आहे. जुन्या कवींत अस्सल कवित्वाचा उमाळा थोड्या मंडळींतच दिसून येतो, तसाच तो नव्या मंडळींतही थोड्यांच्याच ठिकाणीं आढळतो. जुन्या कवींचे संप्रदाय, कल्पना, संकेत व विषय संस्कृत वळणाचे आहेत तर नव्यांचे पाश्चात्य वळणाचे आहेत.

परिणामाच्या दृष्टीनें

> " काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
> सद्यः परनिर्वृतये कांतासंमिततयोपदेशयुजे ॥ १ ॥ "

ही जुनी कसोटी लाविल्यास जुनी कविता श्रेष्ठ ठरेल व ' भावनोत्पादकते–ची नवी कसोटी लाविल्यास नवें काव्य श्रेष्ठ ठरेल.

( क ) पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतीच मुळीं भिन्न असल्यामुळें त्या संस्कृतींस अनुसरून होणाऱ्या संवेदनांचे परिणाम जीं काव्यें तींही उभयतांचीं भिन्न वळणावर जावीं हें स्वाभाविक आहे. पाश्चात्य पिंड हा सामान्यतः रजोगुणी, द्वैतवादी, मतलबी, घुम्या, चिकित्सक, विविधनीतिपटु व पक्का व्यवहारज्ञ असल्यानें त्याची संवेदना त्या गुणानुरूप होते व काव्य विविधविषयगामी; मनुष्य स्वभावाचीं बारीक अंगोपांगें छानून पाहणारें; स्वार्थ-सूचक; देशाभिमान;

कुलाभिमान इत्यादि भावनांचें उत्तेजक; सृष्टि-विषयाकडे पृथक्त्वानें पाहणारें व व्यावहारिक उतरतें. उलट भारतीय पिंड हा सत्वगुणी, अद्वैतवादी, प्रांजल, स्नेहशील, भाविक, एकनीतिक व प्रायः व्यवहारशून्य असल्यामुळें त्याची कविता वैराग्यशील; मनुष्यस्वभावाच्या चांगल्या अंगांकडेच विशेष लक्ष्य देणारी; परमार्थप्रेरित; विषयममतादिकांचा निरास उपदेशिणारी; सृष्टिमिथ्यात्व निश्चयानें प्रतिपादणारी व तशा दृष्टीनें सृष्ट विषयांची वासलात लावणारी; व दिलदार निपजते.

( ख ) कवीचा परिस्थितीशीं संबंध काय या प्रश्नाचें उत्तरही फारसें अवघड नाहीं. परिस्थितीचा साहित्यावर व साहित्याचा परिस्थितीवर नेहमींच परिणाम होत असतो. अर्थात् कवीचा उमाळा ज्या मानानें जोरदार त्या मानानें तो परिस्थितीच्या घटनेंतला घटक होतो. ह्या उमाळ्याच्या सकसपणावरून परिस्थितीला खेचून आपल्याबरोबर नेणारा कवि, परिस्थितीच्या बरोबर चालणारा कवि व परिस्थितीच्या मागें राहणारा कवि असे कवींचे तीन वर्ग होतील.

( ग ) कवीचें शील कसें असावें हा प्रश्न अनवश्यक आहे. जें कवीच्या शीलांत नाहीं म्हणजे विचारांत व विशेषेंकरून आचारांत नाहीं तें नुसत्या उच्चारांत आलें तरी कृत्रिमच उतरणार हा निसर्गाचा नियम आहे. अर्थात् उसन्या अवसानाची कविता ही उत्कृष्ट कलात्मक असली तर फार तर मनोरंजक होईल, चिरपरिणामकारक होणार नाहीं हें उघड आहे.

( घ ) कवितेचे विषय कोणते असावे, वीणाकाव्यें वगैरे इंग्रेजी प्रकार मराठींत यावेत कीं नाहीं, आणि कवितेचें पद्य सयमक असावें कीं निर्यमक असावें वगैरे प्रश्न गौण आहेत. कवितेचा विषय रसोत्पादक असावा हें खरें, पण एखादा ‘ शब्दसृष्टीचा ईश्वर ’ नीरस विषयांतही आपणांस व आपल्याबरोबर सहृदय वाचकांस रसाची संवेदना उत्पन्न करील. वेदांतासारख्या रुक्ष विषयावरच ज्ञानेश्वरीसारखें ‘ एकमेवाद्वितीय ’ रसाळ काव्य निर्माण झालें आहे ही गोष्ट ध्यानीं घेतली म्हणजे या प्रश्नाचें महत्त्व उरत नाहीं. त्याचप्रमाणें वीणाकाव्यासारखे इंग्रेजी प्रकार मराठींत घेणें अनिष्ट मानण्याचें कारण दिसत नाहीं. परकीय संस्कृतींतलें असलें तरी कलेला जें पोषक तें वेंचून घेणें केव्हांही श्रेयस्करच आहे. यमक हा केवळ अलंकाराचा विषय आहे. काव्य हें सामान्यतः छंदोमय उतरत असल्यानें यमक हें त्यास भूषण तर निर्विवादच आहे. पण

यमकाकरितां जर अर्थहानि व पर्यायानें रसहानि होत असेल तर यमकाची भीड राखण्याचें कारण दिसत नाहीं.

३९६ उत्कृष्ट साहित्य निपजविण्याची शक्ति ही जरी ईश्वरी देणगी असली, तरी 'कला' या दृष्टीनें साहित्याच्या बाह्यांगाचें बऱ्याच अंशीं अनुकरण करितां येतें व बहुतेक साहित्यलेखकांनीं तें केलेंही आहे. सबब या कलेंतील रस, अलंकार, शैली, इत्यादि जी साधनसामग्री आहे तिचा आतां क्रमानें विचार करूं.

## अभ्यास-पाठ १.

**"कन्या सासुऱ्यासि जाये। मागें परतोनि पाहे॥"**

हा मजकूर

**'कन्या सासुऱ्यासि जाये। तिला दुःख फार होये॥'**

किंवा

**'कन्या सासुऱ्या निघाली। गंगा-यमुना डोळां आली॥'**

असा म्हटल्यास कांहीं सौंदर्यहानि होईल काय?" जरूर होईल. कारण पहिल्या पाठांतील व्यंजनेनें अर्थ सुचविणारी यथार्थ शब्दयोजना दुसऱ्या व तिसऱ्या पाठांतल्या वाच्य शब्दयोजनेपेक्षां सरसच असणार (कलम ३९४)

## अभ्यास-पाठ २ रा.

'डोमगांव येथील कल्याण स्वामींच्या हातच्या दासबोधांत

**"गायत्री मंत्राचा विचारू। सांगे तो साचार कुळगुरू॥"**

असा पाठ होता तो बदलून रामदास स्वामींनीं

**"गायत्री मंत्राचा उच्चारू। सांगे तो साचार कुळगुरू॥"**

असा केला. यांत विशेष काय केलें?' गायत्रीमंत्राचा विचार हल्लींच्या उपाध्यायांकडून मुळींच शिकविला जात नसून उच्चार मात्र शिकविला जातो, हें जाणून समर्थांनीं उचित अशा शब्दाची योजना केली, अर्थात् सत्य निवेदनानें औचित्य वाढलें, (कलम ३८७,५).

## अभ्यास-पाठ तिसरा.

'मला भीति वाटली,' 'मी घाबरून गेलों,' 'माझी गाळण उडाली,' 'माझें काळीज धडधडूं लागलें' यांपैकीं कोणती शब्दयोजना अधिक सरस आहे?

शेवटची अधिक सरस आहे, कारण तिच्यामध्यें भीतीची कल्पना दाखविणाऱ्या शब्दप्रयोगांत भीतीचा 'धडधड' हा ध्वनी देखील साधला आहे. (कलम ३९३,१).

## अभ्यास-पाठ ४ था.

'एखादी उत्कृष्ट कल्पना जर व्यवस्थित भाषेनें गद्यांत मांडली असेल तर तिला काव्य म्हणतां येईल काय?' अवश्य येईल, कारण काव्याच्या व्याख्ये-प्रमाणें (कलम ३८९) व रसात्मक परिणामाच्या दृष्टीनेंही तिला पद्याची एकांतिक आवश्यकता नाहीं. मात्र पद्यामुळेंच उत्पन्न होणारें ध्वनिसौंदर्य त्यांत येणार नाहीं व तेवढ्यापुरतें व्यंग राहील (३९३,१).

## अभ्यास-पाठ ५ वा.

**"तूं जेवि देवकीला भेटसि तैसाचि भेट आतेला।**
**आम्हांहुनि तूंचि अधिक, घृत सोडुनि कोण करिल आ तेला?"**

या आर्येंत कोणता दोष आहे? या आर्येंत यमकाच्या नादानें पहिल्या मजकुराच्या गौरवाला न साजणारा तेला तुपाचा दृष्टांत द्यावा लागून औचित्य-भंजक ग्राम्यत्व आलें आहे (३८६, ५).

## अभ्यास-पाठ ६ वा.

**"कृपावंत किती। दीनें बहू आवडती॥ १॥ त्यांचा भार वाहे माथां। करी योगक्षेम चिंता॥ २॥ भुलों नेदी वाट। करीं धरुनी दावी नीट॥ ३॥ तुका म्हणे जीवें। अनुसरल्या एक भावें॥ ४॥"**
आणि

**"दयाब्द वळशील तूं तरि न चातकां सेवकां। उणें किमपि, भाविकां उबगशील तूं देव कां?॥ अनन्य-गतिका जना निरखि-तांचि सोपद्रवा। तुझेंचि करुणार्णवा! मन धरी उमोप द्रवा॥ १॥**

ह्या जवळ जवळ समानार्थक पद्यांची काव्यदृष्ट्या तुलना करा.

---

# पाठ बत्तिसावा.

## साहित्याचीं उपांगें.

३९७ वाङ्मयाच्या सर्व प्रकारांत साहित्य हें अत्यंत प्रभावी आहे. साहित्याचा उद्देश श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या मनावर आपली छाप पाडून त्यांच्या भावनांत व परंपरेनें विचारांत क्रांति घडविणें हा असतो, आणि तो तें 'रस, अलंकार, संकेत, शैली, सुभाषितें,' इत्यादि आपल्या अनेक अंगोपांगांनीं घडवून आणीत असतें. साहित्याला निर्माण करणारी जी संवेदना, तिच्या प्रवाहाला प्रतिक्षणीं विकास पावविणारी शक्ति "नव-नवोन्मेषशालिनी प्रज्ञा" ती प्रतिभा होय. प्रतिभेच्या द्वारें निर्माण झालेल्या साहित्याच्या, विशेषतः काव्याच्या शब्दांतील धर्मांचा पाकसमुच्चय तो 'रस' होय. हा पाक साहित्यांतील शब्दांच्या व प्रसंगांच्या धर्मानुसार वेगवेगळा होतो.

३९८ संस्कृत साहित्यांत

'शृंगार-हास्य-करुण-रौद्र-वीर-भयानका।
बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः॥ १॥'

असे आठ रस सांगितले आहेत. कोणी त्यांतच

'निर्वेदस्थायिभावोऽस्ति शांतोपि नवमो रसः॥'

(काव्य-प्रकाश ४) असा 'शांत किंवा भक्ति' हा एक नववा रस सामील करतात. कोणी त्यांतच वत्सल नांवाचा दहावा रस सामील करतात. कोणी 'शृंगार, रौद्र, वीर व बीभत्स' हे चारच रसः मानतात. तर कोणी वरच्या नवांच्या यादींत 'उदात्त' (Sublime) हा इंग्रेजी रस मिळवून एकंदर दहा रस मानतात. संवेदना ग्रहण करणारे मनुष्याच्या अंतःकरणाचे जे सहज धर्म त्यांना 'भाव' असें म्हणतात. यांतील कांहीं भाव 'स्थायि' म्हणजे टिकाऊ असून त्यांच्यावरच साहित्याचा रसात्मक परिणाम होतो. हे प्रत्येक रसास एकेक याप्रमाणें

**"प्रीति, हर्ष, तथा शोक, क्रोध, उत्साह तें भय ॥**
**जुगुप्साऽश्चर्य कीं शान्ती स्थायीभाव रसाश्रय ॥ १ ॥"**

असे नऊ सांगितले आहेत. कांहीं रस एकमेकांना पोषक असून कांहीं मारक असतात. त्यांचें कोष्टक येणेंप्रमाणें:—

| | रस | स्थायीभाव | विरोधी रस | अनुकूल रस. |
|---|---|---|---|---|
| १ | शृंगार | प्रीति | करुण, बीभत्स, रौद्र भयानक | हास्य. |
| २ | हास्य | हर्ष | भयानक, करुण. | शृंगार. |
| ३ | करुण | शोक | हास्य, शृंगार | ... |
| ४ | रौद्र | क्रोध | हास्य, शृंगार, भयानक व अद्भुत. | करुण. |
| ५ | वीर | उत्साह | भयानक, शान्त | अद्भुत. |
| ६ | भयानक | भय | शृंगार, हास्य, शांत | ... |
| ७ | बीभत्स | जुगुप्सा (किळस) | शृंगार | भयानक |
| ८ | अद्भुत | आश्चर्य | रौद्र | वीर. |
| ९ | शांत | समाधान (शान्ति) | शृंगार, वीर. | ... |
| १० | उदात्त | गांभिर्य | शृंगार, हास्य. | अद्भुत. |

**३९९** शब्दांतील 'माधुर्य' हा गुण मनाला पाझर फोडणारा, चटका लावणारा, आणि शृंगार, करुण व शांत रसांना विशेष पोषक असून, मृदुलालित वर्णांतून उत्पन्न होतो. 'ओज' हा गुण मनाला उत्साह व उत्तेजन देणारा व म्हणून वीर, बीभत्स आणि रौद्र या रसांना विशेष पोषक असतो, व तो कठोर व्यंजनांतून बहुधा उत्पन्न होतो. प्रसाद हा गुण अंतःकरणाची संवेदना चटकन् जागी करणारा व त्यास ओढून घेणारा अतएव सर्वच रसांस बहुधा पोषक असून, परिचित, साध्या, सोप्या व गोड अशा शब्दांतून उत्पन्न होतो.

**४००** रसांची कल्पना येण्यासाठीं त्यांचीं स्वरूपें व उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

(१) **शृंगारः**—शृंगाराचें स्वरूप स्त्रीपुरुषांच्या परस्पर प्रीतीचा विकास हें होय. जसें:—

"सुंदरी मूर्ति मदनाची, अमृतवदनाची, मदनकदनाची पिसारी धार॥
बाहुली काम-सूत्रांत, मदन नेत्रांत, कोकशास्त्रांत निपुण ही फार॥
शुक पिक यांणीं धरिली बाज, जाहले वाज, कंठीं आवाज,
विण्याची तार॥

ही मन्मथरस हवा, काय पाहवा, बूट वाहवा, सफल संसार॥
कचघनांत सौदामिनी, दिवसयामिनी, जपावी मनीं, कीं न कळे
पार॥

वेणींत मूद राखडी, कोर चोखडी, माडिवर खडी, विडा रंगदार॥
मणिकुसुम कर्ण शोभवी, मतिस लोपवी, मला तर भवीं, वाटली
सार॥ १॥ (रामजोशी).

(२) हास्य:—हास्याचें स्वरूप म्हणजे विनोदी वृत्ति उचंबळून प्रत्यक्ष हास्यांत तिचें पर्यवसान होणें. जसें:—

यया बोला एरें विचक्षणें। ह्मणितलें हां जी तें कवणासि उणें॥
तुह्मी बकाकरवीं चांदिणें। चरौं पाहा॥ १॥

हां हो उद्गनिया आरिसा। आंधळेया पुढें दावडूं बैसा॥
ना बहिरीसि हृषीकेशा। गाणें केउतें॥ २॥

जें अतींद्रिय ह्मणौनि व्यवस्थिलें। केवल ज्ञानदिष्टिचेया
भागा फीटलें॥
तें तुह्मी चर्मचक्षूपुढां सूदलें। मग कैसेनि देखौं॥ ३॥

परि तें तुमचें उणें न बोलावें। मींचि साहे तें बरवें॥
एथ आथि ह्मणविलें देवें। मानूं बापा॥ ४॥ (ज्ञानेश्वरी ११).

(३) करुण:—करुण रसाचें स्वरूप म्हणजे हृदयांत दुःखावेग उत्पन्न होणें व हृदयाला द्रव येणें. जसें:—

हा हा देवी! हृदय फुटतें, देह माझा गळाला।
वाटे शून्य त्रिभुवन मला, अंतरात्मा जळाला॥
या आत्म्यानें कितितरि सदा दुःखभारा वहावें।
मोह व्यापी फिरफिरुनियां, काय आतां करावें॥ १॥ (गोडबोले)

(४) रौद्रः--- रौद्र रसाचें स्वरूप म्हणजे उग्र व गंभीर अशा देखाव्याची मनावर छाप पडणें. जसें:—

काइ सागराचा घोंटु भरावा । किं पर्वताचा घांसु करावा ॥
ब्रह्मकटाहो घालावा । आसका दाढे ॥ १ ॥

दिशा सगलिया गिलाविया । चांदणिया चाटूनु घेयाविया ।
ऐसें वर्ततसे नां सवियां । लोलुपता तुज ॥ २ ॥

कैसें केवढें एकचिं पसरलें । त्रिभुवन जिव्हाग्रीं टेकलें ।
जैसें कविठ घातलें । वडवानलीं ॥ ३ ॥

तुवां देखें राग्गिठपणें । वाढौनि गगन केलें ठेंगणें ।
डोले करुनि भिंगुलवाणे । भेडवीतु आहासी ॥ ४ ॥

( ज्ञानेश्वरी ११ ).

( ५ ) वीर. या रसाचें स्वरूप पराक्रमासंबंधीं उत्साह वर्णन केल्यानें व्यक्त होतें. जसें:—

वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतनव समज॥
देवांसि मागते ते झाले मरणीं करूनि नवस मज ॥ १ ॥

( मोरोपंत ).

( ६ ) भयानकः—हृदयावर भीतीची छाप पाडणाऱ्या शब्दचित्रांतून हा रस उमटतो. जसें:—

उद्दंडें सैघ वाजते । भयानकें खाखांतें ।
महाप्रलयो जेथें । धाकडांसीं ॥ १ ॥

तेथ भेडांचि कवणि मातु । काचेयां केरु फिटतु ।
जेणें दचकला कृतांतु । अंग नेघे ॥ २ ॥

एकां उभेयांचि प्राण गेले । चांगांचे दांत बैसले ।
बिरिदांचे दादुले जाले । हीयां ऐसे ॥ ३ ॥ ( ज्ञानेश्वरी. १ ).

( ७ ) बीभत्सः---या रसाचें स्वरूप किळस उत्पन्न करणाऱ्या वर्णनांत उमटतें. जसें:---

रजस्वलेचा जो विटाळ । त्याचाचि आळोनि झाला गोळ ।
त्या गोळाचेंचि केवळ । शरीर हें ॥ १ ॥

वरीवरी दिसे वैभवाचें । अंतरीं पोतडें नरकाचें ।
जैसें झांकणें चर्मकुंडाचें । उघडितांचि नये ॥ २ ।

नरकाचें कोठार भरलें । आंत बाहेरि लिडिविडिलें
मूत्रपोतडें जमलें । दुर्गंधीचें ॥ ३ ॥ (रामदास)

( ८ ) अद्भुतः—हा रस म्हणजे अंतःकरण आश्चर्यचकित करणाऱ्या वर्णनाची छाप पडणें. जसें:—

तैसीं अद्भुतें भयासुरें । तेथ वदनें देखिलीं वीरें ।
आणिकें हीं साधारणें साकारें । सौम्यें हिं बहुतें ॥ १ ॥

तंव नानावर्णें कमलवनें । विकाशलिं तैसीं अर्जुनें ।
डोलां देखिलीं पालिंमणें । आदित्यांचिं जैसीं ॥ २ ॥

तेथ कृष्ण मेघांचिया झांटी । माझि कल्पांत विजूचिया फूटी ।
तैसिया वन्हीं पिंगला दिठी । भुवांतलीं ॥ ३ ॥ ( ज्ञानेश्वरी, ११ ).

( ९ ) शांतः—या रसाचें स्वरूप मनावर भक्तीची किंवा वैराग्याची छाया पडली असतां प्रकट होते. जसें:—

जो सर्वां भूताचां ठांई । द्वेषातें नेणे कांहीं ।
आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥ १ ॥

उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें कहिंचि नेणिजे । वसुधा जेवि ॥ २ ॥

रायाचें देह चाळूं । रंकातें परउतें गाळूं ।
हें नेणे चि कृपाळू । प्राणु पैं गा ॥ ३ ॥

जीउ परमात्मा दोन्हीं । बैसौनि एका आसनिं ।
जेयाचे हृदयभुवनिं । विराजति ॥ ४ ॥

( ज्ञानेश्वरी, १२ ).

( १० ) उदात्तः—मनावर एखाद्या अफाट वर्णनानें मोठेपणाचा ठसा उमटला म्हणजे या रसाचें स्वरूप प्रकट होतें. जसें:—

मावळवितु विश्वाभासु । उवल उदैजेला चंडांशु ।
अद्वया अब्जिनी विकाशु । वंदूं आतां ॥ १ ॥
जो अविद्ये राती रुसौनियां । गिळी ज्ञानाज्ञान चांदणियां ।
जो सुदीनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥ २ ॥
जेणें पहालेनि पहाटे । भेदाची चोखेल फीटे ।
रीगाति आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥ ३ ॥
न दिसणें दीसणेनसिं मावळवि । दोहीं झांकलें सैघ पघलवी ।
काइ बोलों आघवी । उरवाचि ते आनी ॥ ४ ॥
तो अहोरात्राचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु ।
प्रकास्यें विण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ ५ ॥

( ज्ञानेश्वरी, १६ )

## अभ्यासपाठ १ ला.

" पतिवांचून महाल सुना, तुला नाहीं करुणा नारायणा,
मेल्या उगीच राहिरे मना, आशा नाहीं पुरली ।
पोरपणींच मनींच्या मनीं कल्पना जिरली "

या पद्यांशांत कोणता रस आहे ? यांतील विरहिणीच्या दुःखोद्गारांमुळें मनाला द्रव येण्याजोगा असल्यानें हा ' करुण ' रस आहे ( कलम ४००,३ )

## अभ्यासपाठ २ रा.

" जिवाचा कलेजा, प्राणांचा प्यार, जीवनाचें सर्वस्व, दिलाचा दिलवर, मनाचा मोहन, " या समानार्थक शब्दप्रयोगांतून कोणते अधिक रसपोषक म्हणून तुम्ही निवडाल ? व कां ? बहुतेक सगळेच प्रयोग रसपोषक अतएव घेण्याजोगे आहेत, पण मराठीचा शुद्ध व गोड मासला म्हणून ' मनाचा मोहन ' हा शब्दप्रयोग अधिक प्रशस्त आहे. ( कलम ३१८ ).

## अभ्यासपाठ ३ रा.

" एका काव्यांतला नायक शत्रूंपासून पराभव पावून पळतांना बरोबर असलेल्या नायिकेसह शृंगार-कथा करूं लागला, " असें वर्णन आलें आहे, तर यावर तुम्ही काय आक्षेप घ्याल ? रसहानीचा आक्षेप घेतां येईल; कारण भीतीच्या स्थायीभावावर शृंगाराचें अधिष्ठान संभवत नाहीं ( कलम ३९८ ).

## अभ्यासपाठ ४ था.

‘ न्यावा चमूवरि तुंवां रथ, तरुणीप्रति जसा स्मरें तरुण ’ या मोरोपंताच्या ओळीवर त्यांतील शृंगारात्मक उपमेबद्दल पूर्वी आक्षेप घेण्यांत आला होता तो यथार्थ आहे काय ? नाहीं. कारण शृंगार हा वीररसाला विरोधी नाहीं. ( कलम ३९८ )

## अभ्यासपाठ ५ वा.

‘ त्या कृतान्तकर्कश देखाव्याच्या दर्शनानें ती निस्त्राण गाय त्रस्त झाली, ’ या वाक्यप्रयोगापासून रसोत्पत्ति होईल काय ? होणार नाहीं. कारण त्यांत इष्ट रस जो ‘ करुण ’ त्याला पोषक असा वर्णसमूह त्या वाक्यांत नाहीं. ( कलम ३९९ ).

---

# पाठ तेहतिसावा.

## साहित्याचीं भूषणें.

४०१ साहित्याच्या प्रवाहांतच नव्हे, तर काव्याच्या प्रवाहांत देखील सर्वच स्थळें व काळ रसानुकूल असतात असें नाहीं. अशा वेळीं देखील आपली भाषा परिणामकारक करण्याचा साहित्यलेखक वेगळ्या प्रकारानें प्रयत्न करितात. तो म्हणजे शब्दांच्या 'वर्ण' व 'अर्थ' या दोनच गुणांचा, साहित्य खुलविण्यासाठीं विशिष्ट पद्धतीनें रचनाप्रकार करून त्याच्या शोभेचा उपयोग करणें, हा होय. या रचनाप्रकारांस साहित्यांत 'अलंकार' असें नांव आहे. पैकीं शब्दांच्या वर्णरूप उपयोगानें होणाऱ्या अलंकाराला 'शब्दालंकार' व अर्थरूप उपयोगानें होणाऱ्या अलंकाराला 'अर्थालंकार' म्हणतात. वर्णरूप अलंकार हे नुसत्या कानांलाच आल्हाद देणार अतएव गौण मानले असून, अर्थरूप अलंकार हे मनाला आल्हाद देणारे व म्हणून कदाचित् संवेदना जागृत करण्याजोगे असल्यामुळें प्रधान मानले आहेत.

४०२ व्यवहारांत अलंकारांना अवश्य मानलेले जे तीन गुण (१) दुर्मीळ घटकांची बनावट (२) रचनेचा डौल व (३) टिकाऊ सौंदर्य, ते साहित्यांतील अलंकारांनाही लागतात; व उत्तम शब्दांची डौलदार रचना करून अर्थाला टिकाऊ सौंदर्य उत्पन्न झालें म्हणजे अर्थालंकार सामान्यतः साधला असें समजतात. शब्दालंकारांना फक्त वर्णांचेंच सौंदर्य साधावयाचें असल्यामुळें त्यांत अर्थसौंदर्याला अवकाश मिळतोच असें नाहीं. वर्णरचना (१) क्रमानें करणें व (२) विशिष्ट प्रमाणावर करणें, या दोन तत्त्वांवर शब्दालंकारांची उभारणी आहे; व अर्थरचना (१) आडवळणानें किंवा पर्यायानें सांगणें, (२) फुगवून किंवा अतिशयोक्तीनें सांगणें, (३) लपंडावानें व अन्योक्तीनें बोलणें, व (४) दोन गोष्टींची भलीबुरी तुलना करून बिंबविणें; या चार तत्त्वांवर अर्थालंकारांची उभारणी आहे. केव्हां केव्हां शब्दालंकार व अर्थालंकार यांच्या मिश्रणानेंही अलंकार होतो. या तीन्ही प्रमुख अलंकारांची पुढें थोडक्यांत माहिती देऊं.

**४०३ शब्दालंकारः—**

( १ ) **अनुप्रासः**—विशिष्ट व्यंजनांचा पुन्हा पुन्हा उच्चार साधला म्हणजे हा अलंकार होतो. याचे तीन प्रकार आहेतः—( प ) वृत्यनुप्रास, म्हणजे एकाच व्यंजनाची पुनरावृत्ति. जसेंः—'पर्यंकावरि पडला पांडु-पृथा-पुत्र पावला पीडा' ( मोरोपंत ). ( फ ) छेकानुप्रास, म्हणजे अनेक व्यंजनांची पुनरावृत्ति. जसेंः— '**वैरि-विजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा**' ॥ (मोरोपंत),

( ब ) लाटानुप्रास म्हणजे शब्दांची भिन्नार्थानें पुनरावृत्ति. जसेंः—

"**द्विजां द्विजां मान्य, मान्यकाम कामहरा हरा** ॥
**सुरासुरास वासवा रमारमा सहा सहा**" ॥ १ ॥ ( वनविहार, १३ ).

( २ ) **यमकः**—एकाच वृत्तांत कांहीं नियमित अक्षरांची पुनरावृत्ति झाली म्हणजे त्यास यमक असें म्हणतात. यमकाच्या जाग्यावरून व व्याप्तीवरून त्याचे 'अन्त्य यमक' 'दाम यमक,' 'संदानित यमक,' 'मध्यपाद यमक,' 'पुष्पयमक,' 'अश्वघाटी यमक,' 'समुद्र यमक,' इत्यादि पुष्कळ प्रकार आहेत. मासल्याकरितां कांहीं पुढें देतों.

( य ) अन्त्य यमकः-'**कुरु सैन्यांत गमे ज्या परि रंभा-काननांत वारा हो।**
**त्या विजयश्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो!** ॥ १ ॥' ( मोरोपंत )

( र ) दामयमकः— **म्हणे श्रीराम-रमणी। रमणीय-वपुर्धरा** ॥
**धरा-कन्या जगत्पद्मा। पद्माक्षी कंबुकंधरा** ॥ १ ॥
( किच्ता कुशलवा. २-२० )

( ल ) संदानित यमकः-**पुंडरीका! क्षमा केली त्वां वैकुंठाधिका सदा** ॥
**पुंडरीकाक्ष मा-केली-स्थाना त्या नाठवी कदा**॥१॥
( किच्ता, पुंड. प्रार्थना १५ )

( व ) मध्यपाद यमकः-**कृतकृत्य लक्ष्मण, तदीय भूवरी।**
**महिमा दुराक्रम हिमाचलापरी**॥ ( वनविहार ५-५ )

( श ) पुष्प यमकः—**कितेक रथ मोडिले। ध्वज कितेकही तोडिले।**
**कितेक शर सोडिले। गज कितेकही झोडिले**॥
( मोरो. कुशलवा. १०,९ )

(ष) अश्व. यमकः—हालाहलासदृश भालास तें भासित, त्याला मृगाजिन कटीं।

दोला जटा रुळति लोलापरी, परम कोलाहल ध्वनि उठी॥

हा लाभ मानुनिच नीलालका सुकृतशीला तयास नमिती।

आला मुनी निज घराला म्हणूनि मग झाला पुढें नरपती॥१॥ (आनंदतनय)

(स) समुद्र यमकः—बहुमान सदा सांवरि साधु निका महित सज्जन वनौका।

बहु मानस दासांवरि साधुनि कामहित सज्ज नव नौका॥ (मोरो. नामरसा० ३२)

(३) **बंधः**—शब्दाक्षरांची विशिष्ट प्रकारांनीं रचना करून, 'माळ, मोर, उंट, तरवार' इत्यादि पदार्थांत किंवा 'आकृतीत' किंवा 'कोष्टकांत' तीं बसतीलशीं करणें यास बंध म्हणतात.

ह्याचे 'मालाबंध,' 'मुरजबंध,' 'गोमूत्रिका बंध,' 'सर्वतोभद्र,' इत्यादि अनेक प्रकार आहेत.

जसें, (ट) मालाबंधः—द्विरदरद रणीं करकर करती।
उरग-रय-रवें शर थरथरती॥
स्थिर-चर-हरणातुर झर पुरता।
हरहर धरणीवर तर परता॥ (वनविहार १३)

(ठ) सर्वतोभद्रः—रसारसाऽसार-सार-सार-सारर-सारसा।
रसा-सरारास-सार-सार-रास-सरा रसा॥
(वनविहार १३-४९)

| | द | | | क | | | ग | | | थ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| द्वि | र | द | क | र | क | उ | र | ग | श | र | थ |
| | णीं | | | तीं | | | वें | | | ती | |

| | च | | | झ | | | ह | | | त | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थि | र | ह | तु | र | पु | ह | र | ध | व | र | प |
| | ा | | | ता | | | णी | | | ता | |

( ट ) मालाबंध.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| र | सा | र | सा | सा | र | सा | र |
| सा | र | सा | र | र | सा | र | सा |
| र | सा | स | रा | रा | स | सा | र |
| सा | र | रा | स | स | रा | र | सा |
| सा | र | रा | स | स | रा | र | सा |
| र | सा | स | रा | रा | स | सा | र |
| सा | र | सा | र | र | सा | र | सा |
| र | सा | र | सा | सा | र | सा | र |

( ठ ) सर्वतोभद्र,

( ख ) **अर्थालंकार**::—

( १ ) **अतिशयोक्ति**. गोष्ट आहे त्यापेक्षां मोठी किंवा लहान, बरी किंवा वाईट, काल–वेळ–परिस्थिती या तीन्ही बाबतींत फुगवून सांगणें. जसें:—

**कदा नेणों वोढी, शरधिंतुनि काढी शर कदा ।**
**कदा धन्वीं जोडी, वरिवरिहि सोडी तरि कदा ॥**
**विपक्षाच्या वक्षावरि विवर–लक्षास्तव रणीं ।**
**कळे राजेंद्राची त्वरित शर–संधान–करणी ॥ १ ॥**

( रघुनाथ पंडित. )

( २ ) **अनन्वयः**—'ज्याची तयास उपमा देतां होतो **अनन्वय.**' जसें:—

**जयां प्रायश्चित्तें नसति कुनरां दे गति अशी ।**
**समर्था या लोकीं तुजसम अये ! तूंच असती ॥** ( वामन )
**'स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती ?।'** (मोरोपंत)

( ३ ) **अपन्हुतिः**—एखादी वस्तू आहे तशी नाकबूल करून तिच्यावर दुसऱ्याच वस्तूचा आरोप करणें. जसें:—

'हें मूल नव्हे, मेलें भूत आहे !' ( लौकिकोक्ति )

**न हें नभोमंडल, वारिराशी । न तारका, फेंसचि हा तयासी ॥**
**न चंद्र हा, नावचि चालताहे । न अंक तो, तीवर शीड आहे ॥१॥**

( ४ ) **आक्षेपः**—आपणच एखादें विधान करून आपणच त्यावर आक्षेप घेणें. जसें:—

**मधुकर ! ललनेचें सांग त्या वृत्त आम्हां ।**
**तुजसि न अथवा ती दृष्ट झालीच रामा ॥**
**जरि तुज कळता तो त-न्मुखोच्छ्वास-गंध ।**
**तरि चघळित कां हा राहतासी मरंद ? ॥ १ ॥**

५ **अप्रस्तुतप्रशंसा** किंवा **अन्योक्तिः**—मनांतून एकास उद्देशून बोलावयाचें असतां दुसऱ्यास बोलून तें कार्य साधणें. जसें:—

**गर्वें गर्जसि बहु परि जिणें तुझें व्यर्थ भासतें मजला ।**
**तव तीरीं तान्हेला जन शोधी कूप टाकुनी तुजला ॥ १ ॥**

या पद्यांत दानपराङ्मुख श्रीमंतास बोलावयाचा मजकूर समुद्रास उद्देशून बोलून दाखविला आहे.

६ **अर्थांतरन्यासः**—सहज ओघांत आलेली एखादी गोष्ट नमूद करून तिच्या पुष्टीकरितां सर्वमान्य होईल अशा एखाद्या सिद्धांतवचनाचा आधार देणें. जसें:—

**तवितर खग भेणें वेगळाले पळाले ।**
**कवळिति निज बंधू, बाष्पबिंदू गळाले ॥**

**स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ।**
**कठिन समय येतां कोण कामास येतो ? ॥ १ ॥** ( रघु. पंडित )

( ७ ) **उत्प्रेक्षा.** एखादी वस्तु निकट साम्याचे योगानें जणुं काय दुसरीच भासते आहे किंवा दुसऱ्या वस्तूचे गुण प्रदर्शित करते आहे असें वर्णन करणें. उदाहरणार्थ,

**कीं महांभोधिचा बाळ हा गोमटा । खेळतां पावला अंबराच्या तटा ॥**
**तोल जाऊनिया पातली भोवळी । त्यामुळें तत्तनू वांकडी जाहली ॥१॥**
( गृहविहार ).

**टीपः—**या अलंकारांत 'कीं', 'किंवा', 'जणुं', इत्यादि कोणता तरी शब्द बहुधा असतो, व तो अलंकार ओळखण्यास उपयोगी पडतो.

( ८ ) **उपमा.** दोन वस्तूंचें साम्य सुंदर वर्णिलें असतां उपमा होते. ज्या वस्तूला उपमा द्यावयाची ती वस्तु म्हणजे 'उपमेय', ज्या वस्तूची उपमा द्यावयाची ती वस्तू म्हणजे 'उपमान', ज्या बाबतींत दोघींचें साम्य दाखवावयाचें ती बाब म्हणजे 'साधारण धर्म', आणि उपमा व्यक्त करणारा 'सारखा', 'सा', 'प्रमाणें', 'जसा-तसा' इत्यादि 'उपमावाचक' शब्द; अशीं उपमेचीं चार अंगें आहेत. तीं सर्व ज्या उपमेंत असतील ती 'पूर्णोपमा', व त्यांतील एखादें जिच्यांत कमी असेल ती 'लुप्तोपमा' अशी भाषा आहे. जसें:—

**तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रा-रथीं, जसा पाटीं ।**
**सुचिर क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं ॥ १ ॥**
( मोरोपंत ).

( ९ ) **दीपक.** एरवीं अगदींच विलग अशा दोन किंवा अधिक वस्तूंची साम्यतादर्शक अशा एखाद्याच गुणांत, क्रियेंत, किंवा संबंधांत समानता दाखविणें. जसें:—

**दुर्मंत्रें नृप, संगतीस्तव यती, कीं पुत्रही लालनें ।**
**वेदानध्ययनें द्विजाति, कुल दुष्पुत्रें, खलाराधनें ॥**
**नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा, लाज मद्यें फुका ।**
**शाठ्यें मित्रपण, प्रवासगमनें स्नेह, प्रमादें रुका ॥ १ ॥** ( वामन ).

**टीपः**—या अलंकारासच कोणी ‘तुल्ययोगिता’ असें म्हणतात. उपमेप्रमाणें या अलंकाराची मांडणी नसते, दोन वस्तूंचें पूर्ण साम्य दाखविलेलें नसतें तर फक्त एका विशिष्ट बाबतींत साधारणतः बहुधा एकच क्रियापद घालून दाखविलेलें असते. वरच्या उदाहरणार्थ अनेक भिन्न पदार्थांचा ‘नासे’ या एका क्रियेंत समन्वय केला आहे.

( १० ) **दृष्टांत**. एखादें विधान प्रसंगाच्या ओघांत करून त्याचा तात्त्विक खरेपणा शाबित करण्याकरितां दुसरा एखदा दाखला देणें. जसें:—

**न कळतां पद अग्निवरी पडे । न करि दाह असें न कधीं घडे ॥**
**अजित–नाम वदो भलत्या मिसें । सकळ पातक भस्म करीतसे ॥१॥**
( वामन ).

( ११ ) **परिकर**. प्रसंगाला अनुरूप अशा विशेषणांचा विशेष्याशीं उपयोग करणें. जसें:—

**सस्नेह माता, सकुतूहला सुता, मातामही विस्मित, विक्लवा वधू ।**
**सोडूनिया स्वव्यवसाय पातल्या देखावया तो गुण-कौमुदी-विधु ॥ १ ॥**
( वनविहार, १ )

१२ **परिसंख्या**. अनेक पदार्थांमध्यें प्रसंगानुसार एक पदार्थ निवडून त्याज्य पदार्थांचा उघड, किंवा गर्भित उल्लेख करणें; अथवा एका पदार्थाची आवड व दुसऱ्याची नावड दाखविणें जसें:—

**‘ शूर भुजांनीं क्षत्रिय, शब्दांनीं विप्र, पार्थ चापानें ।**
**केवळ मनोरथांनीं कर्णा तूं शूर, न प्रतापानें ॥ १ ॥ ’**
( मोरोपंत )

**टीपः**—‘ श्लेषा’चा उपयोग केल्यानें परिसंख्या विशेष खुलते. जसें:—

**जेथें ‘ शकुनिवध ’ असे भारत–गोष्टींत न स्वगेहांत ।**
**‘ द्विजपतन’हि वृद्धपणावांचुनि जेथें दिसे न स्वप्नांत ॥ १ ॥**

( १३ ) **प्रतीप**. सामान्य व्यवहारांतलें उपमेय व उपमान यांची उलटापालट करून उपमा मांडणें, किंवा प्रसंगीं गौण जें उपमेय त्यालाच श्रेष्ठ ठरविणें. जसें:—

**हलाहला ! गुरुच मी अतिदारुणांचा ।**
**आहे, असा न धरि बा मनिं गर्व साचा ॥**
**कीं त्वत्समान भुवनांत अनंत साचीं ।**
**आहेत तीक्ष्ण वचनें अजि दुर्जनांचीं ॥ १ ॥**

( १४ ) **पर्यायोक्त**. एखादा मजकूर आडवळणानें सांगणें. जसें:—

**अलिकुलवहनाच्या वाहना नेत होते ।**
**शशधर–वहनानें ताडिलें मार्गपंथें ॥**
**नदि–पति-रिपुचा तो तात भंगूनि गेला ।**
**रवि–सुत महिसंगें फार दुःखार्त झाला ॥ १ ॥**

( १५ ) **प्रस्तुतांकुर**. मनांतली गोष्ट उघड न बोलतां दुसऱ्या कृत्रिम उपायानें बोलून दाखविणें. जसें:—

**काका कुशब्द करिसी, करि तूं सुखानें ।**
**नाहींच बोल तुज काय वदूं मुखानें ॥**
**धाताच मूढ अति जो तुज सारख्यास ।**
**दे कोकिळासहित आम्रवनीं निवास ॥ १ ॥**

**टीपः**—' अन्योक्ती'मध्यें एकास उद्देशून केलेलें भाषण निखालस दुसऱ्यास लागू करावयाचें असतें, पण ' प्रस्तुतांकुरा'मध्यें एका व्यक्तीस बोललेलें भाषण त्याच व्यक्तीस लागू करावयाचें असतें. मात्र तें लागू करण्याकरितां कृत्रिम उपायाचा म्हणजे दुसऱ्याची अप्रस्तुत निंदा इत्यादि उपायांचा अवलंब केलेला असतो हा त्या अलंकारांमध्यें फरक आहे.

( १६ ) **प्रश्न**. एखाद्या प्रश्नाचें उत्तर निर्विवाद हें ठाऊक असूनही तें जणुं काय दुसऱ्याच्या तोंडून काढण्यासाठीं प्रश्नरूपानें ठेवणें. जसें:—

**चित्त प्रसन्न नसतां उपचाराग्रह नव्हेत जाच कसे ? ॥**
( मोरोपंत )

( १७ ) **भ्रांति**. दोन वस्तूंच्या साम्यामुळें एकीस पाहून दुसरीचा भास झाला व त्याचा परिणाम भूल पडण्यांत झाला असें खरें किंवा काल्पनिक वर्णन करणें. जसें:—

**चापेकळी परिसही सरळत्व नाकीं ।**
**तीचा धरी अधर विद्रुम—भावना कीं ॥**
**भासे मनांत मज बिंब—फल-भ्रमानें ।**
**कीं सत्य चंचु-पुट ओढविलें शुकानें ॥ १ ॥** ( रघु. पंडित )

( १८ ) **संदेह.** भ्रांतिमान् अलंकारांतला भ्रम मुग्ध दाखविला असला म्हणजे त्यास संदेह अलंकार म्हणतात. जसें:—

**लपवी स्वकरांत नील तो मणि, तर्क स्वजनें करावया ।**
**उघडी करि मूठ, ना कळे तरि हातांतिल वस्तु त्याचिया ॥ १ ॥**
( गृहविहार )

**टीपः**—एका वस्तूचे ठिकाणीं दुसरीची शंकाच जोंपर्यंत आहे तोंपर्यंत संदेह, ' व त्या शंकेचें भूल पडलेल्या रूनींत पर्यवसान झालें म्हणजे भ्रांतिमान् होतो. कोणी या दोन्ही अलंकारांना एकच समजतात.

( १९ ) **मिथ्याध्यवसति** किंवा **निदर्शनाः**—एका गोष्टीची असंभाव्यता तसल्याच दुसऱ्या असंभाव्य गोष्टीचा दाखला देऊन सांगणें. जसें:—

**सर्पातें बिसतन्तुनें सुदृढ तो बांधावया इच्छितो ।**
**किंवा वज्रमणी शिरीष-कुसुमें भेदावया धावतो ॥**
**किंवा तो मधुबिंदुनें मधुरता क्षाराब्धिला आणतो ।**
**जो मूर्खास सुभाषितें वश करूं ऐसें झणीं बोलतो ॥ १ ॥**
( वामन )

**टीपः**—' निदर्शना, दीपक, दृष्टांत व अर्थांतरन्यास' यांतील भेद लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. ' निदर्शने ' मध्यें अशक्य गोष्टींचे दाखले दिलेले असतात. ' दपिका ' मध्यें व ' दृष्टान्ता ' मध्यें अशक्य गोष्ट नसते. ' दृष्टान्तां ' तील दाखला मूळ विधानासारखाच स्पष्ट व बहुधा एकच असतो. ' दीपका 'मध्यें दृष्टान्ताची गोष्ट केवळ सूचित केलेली असून क्रियापद एकच असतें. दृष्टान्तांतील मूळ विधान व दाखला दोनी विशिष्टच असतात, पण ' अर्थान्तरन्यासा ' मध्यें मूळ विधान तेवढेंच विशिष्ट असून दाखला सर्व-साधारण सिद्धांत असतो.

( २० ) **रूपकः**—दोन वस्तूंचें साम्य दाखविण्यासाठीं एकीवर दुसरीचा आरोप करणें. जसें:—

हा मेघ आर्द्र–महिषोदर–तुल्य काळा ।
शंखाकृती धरि करांत बलाक–माळा ॥
विद्युत्प्रभा–वसन पीत करूनि कांसे ।
विष्णूच आक्रमितसे गगना विलासें ॥ १ ॥

( २१ ) **लौकिकोक्तिः**—लोकांत प्रचलित असलेल्या म्हणींचा उपयोग करणें. जसें:—

संत म्हणाति ' सप्तपदें सहवासें सख्य साधुशीं घडतें ' ॥

( २२ ) **वक्रोक्तिः**—प्रश्नाचें सरळ उत्तर न देतां द्व्यर्थी किंवा लपंडावाचें उत्तर देणें. जसें:—

तूं गा कोण ? अपूर्व; कोठ वससी ? हें विश्व जी तत्वतां ।
पाळी कोण तुतें ? अनाथ अजि मी, त्राता न मातापिता ॥
( वामन )

( २३ ) **विरुद्धगुणन्यासः**—दोन वस्तूंचे अगदीं परस्परविरोधी गुण दाखवून त्यांची तुलना करणें. जसें:—

धनपति जरि तूं रे, मी असे शास्त्रवेत्ता ।
भट जरि समरीं तूं, मी महावादि–जेता ॥
अनुचर जरि तूतें सेविती, छात्र मातें ।
न गणसि मज, जातों तुच्छ मानूनि तूतें ॥ १ ॥ ( वामन ).

( २४ ) **विरोधः**—एकाच वस्तूवर दोन विरोधी गुणांचा आरोप करणें. जसें:—

मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥
( तुकाराम ).

( २५ ) **विरोधाभासः**—दोन गोष्टींमध्यें कृत्रिम शब्द-योजनेनें विरोधाचा खोटा भास उत्पन्न करणें. जसें:—

मारी यांत बुडी जो तो तरे, यास सकर्दमा ।
मानवाधमही पावे पाहतां गति उत्तमा ॥१॥ ( वनविहार, १३-९ ).

**टीपः**—' विरोध ' अलंकारांतला विरोध खरा असतो व 'विरोधाभासां'तला कृत्रिम असतो.

( २६ ) **विभावना**. कार्योत्पत्तीला पुरेशी सामग्री असूनही कार्य झालें नाहीं, किंवा पुरेशी सामग्री नसूनही कार्य झालें असें भासविणें. जसें:—

**आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध।**
**परि भूप पुत्र–मोहें केला पहिल्यापरिसही अंध ॥ १ ॥** (मोरोपंत).

( २७ ) **विषम**. विपरीत परिस्थितींचें अनुकूल परिस्थितीवर दिसणारें वर्चस्व अनुकूल परिस्थितीशीं सहानुभूतिपूर्वक दाखविणें. जसें:—

**मदन–शत्रु–शरासन हें महा। मदनमूर्तिच केवळ राम हा ॥**
**करिल सज्ज कसा धनु आपण। अहह दारुण तात! तुझा पण ॥ १ ॥** ( वामन ).

( २८ ) **व्यतिरेक**. उपमान व उपमेय यांचें साधर्म्य दाखवून लगेंच वैधर्म्यही दाखविणें व क्वचित् उपमेयच श्रेष्ठ आहे असें ठरविणें. जसें:—

**जी मजलागी ग्रंथाची स्वामी। दूजी सृष्टि केली तुह्मी ॥**
**तें पाहूनि हांसों आह्मीं। विश्वामित्रातें ॥ १** ( ज्ञानेश्वर )

**श्रीरामानें एक क्रतु करुनी एक राक्षिला विप्र।**
**नामा! नेले, नेशी अमित क्रतु साङ्ग सिद्धिला क्षिप्र ॥ १ ॥**
( मोरोपंत ).

( २९ ) **व्याजस्तुति** मनांत असेल त्याच्या उलट टोंचून बोलणें. जसें:—

**पितामह वदे तदा प्रबळ तूं पृथानंदना।**
**रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना ॥,**
**स्वयें गतवयस्क मी, सरस वीर तूंरे नवा।**
**भिडें रणधुरंधरा, जय घडो सुखें वा न वा ॥ १ ॥** ( वामन ).

( ३० ) **व्याजोक्ति**. एखाद्या क्रियेचें खरें कारण छपवून दुसरेंच सांगणें. उदाहरण,

**केश धवल हे विधुकान्तीनें। किंवा कां ते भस्मलेपनें ॥**
**नसे जरठ मी वार्धक्यानें। असें हसत जो सांगतो ॥ १ ॥**
( शारदा १ ).

( ३१ ) **सम** दोन वस्तूंचा उचित योग किंवा क्रियांचा सुंदर मेळ जमतो असें वर्णन करणें. जसें:—

**वाटे जो रमणीय भूषण वनश्रीच्या मुखींचें भला।**
**आम्रा त्या पिक सेवितां समसमां संयोग कीं जाहला॥**
( रू० चिपळूणकर )

( ३२ ) **सार.** एखाद्या पदार्थाचा धर्म, किंवा क्रियेचा गुण क्रमानें चढवीत किंवा उतरवीत नेणें. जसें:—

**आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला।**
**झाला तशांत जरि वृश्चिक-दंश त्याला॥**
**झाली तयास तदनंतर भूतबाधा।**
**चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा॥ १॥** ( वामन )

( ३३ ) **स्वभावोक्ति.** एखाद्या परिस्थितीचें साध्या भाषेंत हुबेहूब शब्दचित्र वठविणें. जसें:—

**टाकी उपानह, पदें अतिमंद ठेवी।**
**केली इजार वरि डौरहि, मौन सेवी॥**
**हातीं करी वलय उंच अशा उपायीं।**
**भूपें हळूंच धरिला कलहंस पायीं॥ १॥** ( रघु० पंडित )

( ३४ ) **अधिक.** एकापेक्षां मोठा असणारा दुसरा पदार्थ प्रसंग-विशेषीं तुलनेनें लहान ठरविणें, व लहान असणारा पदार्थ मोठा ठरविणें. जसें:—

**नृपदर्शनें मुनिवरास जाहला। बहु मोद तो न जठरांत मावला॥**
**जरि यामिनीचरवधार्थ सेविला। उदराशि सर्व उदरांत सांठला॥१॥**
( वनविहार )

( ३५ ) **असंगति.** क्रिया एके ठिकाणीं व परिणाम दुसऱ्या ठिकाणीं अशी विसंगति दाखविणें.

जसें:—**अहो खल-भुजंगाची वधरीति विलक्षण।**
**एकाचा चावतो कान, दुज्याचें होय कंदन॥ १॥**

( ३६ ) **उल्लेख.** एकच वस्तू एकाच वेळीं वेगवेगळ्या तऱ्हेनें भासली असें वर्णन करणें. जसें:—

मल्लां वज्र गमे, नरां नृप गमे, काम स्वयें स्त्रीजना ।
गोपां आप्त, खळां नृपां प्रभु, शिशू माता पित्यांच्या मना ॥
कंसा मृत्यु, अशक्त पामर जनां, संतांस तत्वामृत ।
श्रीशेषासन यादवां हरि दिसे रंगांत रामान्वित ॥ १ ॥ ( वामन )

( ३७ ) **काव्यार्थापत्ति.** अमुक आहे तर अमुक झालेंच पाहिजे असें तर्क-शुद्ध ठरविणें. जसें:—

कुपित मुनिवरांचा शापही वंद्य मानी ।
क्षितिवरि अवतारां घेत जो चाप-पाणि ॥
गृह-निकट-समेता त्यास भक्तें करावी ।
विनति मग न देवें ती कशी आदरावी ॥ १ ॥ ( वनविहार )

( ३८ ) **चेतनागुणोक्ति.** अचेतन पदार्थांना सचेतनांप्रमाणें मानून बोलणें. जसें:—

दारिद्य मित्रा ! वससी शरीरीं । माझ्याच तूं मानुनि सौख्य भारी॥
परंतु वाटे मज दुःख मोठें । मेल्यास मी जाशिल सांग कोठें ॥ १ ॥
( गोडबोले )

( ३९ ) **परिवृत्ति.** सारख्या सारख्या किंवा कमी जास्त पदार्थांचा मोब-दला वर्णन करणें. जसें:—

प्रभु-पाद-विलीन-चित्त होतां । कपि मोहास अतीत सर्व झाला ॥
रघुनाथ-पदावपात-मूल्यें । मिळवी तो परमोन्नता पदाला ॥ १ ॥
( वनविहार )

( ४० ) **यथासंख्य.** कांहीं वस्तूंचा क्रमानें उल्लेख करून त्याच क्रमानें त्यांच्यासंबंधीं कांहीं सांगणें. जसें:--

मानी मनोजशर हारतुरे फुलांचे । कंदर्प-कोप-वचनें ध्वनि कोकिलांचे॥
राका-शशी मदनदर्पण भाविलाहे । नेघेचि, तो न परिसे, न तयास पाहे ॥ १ ॥ ( रघु. पं. )

( ४१ ) **काव्यलिंग.** दोन गोष्टींतला कार्यकारणसंबंध, 'कारण' किंवा 'म्हणून' वगैरे शब्द गाळून, गर्भित ठेवणें. जसें:—

**मदना! माझिया वाटे क्षण जाऊं नको कसा।**
**हृदयीं जागतो माझ्या धूर्जटी यामिनी-दिसा॥ १॥**

(ग) **मिश्रालंकार.**

(१) **श्लेष.** शब्दाच्या अक्षररचनेची जरूरीप्रमाणें वेगवेगळ्या तऱ्हेनें फोड करून त्यांतून वेगवेगळे अर्थ काढणें. जसें:—

**ते शीतळोपचारीं जागी झाली हळूच मग बोले।**
**'औषध नलगे मजला' परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले॥१॥**
(रघु० पं०)

**४०४.** अर्थालंकारांत पुष्कळ वेळां परस्परानुकूल धर्म असल्यामुळें एकाच पद्यांत अनेक अलंकार येतात, व तेथें त्या अलंकारांचा संकर झाला आहे असें म्हणतात. जसें:—

**"अभीष्ट वरितात जे तव कथेस विश्वासती।**
**भली असुरवंचनीं, श्रुत असेचि विश्वास ती॥**
**कथा कशि सखी तिची? ठकवुनी हरी संचितें।**
**तरी अमृत दे, असें सदय दाखवी वंचितें॥ १॥"**

या केकेमध्यें 'मोहिनी' या उपमानापेक्षां 'कथा' या उपमेयाचें श्रेष्ठत्व दाखविल्यामुळें 'व्यतिरेक' अलंकार झाला आहे. शिवाय मोहिनी आणि कथा यांच्या परस्परविरुद्ध क्रियांचा निर्देश केला असल्यामुळें 'विरुद्ध गुणन्यास' ही झाला आहे. म्हणून येथें त्या दोन्ही अलंकारांचा संकर आहे.

**४०५.** कांहीं अलंकारांतला अर्थ अगदीं सारखा असून केवळ शब्दांच्या भिन्न मांडणीवरून त्यांना वेगळीं नांवें दिलीं आहेत. जसें:—

| शब्दाची मांडणी | अलंकार ओळखण्याचें गमक | नांव |
|---|---|---|
| १ मुख चंद्रासारखें सुंदर आहे. | 'सारखें' 'सा' वगैरे शब्द. | उपमा. |
| २ मुख जणुं काय चंद्र आहे. | 'जणुं काय,' 'कीं' वगैरे शब्द. | उत्प्रेक्षा. |
| ३ मुख नव्हे, चंद्र आहे. | 'अमुक' नव्हे, 'तमुक' आहे असा उल्लेख. | अपन्हुती |
| ४ मुखरूपी चंद्र आहे किंवा मुखचंद्र आहे. | एकावर दुसरीचा प्रत्यक्ष आरोप 'रूपी,' 'हाच' इत्यादि शब्द किंवा उपमेयोपमानांचा समास | रूपक |

| | | |
|---|---|---|
| ५ मुखापुढें चंद्र फिका आहे. | उपमेयाला मोठेपणा. | व्यतिरेक. |
| ६ मुखासारखें सुंदर मुखच. | ज्याची त्यालाच उपमा | अनन्वय. |

४०६. वर दिलेल्या अलंकारांशिवाय संस्कृत साहित्यकारांनीं आणखी पुष्कळच अलंकार सांगितले आहेत, पण ते विशेष प्रचारांत नाहींत व त्यांच्यांत अर्थाचें सौंदर्यही उपरिनिर्दिष्ट अलंकारांइतकें नाहीं. उदाहरणार्थ 'सहोक्ति' व 'विनोक्ति' हे दोन अलंकार घेऊं. 'अमक्यासह तमुक,' किंवा 'अमक्याविना तमुक' असें थोडें खुलवून सांगितलें म्हणजे हे अलंकार होतात. जसें:—'रामानें राजेलोकांच्या मस्तकांसह धनुष्य वांकविलें' ही "सहोक्ति" आहे; व 'तानेशिवाय जसा राग तसा दानावांचून राजा होय' ही "विनोक्ति" आहे. इंग्रेजींतील कांहीं अलंकारही अलीकडे मराठींत घेण्यांत आले आहेत, पण तेही विशेष महत्त्वाचे नाहींत. अलंकाराच्या चांगुलपणाची मुख्य खूण म्हणजे त्यांतील अर्थाचें सौंदर्य ही होय.

## अभ्यासपाठ १ ला.

'शुक—भाषणानुकार प्रेमें करितो मयूर हें चित्र!' या पद्यपंक्तींत कोणता अलंकार आहे? यांत 'विरोधाभास' आहे. कारण अर्थामध्यें भासणारा विरोध 'शुक' म्हणजे 'शुकाचार्य' व 'मयूर' म्हणजे 'मोरोपंत' असा अर्थ घेतल्यानें उरत नाहीं. (कलम ४०३,२५).

## अभ्यासपाठ २ रा.

'अंगकाठी, भ्रूलता, बाहुदंड' या शब्दांत कोणता अलंकार गर्भित आहे तें सांगून तो स्पष्ट मांडून दाखवा. या शब्दांत अंगावर काठीचा, भ्रूवर लतेचा, बाहुवर दंडाचा, असे प्रत्यक्ष आरोप केले असल्यामुळें तीं गर्भित रूपकें आहेत. अलंकाररूपानें तीं (१) त्याचें अंग ही काठी आहे, (२) त्याची भ्रू ही लता आहे, व (३) त्याचा बाहु हा दंड आहे, अशीं मांडतां येतील. (कलम ४०३,२०).

## अभ्यासपाठ ३ रा.

'राम लक्ष्मणासह वनास गेले' ही 'सहोक्ति' होईल काय? होणार नाहीं. कारण अलंकार मानण्याजोगें अर्थसौंदर्य त्या वाक्यांत नाहीं (कलम ४०६).

### अभ्यासपाठ ४ था

'जो जो जिवाला जपतो' या वाक्यांत कोणता शब्दालंकार आहे? यांत एकाच 'ज' या व्यंजनाची पुनरावृत्ति झाली असल्यानें वृत्त्यनुप्रास झाला आहे ( कलम ४०३,१५ ).

### अभ्यासपाठ ५ वा

'झाडाच्या मुळाला पाणी घातल्यानें त्याला फुलें येतात' हा मजकूर 'असंगति' अलंकारांत मांडून दाखवा. 'असंगति' अलंकाराचें लक्षण क्रिया एके ठिकाणीं व परिणाम दुसरे ठिकाणीं हें असल्यामुळें झाडांना पाणी घालण्याची जागा म्हणजे त्यांचे पाय व फुलें येण्याची जागा म्हणजे त्यांचें मस्तक अशी कल्पना बसविली पाहिजे. मग असें म्हणतां येईल. "झाडें फार कृतज्ञ आहेत, त्यांच्या पायांची जर थोडी सेवा केली तर तिचा भार त्यांच्या मस्तकावर दिसूं लागतो." ( कलम ४०३,३५ ).

### अभ्यासपाठ ६ वा.

'लक्ष्मी', व 'कुबेर' 'हीं दोन व्यक्तींचीं नांवें मानून व मग श्लेषाचा उपयोग करून 'विरोध' किंवा 'विरोधाभास' अलंकार बनवा. तसा खरा व खोटा विरोध दांखविण्यासाठीं त्या दोघांच्या श्रीमंतीला खऱ्या विरोधी क्रिया घेतल्या पाहिजेत. म्हणून 'गोवऱ्या वेचते लक्ष्मी, मागे भीक कुबेरही' असें म्हणतां येईल. ( कलम ४०३,२५ ).

### अभ्यासपाठ ७ वा.

'भीष्म ग्रीष्म-तरणि-सा, अर्जुन हेमंत-तरणि-सा गमला' या आर्यार्पक्तींत कोणता अलंकार आहे तें सांगा व त्याचा थोड्या फरकानें दुसरा एखादा अलंकार बनवा. 'सा' या उपमावाचक शब्दावरून या उपमा आहेत. तो 'सा' काढून टाकल्यानें त्यीं रूपकें होतील. व 'सा' चे जागीं 'कीं' ठेवल्यानें उत्प्रेक्षा होतील ( कलम ४०५ ).

# पाठ चौतिसावा.

## साहित्याचीं साधनें.

**४०७** साहित्याची शोभा वाढण्यास व तें प्रभावी होण्यास ज्याप्रमाणें अलंकारांचा उपयोग होतो, त्याचप्रमाणें इतर साहित्यलेखकांनीं बनविलेले सुंदर अर्थाचे कांहीं आयते साजही उपयोगीं पडतात. ते म्हणजे 'सुभाषित,' 'कोटी,' 'विनोद्-वचनें,' 'म्हणी' इत्यादि होत. अलंकारांप्रमाणेंच यांचाही प्रसंगाचें औचित्य पाहून उपयोग करावयाचा असतो; परंतु अलंकार आपल्याच कल्पनेनें निर्माण व्हावयाचे असतात व हे साज आयते तयारच बहुधा मिळतात हा दोन्हींत फरक आहे. चांगले साहित्यकार प्रसंगविशेषीं असले साज स्वतःही तयार करूं शकतात, व भाषेमध्यें ते कायमचीं भूषणें होऊन राहतात. अलंकारांचें महत्त्व प्रसंगापुरतें असून ते ज्याचे त्यासच उपयोगाला येतात, पण या साहित्य-शृंगारांचें महत्त्व चिरकालिक असून ते एकाचे दुसऱ्यास उजळ माथ्यानें वापरावयास येतात. आतां त्यांचा क्रमानें विचार करूं.

**४०८ सुभाषित**. "शब्दांच्या रचना-चमत्कृतीनें व अर्थाच्या विशिष्टत्वानें मनास आल्हाद देणारें भाषण म्हणजे सुभाषित." संस्कृत साहित्यांत सुभाषिताची व्याप्ति मोठी मानली असून, साहित्यकारांनीं 'समस्या, कूट, अंतरालाप, बहिरालाप, प्रश्नोत्तर' वगैरे रचनाप्रकारही सुभाषितांतच सामील केले आहेत. सुभाषिताच्या व्याख्येप्रमाणें ते जरी सुभाषितांत येत नाहींत तरी त्यांच्या योगेंही साहित्यास शोभा येत असल्यामुळें त्यांचाही आपण सुभाषिताबरोबरच विचार करूं. प्रथम सुभाषितांचीं एकदोन उदाहरणें घेऊं:—

**(१) असे जयाला धन तोचि पंडित। कुलीन तो, तोचि गुणी बहुश्रुत॥**
**सुपूज्य तो, सुंदर तो विचक्षण। धनाश्रयें राहाति सर्वेही गुण॥ १॥**

(वामन)

**(२) सद्रत्नहार मणि ताइत बाहुदंडीं।**
**कीं स्नान चंदन फुलें आणि लांब शेंडी॥**

**यांनीं खरी मिळतसे पुरुषा न शोभा।**
**वाणीच भूषण सुशिक्षित-शब्द-गर्भा ॥ २ ॥** ( किन्ता )

( ३ ) **विसरति अपकारांतें उपकारांतेंच साधु आठविती ।**
**बा! सोशितां न सा विति होय वपु न सोशितां न आठ विती ॥ १ ॥**
( मोरोपंत )

( ४ ) **आधीं होता वाघ्या। दैवयोगें झाला पाग्या॥**
**त्याचा येळकोट राहिना। मूळ स्वभाव जाइना॥** ( तुकाराम )

**टीपः**—कित्येकांच्या मतें 'सुभाषिताचें स्वरूप सांप्रत पद्यात्मक ठरलें असून' तशाच अर्थाच्या 'गद्यरचनेला सूक्ति किंवा बोधवचनें' असें नांव द्यावें. त्यांच्या मतें 'महद्भारो राज्यं नाम' ( अविमारक ), ही भासकवीची उक्ति व 'राज्य ही मोठी जबाबदारी आहे' हें त्या उक्तीचें मराठी रूपांतर हीं गद्यत्वामुळें 'सूक्ति' होत; व त्याच अर्थाचें शेक्सपिअरचें इंग्रजी वाक्य 'Uneasy lies the head that wears a crown' हें पद्यात्मक गुणामुळें 'सुभाषित' होय. तसेंच त्यांच्या मतें सुभाषित जर संपूर्ण श्लोकांत व्यक्त झालें असेल तरच त्यास 'सुभाषित' म्हणावें, एरवीं एखाद् दुसऱ्या चरणांत प्रकट झालें असल्यास त्यास 'सूत्र- सुभाषित' म्हणावें.

४०९ आतां 'समस्या'दि सुभाषित–प्रकारांचीं लक्षणें व उदाहरणें पाहूं.

( क ) **समस्याः**—श्लोकाचा एक चरण देऊन बाकीचे दुसऱ्यांनीं पुरे करावे अशी जेव्हां अपेक्षा असते तेव्हां त्या प्रश्नास 'समस्या' असें म्हणतात. समस्येच्या चरणांत अर्थाची चमत्कृति जरी नसते, तरी कल्पनेची चमत्कृति कृत्रिम उपायांनीं निर्माण केलेली असते. उदाहरणार्थ, 'पर्वाविना गिळि दिसाच विधूस राहू' ( भर दिवसा व पौर्णिमा नसूनही राहू चंद्रास गिळतो ) ही समस्या सोडविण्याकरितां बुरख्यांत झांकलेल्या स्त्रीच्या सुंदर मुखावर चंद्राचा आरोप केला पाहिजे. मग समस्या अशी सुटेलः—

**सूर्य–प्रताप–परितप्त मुखेन्दु झाला। झांकी स्व–कृष्ण–पदरें रमणी तयाला॥**
**पाहूनि त्या रसिक बोलति ऊर्ध्वबाहू। 'पर्वाविना गिळि दिसाच विधूस राहू' ॥ १ ॥**

(ख) **प्रहेलिका** (कोडें). जेथें आंतला एक व बाहेरचा एक असे दोन अर्थ असतात, परंतु वस्तुस्वरूप गुप्त ठेवण्याकरितां कोणचा तरी एक अर्थ व्यक्त करून दुसरा गुप्त राखतात त्यास 'प्रहेलिका' म्हणतात. प्रहेलिकेंत बहुधा शब्दाचा किंवा अर्थाचा श्लेष असतो. जसें:—

**(१) 'द्वंद्वो द्विगुरपिचाहं मद्गेहे नित्यमव्ययीभावः।**
**तत्पुरुष कर्मधारय येनाहं स्यां बहुव्रीहिः'॥ १॥**

ह्या संस्कृत उदाहरणांत समासांचीं नांवें युक्तीनें आणलीं आहेत. परंतु श्लोकाचा खरा अर्थ असा आहे कीं "मी 'द्वंद्व' आहें म्हणजे विवाहित आहें, 'द्विगु' म्हणजे दोन गायी बाळगून आहें, पण 'अव्ययीभाव' म्हणजे निर्धन आहें. 'तत्' म्हणजे तस्मात् हे 'पुरुष' 'कर्म धारय' अशी कांहीं व्यवस्था कर कीं, ज्या योगें मी 'बहुव्रीहि' म्हणजे धन-धान्य संपन्न होईन."

**(२) खंडेराया तुज करिते नवस। मरूं दे सासूस खंडेराया॥**
**सासू मेल्यावरी तुटेल आसरा। मरूं दे सासरा खंडेराया॥**
**सासरा मेलिया होईल आनंद। मरूं दे नणंद खंडेराया॥**
**नणंद मरतां होईन मोकळी। गळां घालिन झोळी भंडाराची॥**
**जनी म्हणे खंडो अवघे मरूं दे। एकटी राहूं दे पायांपासी॥१॥**
(जनाबाई)

या अभंगांतील 'सासू' म्हणजे 'कल्पना', 'अविद्या' म्हणजे 'नणंद' इत्यादि होत.

(ग) **अंतरालाप.** शेवटच्या ओळींत अत्यंत विपरीत दिसणारी एखादी अर्थाची कल्पना ठेवून पहिल्या तीन ओळींत विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें या दृष्टीनें शेवटच्या ओळींतील मजकुराचें समर्थन झालेलें असतें, अशा रचनेस 'अंतरालाप' म्हणतात. "गौरीमुखा चुंबित शेषशायी" ही ओळ अत्यंत विपरीत आहे, पण पहिल्या तीन ओळी जर

**हिमाद्रि-कन्या वद कोण? गात्रीं। प्राधान्य कोणा? अनुरागपात्रीं॥**
**किं कार्य आधीं? शुभ कोण देई?।**

अशा घेतल्या, तर, उत्तरें या दृष्टीनें 'गौरी, मुखा, चुंबित, शेषशायी' ही ओळ समर्थनीय ठरते.

(घ) **बहिरालाप.** चारी चरणांत विचारलेल्या प्रश्नांचें उत्तर एकाच शब्दांत अपेक्षित असून तें श्रोत्यांकडून मिळवावयाचें असल्यामुळें श्लोकांत दिलेलें नसतें; अर्थात् उत्तराच्या शब्दांत श्लेष असावाच लागतो. अशा रचनेस 'बहिरालाप' म्हणतात. जसें:—

**भाकरी करप जाय कशानें ?। किंनिमित्त सडताताहि पानें ॥**
**कां अडे तुरग घेउनि हेका ?। दे पदांत मज उत्तर एका ॥ १ ॥**

या सर्व प्रश्नांचीं उत्तरें 'न फिरविल्यानें' या शब्दांत मिळतात.

(ङ) **प्रश्नोत्तर**—प्रश्नाचें उत्तर श्रोत्यांवर न सोंपवितां श्लोकांतच दिलें असलें म्हणजे त्यास प्रश्नोत्तर म्हणतात. जसें:—

**ऊंस, भारत, तो चंद्र, सिंधु तो सलिलाश्रय ।**
**एक लक्षण सर्वांचें 'प्रति--पर्व--रसोदय' ॥ १ ॥**

**टीपः**—वरील सर्व उदाहरणांवरून हें लक्ष्यांत येईल कीं, शब्दांचा चमत्कार हा सुभाषिताचा आत्मा नसून अर्थचमत्कृति हा आहे.

**४१० कोटि व विनोद वचन.** "ज्या ठिकाणीं बोलणाराच्या वचनांत अर्थचमत्कृति असते व ती केवळ आपल्या गुणानेंच हास्योत्पादक होते, अशा वचनास 'कोटि किंवा चतुरालाप' म्हणतात; आणि जिच्या योगानें विचारांत असंबद्ध विकृति किंवा अद्भुत स्वरूप येतें व एकंदर परिणाम हास्योत्पादनपर होतो अशा कल्पनाशक्तीनें रचलेल्या शब्द-प्रबंधास 'विनोदवचन' म्हणतात." विनोद-वचनांत जें हास्य उत्पन्न होतें तें केवळ अर्थचमत्कृतीच्या आत्मगुणानें होत नाहीं, तर तदंतर्गत जे पदार्थ त्यांच्या परस्पर असंबद्धतेनें उत्पन्न होतें. कोटि शक्य तितक्या थोड्या शब्दांत खुलून दिसते तर विनोदवचन विस्तृत असतें. कोटीचा संबंध बुद्धी व कल्पना यांशीं असतो, तर विनोदाचा संबंध मनोभावांशीं विशेष असतो. कोटीचें पर्यवसान हसण्यांत तर विनोदाचें मनाच्या प्रसन्नतेंत होतें. कोटीची मौज नवेपणींच टिकते. तर विनोदाची कायम टिकते.

**४११** 'विनोद' ही एक मनाची वृत्ति आहे. त्या शब्दाच्या धात्वर्थावरून मनांतील चिंता किंवा दुःख घालवून देणारा' जो घटक तो विनोद होय. युरोपांतील जुन्या वैद्यांच्या मतें देहांत चार 'Humours' किंवा द्रव होते, व ते मनुष्यस्वभाव बनविणारे घटक होते, आणि या कल्पनेवरच Humour ला

हसूंचा अर्थ आला आहे. विनोदाचा परिपाक हास्य हें होय, व तें हसणाराच्या मनांतल्या शांतता, खेळकरपणा, आनंद, सहिष्णुता, विचारीपणा, सात्त्विकता, औदार्य, प्रेम इत्यादि गुणांचें गमक असतें. अशा प्रकारची मनाची वृत्ति बनविणारें जें वचन तें विनोदवचन होय.

**४१२** वरील विवेचनावरून 'कोटि' व 'विनोदवचन' यांतील भेद लक्ष्यांत येण्याजोगा आहे. दुसऱ्या एका दृष्टीनें असें म्हणतां येईल कीं कोटीचें स्वारस्य तिच्या चापल्यांत असतें. 'एखाद्या सुरुंगाप्रमाणें तिचा बार इतक्या अनपेक्षित रीतीनें उडून जातो कीं, तो होऊन गेल्यावर ऐकणारा हा आपल्या बुद्धीवर कसा घाला पडला याचें आश्चर्य करीत राहतो. विनोदवचनांची गोष्ट तशी नाहीं. विनोदाचें ज्ञान संपूर्ण रीतीनें एका क्षणांत होत नाहीं. तर तें हळू हळू होत जातें; व जसजसें विनोदी परिस्थितीचें वर्णन वाढत जातें तसतसा विनोदास भर येत जातो. आतां कोटी व विनोदवचनें यांचीं कांहीं उदाहरणें घेऊन पाहूं.

( क ) **कोटीः—**

**१ नमस्ते नित्य दारिद्र्या ! सिद्ध मी त्वदनुग्रहें ।**
**पाहतों जग, ना पाहे मज कोणीहि, भाग्य हें ! ॥ १ ॥**

**२ चालले दांत, पिकले केश, रोध पदीं पदीं ।**
**तृष्णा–सती न देहाला सोडी तदपि या कधीं ॥ २ ॥**

**टीपः—**श्लेषाचा उपयोग करून केलेल्या कोट्या कमी दर्जाच्या मानतात, तथापि त्यांनीं साहित्यास शोभा येत नाहीं असें नाहीं.

( ख ) **विनोदवचनें :—**

**१ उंटांच्या योजिलीं लग्नीं गाढवें वेद-पाठनीं ।**
**अन्योन्यां स्तविती दोघें, 'अहो रूप !', 'अहो ध्वनी' ! ॥ १ ॥**

**२ प्राणांहुनी थोर परान्न आहे । न अन्यथा भाषण आत्मजा हें ॥**
**चाले सदा प्राण-परंपरा ही । परान्न हें दुर्लभ नित्य पाहीं ॥२॥**

**३ धरूनिया गान-समुद्र-भीती । श्रीशारदा विव्हल होय चित्तीं ॥**
**तरावया गायन-सागराला । ती भोपळ्याच्या करि आश्रयाला ॥३॥**

**टीपः**—शेवटच्या उदाहरणांत भोंपळ्याच्या अर्थावर कोटि असल्यामुळें या श्लोकांत 'कोटी' व 'विनोद' यांचा संकार झाला आहे.

**४१३** "ज्यामध्यें संक्षेप, अर्थव्यंजकता, चटकदारपणा, लोकरूढी व बोधप्रदपणा, असतो अशा वाक्यरचनेला '**म्हण**' असें म्हणतात." म्हण हा खरें पाहिलें असतां सुभाषिताचाच एक प्रकार आहे, पण संक्षेप, गद्यांत विशेष प्रचार, सिद्धांतवत् अर्थाचें स्वरूप, अर्थव्यंजकता, व सामान्य व्यवहारांत आणि सामान्य माणसांत उपयोग या कारणांनीं म्हणीस विशिष्टत्व आलें आहे. उदाहरणार्थः— 'एकादशीच्या घरीं शिवरात्र' म्हणजे एका दरिद्री माणसाजवळ दुसऱ्या दरिद्री माणसानें याचना करणें निष्फळ आहे. म्हणींचे आणखी कांहीं मासले घेऊं.

(१) घरोघरीं मातीच्या चुली.'—प्रत्येक घरांतून साधारणतः सारखेच गुण-दोष आढळतात.

(२) 'सवकल्या भुता, चल जाऊं कालच्या शेता.'— एखाद्या खादाड मनुष्याला एकदां एक चांगला जिन्नस खावयास मिळाला म्हणजे तो तोच मागूं लागतो.

(३) 'पवळ्या जवळ बांधला ढवळा, अन् वाण नाहीं पण गुण लागला.' — चांगल्या संगतीकरितां ठेवलेल्या माणसाला चांगल्याचा गुण तर लागला नाहींच, पण एखादा दोष होता तेवढा मात्र लागला.

**४१४ संप्रदाय.** अर्थाच्या दृष्टीनें विशिष्ट तऱ्हेनें केलेली व जिच्या शब्दशः अर्थाहून एक व्यंग्यार्थ म्हणून वेगळाच असतो अशी जी चटकदार शब्दयोजना तिला संप्रदाय असें म्हणतात. म्हणीप्रमाणें संप्रदाय हे बहुधा पूर्ण वाक्यात्मक नसून एक शब्दार्थसमूह असतो, व त्यांत व्यंजकता, बोधप्रदपणा, व पूर्णवाक्यत्व यांशिवाय म्हणींचे बहुतेक गुण असतात. जसें:—'बारा पिंपळावरचा मुंजा' म्हणजे सतत वेगवेगळ्या ठिकाणी भटकत राहणारा मनुष्य. 'सवता सुभा' म्हणजे व्यवस्थित चाललेल्या कार्यांत उत्पन्न झालेली फूट. 'खाल्ल्या घरचे वासे मोजणें' म्हणजे ज्याच्या अन्नावर आपण वाढलों त्याच्याशीं कृतघ्न होणें. 'बादरायणसंबंधी' म्हणजे ओढून ताणून नातें चिकटवूं पाहणारा. 'गद्धेपंचविशी' म्हणजे मूर्खपणानें वागण्याचा पंचवीस वर्षांच्या वयाच्या सुमाराचा काळ (तारुण्य).

**४१५ वाक्प्रचार** म्हणजे शब्द समुदायाची व्याकरणोचित अर्थदृष्टीला सुटून विशिष्ट प्रकारानें केलेली रचना. जसें:—'पायांत जोडा घालणें' अंगांत घालणें इ०. हा एक भाषेचा प्रचार आहे. अर्थदृष्टीनें जरी ते बरोबर नसले तरी रूढीनें कायम झाले असल्यामुळें 'जोड्यांत पाय घालणें' असा प्रयोग करतां येणार नाहीं. 'संप्रदाय व वाक्प्रचार' यांत फरक आहे. संप्रदाय म्हणजे शब्दांच्या वाच्यार्थाला सोडून व्यंग्यार्थ सुचविणारी शब्दरचना, व वाक्प्रचार म्हणजे अर्थदृष्ट्या व्याकरणाची जी शिस्त असावयास पाहिजे तिला सोडून केलेली शब्द-रचना. प्रत्येक भाषेंत अशा प्रकारचे वाक्प्रचार व संप्रदाय रूढ झालेले असतात व ते आपल्या चटकदारपणानें भाषेला शोभा आणतात. म्हणी, वाक्प्रचार व संप्रदाय यांना इतका जिव्हाळा आलेला असतो कीं त्यांतला एखादा शब्द कमी अधिक करण्याची किंवा बदलण्याची सोय नसते. म्हणून 'हवा खाणें' बद्दल 'हवा भक्षण करणें' किंवा 'अल्लाची गाय' बद्दल 'अल्लाची धेनू' अगर 'खुदाधेनू' असले प्रयोग चालत नाहींत.

४१६ 'संप्रदाय', 'वाक्प्रचार', 'सूत्र-सुभाषित', 'कोटि' इत्यादि जे शब्द-प्रयोग पूर्ण वाक्यात्मक नसतात त्यांचा भाषेच्या सजावटीस उपयोग करणें बरेंच सोपें असतें; कारण यापैकीं कोणताही शब्दप्रयोग प्रातिपदिकाच्या अर्थानें वाक्यांत घालून वाक्य बनवितां येतें. जसें:–"त्यावेळीं मला 'कठिण समय येतां कोण कामास येतो' या वचनाचा प्रत्यय आला. "त्याची स्थिति काय, 'कुच-रोटी कुच लंगोटी' पैकी आहे," इ. पण मोठ्या म्हणी, सुभाषितें, विनोदवचनें इत्यादि वाक्यप्रबंध बहुधा ( १ ) अवतरणरूपानें जसेच्या तसेच, ( २ ) प्रश्नोत्तर-रूप दोन वाक्यें घालून, किंवा ( ३ ) तसल्या शब्दप्रबंधाचा गौणवाक्यरूपानें अंत-र्भाव करणारें एकच मोठें मिश्र किंवा संयुक्त वाक्य बनवून घालावे लागतात. जसें:–( १ ) "खाई त्याला खवखवे" हेंच तुला उत्तर. ( २ ) 'कांहो! तुम्हीं न बोलवितां बरें गाणें ऐकायला आलांत!' 'अहो, मुंगीचिया घरा कोण धाडी मूळ, देखोनियां गूळ धांव घेती.' ( ३ ) तूं त्याची आणि त्यानें तुझी स्तुति करावी हेंच ठीक; नाऱ्यानें गावें आणि केशानें ऐकावें.

## अभ्यासपाठ १ ला.

"गुणवंताचिया विद्या-शीलादि बघुनी गुणा।
दरिद्रता नाम कन्या विधि दे त्यास शाहणा ॥ १ ॥

हें साहित्याच्या कोणत्या साधनांत येणारें वचन आहे? 'या श्लोकांतील सद्गुणसंपन्न मनुष्य व दरिद्रता यांजमधील संबंध कितीतरी गमतीनें वर्णन केला आहे! व या श्लोकास कोटी म्हणावें याबद्दल मुळींच मतभेद होणें शक्य नाहीं.' ( केळकर )—कलम ४१२.

## अभ्यासपाठ २ रा

"श्रीनें गेहीं, अरण्यीं मी, त्वां मार्गी राम सोडिला।
मुद्रिके! यापुढें कोण सत्य मानी पुरंध्रिला" ॥ १ ॥

हा रचनाप्रकार कोणत्या साधन वर्गांत व कां मोडेल? या श्लोकांत सीता रामाच्या आंगठीला म्हणते, "मुद्रिके लक्ष्मीनें रामाला घरींच सोडलें, मी वनांत सोडिलें आणि आतां तूंही वाटेंत सोडिलेंस. तेव्हां स्त्रियांच्या ठिकाणीं यापुढें कोण विश्वास ठेवील बरें!" यांत अर्थाची मौज आहे, पण हास्यरसाला अवकाश नाहीं. सबब ही कोटी किंवा विनोद्वचन नाहीं. ( कलम ४१२ ). शब्दांची रचना चमत्कृती नाहीं म्हणून सुभाषित नव्हे ( कलम ४०८ ). अर्थात् हें काव्य आहे.

## अभ्यासपाठ ३ रा

"टाळूवरी डोंगर नाचताहे" ही समस्या कोणत्या वर्गांत मोडेल? व ती कशी पूर्ण कराल? या ओळींतील अर्थ विपरीत आहे, व ओळ श्लोकांतील शेवटची म्हणून दिली आहे, सबब हा 'अंतरालाप' आहे. अर्थात् पहिल्या तीन ओळींत प्रश्न करून उत्तरादाखल समस्येंतील शब्द काढले पाहिजेत. म्हणून पहिल्या तीन ओळींत असे प्रश्न करावे लागतील:–( १ ) पृथ्वी शेषानें कोठें धरिली आहे? ( २ ) दुरून साजरे कोण? ( ३ ) मोर मेघाला पाहून काय करतो? ( कलम ४०९ ग )

## अभ्यासपाठ ४ था

"स्त्रियांच्या तोंडचे 'उखाणे' कोणत्या साधनवर्गांत मोडतील? कां? ते '**प्रहेलिका**' किंवा 'कोडें' या प्रकारांत मोडतील; कारण ते द्व्यर्थी असतात. ( कलम ४०९ ख ).

## अभ्यासपाठ ५ वा.

"गाड्या बरोबर नळ्याला यात्रा, ताटांत सांडलें काय आणि वाटींत सांडले काय? व साखरेचा खाणार त्याला देव देणार." या म्हणींचा वाक्यांत उपयोग करा. ( कलम ४१६ ).

## अभ्यासपाठ ६ वा.

( १ ) एक मनुष्य नाइलाज म्हणून दुसऱ्या एका सलगीतल्या मनुष्याचीं आर्जवें करितो.

( २ ) एका मनुष्याला कांहीं प्रयत्न न करतां मोठी लाट लागली.

( ३ ) एक मनुष्य दुसऱ्यावर आलेलें संकट पाहून शहाणा झाला.

या तीन प्रसंगीं तुम्हीं कोणत्या म्हणींचा उपयोग कराल? पुढील म्हणींचा उपयोग करावा.

( १ ) अडला नारायण गाढवाचे पाय धरी.

( २ ) आळशावर गंगा आली.

( ३ ) पुढच्यास ठेंच, मागला शहाणा.



# पाठ पसतिसावा.

## संकेत व न्याय.

४१७ संस्कृत साहित्यांत कांहीं व्यावहारिक दाखले रूढ झाले आहेत त्यांस 'न्याय' असें म्हणतात. त्यांचा उपयोग बहुधा दृष्टांत देण्याकडे होतो. यांतील कांहीं न्याय मराठींत आले आहेत, पण ते आपल्या मूळ स्वरूपांतच येतात; भाषांतर-रूपानें येत नाहींत. संस्कृत न्यायांच्या धर्तीवर एकादा मराठी न्यायही बनविलेला आढळतो. जसें:-- '**रंग-बेगडीचा न्याय**' (तुकाराम). या न्यायांत बहुधा दोन पदार्थांतील संबंध सुचविलेला असतो व तसला संबंध वाक्यांत प्रसंगोपात् आला म्हणजे मूळ न्यायाचा आधारासाठीं किंवा दाखल्यासाठीं उपयोग बहुतकरून तृतीया विभक्तींत करतात. जसें:-"वैद्यानें औषध द्यायला व रोग्याला गुण यायला केवळ 'काकतालीय-न्याया' नेंच गांठ पडते असें नाहीं."

**टीपः**--'न्यायां' चा उपयोग मूळस्वरूपांतच करतात, पण कांहीं न्याय मराठींत म्हणींच्या रूपानें आले आहेत. जसें:--'**पाषाणेष्टक** न्याय' म्हणजे 'दगडापेक्षां वीट मऊ'. म्हणी मात्र वाक्यरूपानें मराठींत आल्या असल्यामुळें त्यांचा उपयोग कलम ४१६ मध्यें सांगितलेल्या धोरणानुसार करावा. विशेष प्रचारांतील न्याय पुढें दिले आहेत.

१ **अहिनकुलन्याय.** साप व मुंगूस यांच्या प्रमाणें जन्मसिद्ध हाडवैर.

२ **अंधचटकन्याय.** आंधळ्याच्या हातीं चिमणी सांपडावी तद्वत् एखादा लाभ होणें.

३ **अंध-पंगु-न्याय.** आंधळ्या-पांगळ्यांच्या गोष्टीप्रमाणें एकमेकांचीं व्यंगें एकमेकांच्या साह्यानें भरून काढणें.

४ **अंधपरंपरा न्याय.** "**दृष्टि न यांतिल एकालाही ।**
**एकामागें दुसरा जाई ।**

अर्धा डोळस रस्ता दावी।
करी सांभाळ ॥ १ ॥ रानोमाळ।
आंधळ्यांची चाले माळ ॥
(वाग्वैजयन्ती)

१ **अरण्यरोदनन्याय.** व्यर्थ उपदेश, पालथ्या घागरीवर पाणी.

६ **उष्ट्रलगुडन्याय.** आपणांस मारावयाची काठी उंट जसा वाहून नतो त्याप्रमाणें आपल्याच नाशाची सामुग्री आपण पुरविणें.

७ **काकतालीयन्याय.** कावळा बसावा, ढापी मोडावी, त्याप्रमाणें एकास लागून एक गोष्ट होणें.

८ **कूपमंडूकन्याय.** विहिरींतल्या बेडकाप्रमाणें संकुचित कल्पना धरणें.

९ **घुणाक्षरन्याय.** किड्यानें पोखरलेल्या जागीं अक्षरें उमटावीं त्याप्रमाणें हातून सहज एखादी चांगली गोष्ट होणें.

१० **चंद्रचकोरन्याय.** **चंद्रसमुद्रन्याय.** } चंद्रदर्शनानें चकोरास किंवा समुद्रास जसें प्रेमाचें भरतें येतें तसें येणें.

११ **दग्धबीज न्याय.** जळलेल्या बियाप्रमाणें कार्योत्पादक गुण नाहींसा होणें.

१२ **दृषदिष्टिकान्याय.** **पाषाणेष्टक न्याय.** } 'दगडा पेक्षां वीट मऊ.' 'काळ्यापेक्षां पिठा बरा!' (शारदा).

१३ **देहलीदीपन्याय.** उंबऱ्यावरच्या दिव्याप्रमाणें एका साधनानें दोन कामें साधणें.

१४ **मंडूकप्लुतिन्याय.** बेडकाप्रमाणें वेड्यावांकड्या उड्या मारीत मूळ पदावर येणें.

१५ **लोहचुंबकन्याय.** नैसर्गिक प्रेमाची ओढ लागणें.

१६ **वह्निधूमन्याय.** धुरावरून अग्नि कळावा तद्वत् एका गोष्टीवरून दुसरी कळणें.

१७ **विषवृक्षन्याय.** आपणच वाढविलेल्या विषवृक्षाला म्हणजे पर्यायाने दुष्ट मनुष्याला राखणें.

१८ **रज्जुसर्पन्याय.** दोरीचा साप वाटावा त्याप्रमाणें भलताच भास होणें.

१९ **शाखाचंद्रन्याय.** डहाळीच्या खुणेनें चंद्र दाखवावा त्याप्रमाणें स्थूल पदार्थाच्या साह्यानें सूक्ष्म पदार्थ समजाऊन देणें.

२० **सिंहावलोकनन्याय.** सिंह ज्याप्रमाणें चालतांना मागें वळून पाहतो, त्याप्रमाणें गतगोष्टींवरून नजर फिरविणें.

२१ **स्थालीपुलकन्याय.** शितावरून भाताची परीक्षा करणें.

२२ **स्थूणा-निखनन न्याय.** खुंटा हलवून बळकट करणें.

२३ **हंसक्षीरन्याय.** हंस पाण्यांतलें दूध तेवढें काढून घेतो तद्वत् दोष टाकून गुण घेणें.

२४ **नीरक्षीरन्याय.** पाण्यांत दूध मिसळावें त्याप्रमाणें एकजीव होणें.

२५. **रवि-अरुण न्याय.** सूर्याच्या आधीं अरुणोदय थोडाबहुत उल्हास देतो त्याप्रमाणें प्रधान पदार्थाच्या आधीं गौण पदार्थाचा लाभ होणें.

**४१८** न्यायाप्रमाणेंच संस्कृत साहित्यांत कांहीं संकेत मानलेले आहेत. " संकेत " म्हणजे गृहीत मानलेली व सर्वमान्य झालेली एखादी गोष्ट. हे संकेत दोन प्रकारचे आहेत. एक ' श्रद्धाप्रधान ' व दुसरे ' कल्पनाप्रधान. ' श्रद्धाप्रधान संकेत बहुतेक ' वेद, पुराणें, स्मृतिग्रंथ, इतिहास ' वगैरेंच्या प्रमाण वाक्यावरून किंवा शास्त्रांच्या आधारांवरून ठरविलेले आहेत. कल्पनाप्रधान संकेत मात्र बहुतेक कविप्रतिभाजनित अतएव अद्भुत आहेत. या दोन्ही प्रकारच्या संकेतांचा मराठी साहित्यांत उपयोग होत असल्यामुळें त्यांतील ठळक संकेत पुढें दिले आहेत.

( क ) **श्रद्धाप्रधान** संकेत.

१ **अग्नित्रय** 'दक्षिणाग्नि', 'गार्हपत्य' व 'आहवनीय' असे तीन प्रकारचे अग्नि.

२ **अठरा पुराणें.** ( १ ) ब्रह्म, ( २ ) पद्म, ( ३ ) विष्णु ( ४ ) शिव ( ५ ) भागवत ( ६ ) मार्कंडेय ( ७ ) नारद ( ८ ) अग्नि ( ९ ) भविष्य ( १० ) ब्रह्मवैवर्त ( ११ ) लिंग ( १२ ) वराह ( १३ ) स्कंद ( १४ ) वामन (१५) कूर्म ( १६ ) मत्स्य ( १७ ) गरुड ( १८ ) ब्रह्मांड. तथापि या नांवांबद्दल सर्वांचें ऐकमत्य नाहीं.

३ **अमृतसिद्धियोग.** रविवारीं हस्त, गुरुवारीं पुष्य, बुधवारीं अनुराधा, शनिवारीं रोहिणी, सोमवारीं श्रवण, शुक्रवारीं रेवती किंवा मंगळवारीं अश्विनी नक्षत्र येणें.

४ **अवस्थात्रय.** बाल्य, यौवन व वार्धक्य.

५ **अष्टगुण** ( ब्राह्मणाचे ). १ दया २ शांती ३ अनसूया ४ पवित्रपणा ५ क्षमा ६ अनायास ७ अकार्पण्य व ८ निर्लोभवृत्ति.

६ **अष्ट दिग्गज.** " ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम व सुप्रतीक " या नांवाचे आठ दिशांना असलेले हत्ती, हे दिशांचे संरक्षक व अधिपति मानलेले आहेत.

७ **अष्ट दिक्पाल.** आठ दिशांचे आठ स्वामीः–पूर्वेचा इंद्र, दक्षिणेचा यम, पश्चिमेचा वरुण, उत्तरेचा कुबेर, आग्नेयीचा अग्नि, नैर्ऋत्येचा निर्ऋति, वायव्येचा वायु, व ईशान्येचा शंकर.

८ **अष्ट वसु.** १ आप २ ध्रुव ३ सोम ४ धर ५ अनिल ६ अनल ७ प्रत्यूष व ८ प्रभास नांवाचे देव.

९ **अष्ट विवाह.** १ ब्राह्म ( सालंकृत कन्यादान ) २ दैव ( यज्ञाच्या अखेरीस ऋत्विजास केलेलें कन्यादान ) ३ आर्ष ( वधूवरें धर्माचरण करोत या बुद्धीनें केलेलें कन्यादान ). ४ प्राजापत्य ( वरापासून गाई, बैल घेऊन केलेलें कन्यादान ). ५ गांधर्व ( वधूवरांच्या संमतीनें होणारा विवाह ). ६ आसुर ( वरापासून पुष्कळ द्रव्य घेऊन केलेलें कन्यादान ) ७ राक्षस ( वधूपक्षांतून जबरीनें वधू नेणें ) ८ पैशाच ( वधूपक्ष बेसावध असतां वधू पळविणें ).

१० **अष्ट भाव** ( सात्विक ). १ स्तंभ २ स्वेद ३ रोमांच ४ स्वरभंग ५ कंप ६ वैवर्ण्य ७ अश्रुपात व ८ प्रलय.

११ **चार खाणी.** अंडज, जारज, स्वेदज, व उद्भिज्ज.

१२ **चार देह.** **' स्थूल, ' ' सूक्ष्म, ' ' कारण, ' ' महाकारण ' । ऐसे हे चत्वार देह जाण**–रामदास.

१३ **चार अभिमान** ' **विश्व, तैजस, प्राज्ञ।**
**प्रत्यगात्मा हे अभिमान ॥** '–( दासबोध )

१४ **चार स्थानें.** ' **नेत्रस्थान, कंठस्थान।**
**हृदयस्थान मूर्धनी तें ॥**–दासबोध.

१५ **चार भोग.** ' **स्थूळभोग, प्रविविक्तभोग।**
**आनंदभोग, आनंदावभासभोग ॥**–दासबोध.

१६ **चार मात्रा.** ' **अकार, उकार, मकार।**
**अर्धमात्रा तो ईश्वर ॥**–दासबोध

१७ **कापिलाषष्ठीयोग.** भाद्रपद महिना, वद्य पक्ष, षष्ठी तिथि, मंगळवार, रोहिणी नक्षत्र, व्यतिपात योग, व हस्त महानक्षत्र एके दिवशीं जमणें.

१८ **गर्ग मुहूर्त.** प्रातःकालच्या थोडा आधींचा काळ.

१९ **गोरज मुहूर्त.** संध्याकाळीं गाई चरून परत येण्याची वेळ.

२० **घबाड मुहूर्त.** वाराच्या अंकांत तिथींचा अंक मिळवून त्या बेरजेच्या तिपटींत पंधरा मिळवून सातानें भागलें असतां बाकी जर तीन उरेल तर तो काल अत्यंत शुभ असा मानतात.

२१ **चार अवस्था.** जागृति, स्वप्न, सुषुप्ती व तुर्या.

२२ **चार अन्नें.** भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य.

२३ **चार भक्त.** आर्त, गमतीनें जाणूं इच्छिणारा, लाभाच्या इच्छेनें आलेला व ज्ञानी.

२४ **चतुरंग सेना.** हत्ती, घोडे, रथ व पायदळ.

२५ चार युगें. '**कृतयुग सत्रा लक्ष अठ्ठावीस सहस्र।**
**त्रेतायुग बारा लक्ष शाणव सहस्र।**
**द्वापरयुग आठ लक्ष चौसष्ट सहस्र।**
**आतां कलियुग ऐका ॥ १ ॥**

**कलियुग चार लक्ष बत्तीस सहस्र।**
**चतुर्युगें त्रेचाळीस लक्ष वीस सहस्र।**

**ऐसीं चतुर्युगें सहस्त्र ।**
**तो ब्रह्मयाचा एक दिवस ॥ १ ॥** ( दासबोध )

२६ **चार कर्में**, नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध.

२७ **चौदा रत्नें. 'लक्ष्मीःकौस्तुभ-पारिजातक-सुराः धन्वंतरिश्चंद्रमाः**
**गावः कामदुघाः सुरेश्वरगजो रंभादिदेवांगनाः ॥**
**अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शंखोऽमृतं चांबुधेः।**
**रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्युः सदा मंगलम्॥१॥'**

२८ **चौदा विद्या. १ ब्रह्मज्ञान २ रसायन ३ श्रुतिकथा कीं ४ वैद्यक ५ ज्योतिष ।**
**तैसें ६व्याकरण व्यवस्थित,७धनुर्विद्या महाकर्कश॥**
**८ तें संगीत ९ हयाधिरोहण १० पयःसंचार कीं ११ नाटक ।**
**१२ चोरी १३ कोक १४ पटुत्व पूर्ण चवदा विद्या मनोहारक ॥ १ ॥**

२९ **चौदा लोक** १ तल, २ अतल, ३ सुतल, ४ वितल, ५ रसातल ६ तलातल, ७ पाताल, ८ भुवर्लोक, ९ भूर्लोक, १० स्वर्लोक, ११ महर्लोक, १२ जनलोक, १३ तपोलोक, १४ व सत्यलोक.

३० **चौदा भेद** १ देश, २ किल्ले, ३ रथ, ४ हत्ती, ५ घोडे, ६ योद्धे, ७ अधिकारी, ८ अन्तःपुर, ९ अन्नसामुग्री, १० अश्वादि-सैन्यसंख्या, ११ नीति, १२ जमाखर्च, १३ द्रव्यनिधि, १४ गुप्त शत्रु. या भेदांवरून शत्रूचें बलाबल अजमावयाचें असतें.

३१ **चार आश्रम.** ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास.

३२ **चार वर्ण.** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र.

३३ **चार वाणी. " नाभीपासूनि उन्मेषवृत्ति ।**
**तेचि १ परा जाणिजे श्रोतीं ।**
**ध्वनिरूप २ पश्यंती ।**
**हृदयीं वसे ॥ १ ॥**

**कंठापासूनि नाद झाला ।**
**३ मध्यमा वाचा बोलिजे त्याला ।**
**उच्चार होतां अक्षराला ।**
**४ वैखरी बोलिजे ॥ २ ॥** ( दासबोध )

३४ **चार पुरुषार्थ**. धर्म, अर्थ, काम व मोक्ष.

३५ **तीन पुरुषार्थ–साधनें**. कर्म, ज्ञान व उपासना.

३६ **चित्तचतुष्टय**. मन, बुद्धि, चित्त व अहंकार.

३७ **चिरंजीव** ( सात ). 'अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृप आणि परशुराम.

३८ **चांद्रमान वर्ष** ३५४ दिवस. **सौरमान वर्ष** ३६५$\frac{1}{4}$ दिवस.

३९ **चौऱ्यायशी लक्ष योनी** ९ लक्ष जलचर, ४ लक्ष माणूस, २७ लक्ष स्थावर, ११ लक्ष कृमि, १० लक्ष पक्षी, व २३ लक्ष पशु.

४० **चौसष्ट कला** १ गीत, २ वाद्य, ३ नृत्य, ४ नाट्य, ५ आलेख्य–रेखाकर्म, ६ गोंदणें, ७ तांदुळरचना किंवा फुलौरा रचणें, ८ पुष्पांची शेज, ९ अंगरंजन ( मेंदी वगैरे ), १० रत्नखचित फरसबंदी, ११ जिन्नस शिस्तीनें लावणें, १२ जलतरंग, १३ प्रवेशांतील देखावे पडदे इ. तयार करणें, १४ पाणी कोंडणें, १५ चित्रकला, १६ हारतुरे तयार करणें, १७ फुलांचीं कर्णभूषणें करणें, १८ पेयें, आसवें इ. तयार करणें, १९ काशिदा, २० भरतकाम ( शिवून मोर इ. चित्रें कापडावर भरणें, ) २१ सुगंधी द्रव्यें तयार करणें, २२ वीणावादन, २३ कोडीं, उखाणे इ. सोडविणें २४ मूर्ति, पुतळे इ. ओतणें, २५ ठकविद्या, २६ वाचन, २७ ऐतिहासिक प्रवेश किंवा देखावे करून दाखविणें, २८ समस्यापूर्ति, २९ दांडपट्टा, बोथाटी इ. खेळणें, ३० बगीचाचें ज्ञान, ३१ मंत्र-यंत्र-तंत्र-ज्ञान, ३२ काव्यकल्पना, ३३ नजरबंदी, ३४ कोटिबाजपणा, ३५ सुतारकाम, ३६ बांधकाम, ३७ रत्नपरीक्षा, ३८ धातुपरीक्षा,

३९ रंगीत रत्नें तयार करणें, ४० मुलांचे खेळ, ४१ खाणींची परीक्षा, ४२ वृक्षपरीक्षा, ४३ टकरी लावण्याचें कसब, ४४ मैना, पोपट इ. बोलावयास शिकविणें, ४५ उत्साह उत्पन्न करण्याचें कसब, ४६ केश-रचना, ४७ भिन्न भाषाज्ञान, ४८ पगडबंदी, ४९ वेगवेगळे गंध तयार करणें, ५० शृंगारसाजांची रचना, ५१ इंद्रजाल-जादुगिरी, ५२ बहुरूप्याचें कसब, ५३ हातचलाखी, ५४ पाककौशल्य, ५५ मुठींतलें गुपित ओळखणें, ५६ देश-भाषेचें सांगोपांग ज्ञान, ५७ छंदोरचनाज्ञान, ५८ हरहुन्नर कसब, ५९ वस्त्रें तयार करणें, ६० फांसे खेळण्याचें कसब, ६१ वशीकरण, ६२ तौलनिक परभाषाविज्ञान, ६३ चेटुक चेडे इ. ६४ जारणमारण.

४१ **तीन ऋणें**. **देव ऋण, ऋषि ऋण**, व **पितृ ऋण**. यांची अनुक्रमें यज्ञ, अध्ययन व पुत्रोत्पत्ति यांनीं फेड होते अशी समजूत आहे.

४२ **तीन एषणा**. लोकेषणा, वित्तैषणा व पुत्रैषणा.

४३ **तीन गुण**. सत्त्व, रज, तम.

४४ **तीन दोष**. वात, पित्त व कफ.

४५ **तीन देव**. ब्रह्मा, विष्णु व महेश.

४६ **तीन ताप**. आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक.

४७ **त्रिविध कर्म**. संचित, प्रारब्ध व क्रियमाण.

४८ **तेतीस कोटि देव**. ८ वसु, ११ रुद्र, १२ आदित्य, १ अश्विनीकुमार व १ वषट्कार.

४९ **दहा अवतार**. मत्स्य, कूर्म, वराह, नरहरि, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध व कल्कि.

५० **द्वादशाक्षरी मंत्र**. ' ओं नमो भगवते वासुदेवाय. '

५१ **त्रयोदशाक्षरी मंत्र**. ' श्रीराम जयराम जयजयराम. '

५२ **नऊ द्रव्यें**. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, काल, दिशा, आत्मा व मन.

५३ **नऊ खंडें.** १ ऐंद्र २ कसेरु ३ ताम्रपर्ण ४ गभस्तिमत् ५ कुमारिका ६ नाग ७ सौम्य ८ वारुण ९ गांधर्व. काशी हें दहावें खंड मानलें आहे.

५४ **नऊ रस.** १ शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत.

५५ **नऊ रत्नें.** ( १ ) मोत्यें, ( २ ) माणिक ( ३ ) वैडूर्य ( ४ ) गोमेद ( ५ ) हिरा ( ६ ) पोवळें ( ७ ) पद्मराग ( ८ ) पाच ( ९ ) नीळ.

५६ **नऊ रत्नें.** ( विक्रम सभेंतील ). धन्वंतरि, क्षपणक, अमरसिंह, शंकु, वेतालभट्ट, घटकर्पर, कालिदास, वराहमिहिर आणि वररुचि.

५७ **नऊ भक्ति.** **‘ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मानिवेदनम् ॥ १ ॥’**

५८ **पुण्यश्लोक.** **“ पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः।**
**पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥ ’**

५९ **पांच कर्मेंद्रियें.** **“ मन वाचा आणि कर। चरण अधोद्वार ।**
**उपस्थ हे प्रकार । पांचै आणिक ॥१॥ ”**
( ज्ञानेश्वर )

६० **पांच ज्ञानेंद्रियें.** **“ तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन**
**इयें जाण ज्ञान–। करणें पांचै ॥ १ ॥**
( ज्ञानेश्वरी )

६१ **पांच कन्या.** **‘ अहल्या, द्रौपदी, सीता, तारा, मंदोदरी, तथा।’**

६२ **पांच कोश.** १ अन्नमय २ प्राणमय ३ मनोमय ४ विज्ञानमय ५ आनंदमय.

६३ **पांच कल्पतरु.** **‘ मंदार तो पारिजात संतान तिसरा द्रुम ।**
**कल्पवृक्षहि तो चौथा हरिचंदन उत्तम ’ ॥ १ ॥**

६४ **पांच प्राण.** **“ हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिसंस्थितः ।**
**उदानः कंठदेशस्थो व्यानः सर्वशरीरगः ’ ॥ १ ॥**

६५ **पांच महाभूतें.** आकाश, वायु, अग्नि, आप, पृथ्वी.

६६ **पांच विषय.** शब्द ( आकाशाचा ), स्पर्श ( वायूचा ), रूप (अग्नीचा), रस ( आपाचा ), व गंध ( पृथ्वीचा ).

६७ **पंच पंच उषःकाल.** सूर्योदयापूर्वीं पांच घटका.

६८ **पंच सूना.** गृहस्थाच्या घरीं नित्य होणारीं ( १ ) चुल्ली, ( २ ) पेषणी, ( ३ ) उपस्कर, ( ४ ) कंडणी व ५ उदकुंभ हीं पांच पापें.

६९ **ब्रह्मकर्म.** " **शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥१॥**"
( भगवद्गीता )

७० **क्षत्रियकर्म. शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ १ ॥**
( भगवद्गीता ).

७१ **वैश्यकर्म. ' कृषि-गोरक्ष्य-वाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् '**
(भगवद्गीता)

७२ **शूद्रकर्म. ' परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् '**
(भगवद्गीता)

७३ **राजगुण.** १ संधी ( तह ). २ विग्रह ( वैर ). ३ **यान** ( स्वारी ). ४ आसन ( वाट पाहणें ). ५ द्वैधीभाव (फितुरी). ६ आश्रय ( मित्राच्या पाठीशीं पडणें ).

७४ **सोळा उपचार.** आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, तांबूल-दक्षिणा, प्रदक्षिणा व मंत्रपुष्प.

७५ **पंचोपचार.** गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य.

७६ **श्रुतींच्या आज्ञा.** ( १ ) सत्यं वद. ( २ ) धर्मं चर ( ३ ) स्वाध्यायान्मा प्रमदः ( ४ ) आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः ( ५ ) सत्यान्न प्रमदितव्यम्. ( ६ ) धर्मान्न प्रमदितव्यम् ( ७ ) कुशलान्न प्रमदितव्यम् ( ८ ) भूत्यै न प्रमदितव्यम् ( ९ ) स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ( १० ) देव-

पितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ( ११ ) मातृदेवो भव-
पितृदेवो भव ( १३) आचार्यदेवो भव ( १४ ) अति-
थिदेवो भव ( १५ ) **अस्माकं यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि ।** ( १६ ) **यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि ।** ( १७ ) **ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणास्तेषां त्वयाऽसनेन प्रश्वसितव्यम् ।.**

७७ **सहा प्रमाणें**. १ प्रत्यक्ष २ अनुमान ३ शब्द ( आप्तवाक्य ) ४ उपमान ५ अर्थापत्ति व ६ अभाव. नास्तिक पहिलें एकच प्रमाण मानतात. वैशेषिक पहिलीं दोन मानतात. सांख्य पहिलीं तीन मानतात. नैय्यायिक पहिलीं चार मानतात व मीमांसक साही मानतात.

७८ **षट् दर्शनें. षट् शास्त्रें.** } सांख्य, योग, वेदांत, मीमांसा, न्याय व वैशेषिक.

७९ **षड्रिपु**. काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर.

८० **षड्रस**. कडू, तिखट, तुरट, आंबट, खारट व मधुर.

८१ **सहा ऋतु**. ( चैत्र वैशाख ) वसंत. ( ज्येष्ठ आषाढ ) ग्रीष्म. ( श्रावण भाद्रपद ) वर्षा. (आश्विन कार्तिक) शरद्. ( मार्गशीर्ष पौष ) हेमंत. ( माघ फाल्गुन ) शिशिर.

८२ **सहा गुण. आइका ' यश ", ' श्री ', ' औदार्य ' । ' ज्ञान ', ' वैराग्य ', ' ऐश्वर्य '**, ( ज्ञानेश्वर )

८३ **षडाष्टक**. एखाद्याची रास आपल्यापासून सहावी म्हणजे वैरसूचक येणें.

८४ **सप्तकंचुक**. जल, पवन, अग्नि, आकाश, अहंकार, महत्तत्व व प्रकृति.

८५ **सात धातु**. रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र.

८६ **सात पुऱ्या. अयोध्या मथुरा माया काशी कांची अवन्तिका । पुरी द्वारवती चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥ १ ॥**

८७ **साडेतीन मुहूर्त**. दसरा, दिवाळीचा पाडवा, चैत्रपाडवा, व अक्षय्य-तृतीया ½.

८८ **साडेतीन पोशाख** } पागोटें एक, शेला एक, पायजमा. किंवा झगा
**साडेतीन वस्त्रें.** } याच्यासाठीं महामुदी नांवाच्या उंची वस्त्राचा तुकडा एक. व पटक्यासाठीं अर्धे ठाण मिळून साडेतीन वस्त्रें.

८९ **साडेतीन शहाणे.** सखाराम बापू बोकील एक, देवाजीपंत चोरघडे एक, विठ्ठल सुंदर एक, व नाना फडणीस अर्धे मिळून साडेतीन.

९० **साडेसाती.** जन्मराशीपासून १२–१–२ या राशींत शनि साडेसात वर्षे राहणें.

९१ **साष्टांग नमन 'जानुभ्यांच तथा पद्भ्यां पाणिभ्यामुरसा धिया ।**
**शिरसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांग ईरितः॥१॥'**

९२ **सोळा संस्कार.** १ गर्भाधान २ पुंसवन ३ अनवलोभन ४ सीमंतोन्नयन ५ विष्णुबलि ६ जातकर्म ७ नामकरण ८ निष्क्रमण ९ सूर्यावलोकन १० अन्नप्राशन ११ चूडाकर्म १२ उपनयन १३ मेधाजनन १४ समावर्तन १५ विवाह व १६ अंत्येष्टी.

९३ **स्वर्गसुख.**

**"तया मेरू पर्वतापाठारीं । तीन शृंगें विषमहारी ।**
**परिवारें राहिले तयावरी । ब्रह्मा विष्णु महेश ॥ १ ॥**
**ब्रह्मशृंग तो पर्वताचा । विष्णुशृंग तो मरगजाचा ।**
**शिवशृंग तो स्फटिकाचा । कैलास नाम त्याचें ॥ २ ॥**
**वैकुंठ नाम विष्णुशृंगाचें । सत्यलोक नाम ब्रह्मशृंगाचें ।**
**अमरावती इंद्राचें । स्थळ खालतें ॥ ३ ॥**
**तेथें गण गंधर्व लोकपाळ । तेहतीस कोटी देव सकळ ।**
**चौदा लोक सुवर्णाचळ । वेष्टित राहिले ॥ ४ ॥**
**तेथें कामधेनूंचीं खिल्लारें । कल्पतरूंचीं वनें अपारें ।**
**अमृताचीं सरोवरें । ठायीं ठायीं उचंबळती ॥ ५ ॥**

तेथें उदंड चिंतामणि । हिरेपरिसांचिया खाणी ।
तेथें सुवर्णमय धरणी । लखलखायमान ॥ ६ ॥
परमरमणीय फांकती किळा। नवरत्नांचिया पाषाणशिळा ।
तेथें अखंड हर्षवेळा । आनंदमय ॥ ७ ॥
तेथें अमृताचीं भोजनें । दिव्य गंधें दिव्य सुमनें ।
अष्टनायिका गंधर्व गायनें । निरंतर ॥ ८ ॥
तेथें तारुण्य ओसरेना । रोगव्याधीही असेना ।
वृद्धपण आणि मरण येना । कदाकाळीं ॥ ९ ॥
तेथें एकाहुनी एक सुंदर । एकाहूनी एक चतुर ।
धीर उदार आणि शूर । मर्यादेवेगळे ॥ १० ॥
तेथें दिव्य देह ज्योतिरूपें । विद्युल्लतेसारखीं स्वरूपें ।
तेथें यशकीर्तिप्रतापें । सीमा सांडियली ॥ ११ ॥
येथें ज्या देवाचें भजन करावें। तेथें त्या देवलोकीं रहावें ।
सलोकता मुक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें ॥ १२ ॥
सुकृत आहे तंव भोगिती । सुकृत सरतांच लोटून देती ।
आपण देव ते असती । जैसे तैसे ॥ १३ ॥ (दासबोध ४-१०).

१४ सिद्धि (आठ) "अणिमा, लघिमा, प्राप्तिः प्राकाम्यं महिमा तथा ।
ईशित्वं च विशित्वं च तथा कामावसायिता ॥१॥ "

( ख ) काल्पनिक संकेतांपैकीं बहुतेक संकेत कविप्रतिभाजन्य आहेत, त्यांतील कांहीं अद्भुत रम्य असून मराठी साहित्यांत आले आहेत. ते येणेंप्रमाणें:—

( १ ) रंग.

( च ) प्रेम व लज्जा यांचा रंग तांबडा आहे.

( छ ) कपटाचा व द्वेषाचा रंग काळा आहे.

( ज ) कीर्ति व हास्य यांचा रंग पांढरा आहे.

( २ ) प्राणी.

( च ) भृंगा—भुंग्याची ओळ ही मदनाचे धनुष्याची दोरी आहे ( मौर्वी मधुकरमयी ). तो अनेक फुलांचा आस्वाद घेणारा स्वच्छंद रसिक आहे

तरी देखील 'गंधफली' वगैरे कांहीं सुवासिक पुष्पांवर त्याची निष्कारण अप्रीति आहे. तो

**'भेदी कोडें। भलेतैसें काष्ठ कोरडें।**
**परि कालिकेमाझि सांपडे। कोवालिए।'** (ज्ञानेश्वरी)

असा फुलांवर प्रेमळ आहे.

(छ) **इंगळी** (सात नांग्यांची) } शेळीला चावली असतां शेळी वाचत (पांच नांग्यांची) } नाहीं.

**'प्राणजातिये वेले। सेलिये सातवेउली मिले।'** (ज्ञानेश्वर).

(ज) **साप**–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्णांचे असून नाग हा त्यांतलि ब्राह्मण आहे. सर्पाच्या मस्तकांत 'मोहरा तोचिं अंगें, सूत न जळे ज्याच्या संगें' (तुकाराम) असा एक माणि असतो. जातिवंत नाग अपकार करणाराचा सूड घेण्यास वर्षानुवर्ष टपून असतो. त्याचें मुंगसाशी निसर्गतः वैर असतें. आग्यासर्पाच्या दंशानें वनें पर्वत सुद्धां जळून जातात, (आग्यासर्पें दग्ध होती, गिरिकंदरें–दासबोध.)

(झ) **पाल**– आपल्या कुचकुचण्यानें भविष्य सुचविते. अंगावर पडली तर स्थानपरत्वें शुभाशुभ फलें देते. (दासबोध ७–६०).

**'करितां कार्या। चुकचुके पाल ही वाया॥'** (वाग्वैजयन्ती).

(ञ) **कासव** हा प्राणी **'उवायिला अवेव पसरी।**
**नातरि इच्छावसें आवरी। आपणपांची॥'** (ज्ञानेश्वरी).
कूर्मी आपल्या दृष्टीनें पिलांचें पोषण करिते.

## (३) पशु.

(च) **सिंह**–हा पशूंचा राजा असून मोठा मानी आहे. हा **'मेघांच्या गंर्जनेनें खवळुनि वरती पाही'** (चिपळूणकर) व **'खाण्यावांचुनि'** रोडला, जरायोगें वाळला तरी उन्मत्त द्विपगंडभेदन करावयाचीच इच्छा करी' अशा स्वभावाचा आहे. पुढें चालतांना मधून मधून तो मागें वळून पहातो.

(छ) **शरभ**–सिंहाच्या आकाराचा, गरुडाच्या तोंडाचा व आठ पायांचा एक काल्पनिक प्राणी. हा सिंहाला सुद्धां उचलून नेण्याइतका पराक्रमी

असतो. 'निःशंक कुरु बळीं नर जेविं हरिशतावृतींहि शरभ वनीं' (मोरोपंत).

( ज ) **हत्ती**–ह्याच्या गंडस्थळांत मोत्यें असतात. आठ दिशांना आठ संरक्षक हत्ती आहेत. लक्ष्मीचें मोठें गमक 'गजान्त' लक्ष्मी हें आहे.

( झ ) **कामधेनु**–इच्छिलेली वस्तु पुरविणारी गाय.

**तुझ्या गुणकथा महासुरभि ।**' ( मोरोपंत ).

( ४ ) **पक्षी.**

( च ) **चातक.** हा पक्षी मेघाच्या पाण्याशिवाय कसलेंहि पाणी पीत नाहीं, व म्हणून मेघाचा अनन्य भक्त आहे. 'घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें' ( मोरोपंत ).

( छ ) **चकोर.** हा चंद्राचा अनन्य भक्त आहे. तो कमळाच्या पानांवर चंद्राचे किरण खातो.

**'कुमुदलाचेनि ताटें ।**
**जो जेविला चंद्रकिरणें चोखटें'** ( ज्ञानेश्वर )

( ज ) **मोर.** हा मेघाचा अनन्य भक्त असून त्याला पाहून नाचूं लागतो. शरदृतूंत याचा पिसारा गळतो. 'ज्यांचा समस्त गळला शरदीं पिसारा' ( वनविहार ). याच्या अश्रुसेवनानें लांडोर गर्भिणी होते. याचा स्वर हा संगीतांतला पहिला स्वर 'षड्ज' मानला आहे 'षड्जं रौति मयूरः'

( झ ) **चक्रवाक.** या पक्ष्याचा रात्रीं मादीशीं वियोग होतो व सूर्योदयानंतर त्यांचा पुन्हां संयोग होतो. तोंपर्यंत तीं नदीचे दोनी तीरांवर दोघें दोहिकडे ओरडत असतात.

**'भेदनदीच्या दोहीं थडी । आरडातें विरहवेडीं ।**
**बुद्धि बोधीं ॥**
**ते याचकाचें मिथुन । समरस्याचें समाधान ।**
**भोगवि जो चिद्घन । भवनदिवा ॥'** ( ज्ञानेश्वर )

( ज ) **हंस.** ब्रह्मदेवाचें वाहन, मानस सरोवरांत राहणारा, कमळांतील बिसतन्तु व मोत्यें खाऊन राहणारा आहे. 'करितो बिसतन्तु भक्षुनि

फराळ ' ( मोरोपंत ). यांचा रंग पांढरा, चोंच तांबडी व पाय पिवळे असतात, अशी कल्पना आहे. एकत्र मिसळलेलें दूध व पाणी हा वेगळें करूं शकतो.

**'नातरि चांचूचेनि सांडसें ।**
**खांडिजे पयपाणी राजहंसें ॥'** ( ज्ञानेश्वर ).

( ट ) **कोकिळ.** हा आपलें अंडें कावळ्यांच्या अंड्यांत उबवावयास टाकून देतो म्हणून याला ' परभृत ' म्हणतात. याचा स्वर संगीतांत पंचम म्हणून घेतला आहे. आंब्यावर या पक्ष्याची विशेष रहदारी आहे. 'आम्रा त्या पिक सेवितां समसमा संयोग कीं जाहला,' ( चिपळूणकर ).

( ठ ) **कावळा.** हा पक्षी सर्वभक्षक व " व्रणार्त पशुच्या शिरावर " बसायला टपलेला असतो. याला हजार वर्षे आयुष्य असतें व एकच बुबुळ असतें. तें दोहींकडे फिरवून तो पाहूं शकतो.

**"वायसा एकें बुबुळें दोहिंकडे ।**
**डोला चालितां अपाडें।**
**दोन्हि आथि ऐसा पडे ।**
**भ्रमु जोवीं गा ॥ "** ( ज्ञानेश्वर )

हा अशुभ पक्षी आहे.

( ड ) **कवडा** ( होला ), **कलाली** व **पिंगळा,** व **घुबड** हे अशुभसूचक पक्षी आहेत. ' शिरला हा राजमंदिरीं कवडा ' ( मोरोपंत ). ' ओखटे होला काव कलाली ' ( दासबोध ).

( ५ ) **पदार्थ.**

( च ) **अमृत.** पांढऱ्या रंगाचें समुद्रांतून निघालेलें द्रव्य; हें स्वर्गांत असून देहाला अमर करतें. तें चंद्रांत असून त्याच्या किरणांतून वनस्पतींना मिळतें.

**'नातरी मृतही जीवित लाहे ।**
**अमृतासिद्धि** ' ( ज्ञानेश्वर )

( छ ) **पारा व पाऱ्यापासून बनविलेलें रसायन** } पारा हा शंकरांचें वीर्य आहे. तो सिद्ध केला म्हणजे मृत्यु व दारिद्र्य यांना जिंकणारा आहे.

'सिद्धे रसे करिष्यामि निर्दारिद्र्यमिदं जगत्'.
पाऱ्यापासून सोनें व रुपें करितां येतात
अशी कल्पना आहे. '

( ज ) **चिंतामणि.** इच्छिलेली वस्तु प्राप्त करून देणारा एक दगड. 'कां चिंतामणि जालेयां हातीं, सदा विजयेपण मनोरथीं ' (ज्ञानेश्वर).

( झ ) **कल्पतरु.** इच्छिलेली वस्तु प्राप्त करून देणारीं झाडें. हीं स्वर्गांत असून १ मंदार, २ पारिजात, ३ संतान, ४ कल्पवृक्ष व ५ हरिचंदन असे यांचे पांच प्रकार आहेत.

**"नातरि कल्पतरु तलवटी। बैसोनि झोलिये देत गांठी।**
**मग निदैव निघे किरीटी। दैन्याचि करूं॥ १ ॥** ( ज्ञानेश्वर ).

( ञ ) **परिस.** आपल्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें करणारा एक दगड.

**कां परिसु जालेयां हातीं। लोहालागीं सर्व संपत्ती ॥**' (ज्ञानेश्वर).

( ट ) **मोत्यें.** स्वाती नक्षत्रांत पावसाचें पाणी समुद्रांतील शिंपल्यांत पडून मोत्यें होतात.

**स्वातिचेनि पाणियें। न्हवंति जरि मोतियें।**
**तरि आंगीं सौंदर्याचियें। कां शोभतीं ' ॥** ( ज्ञानेश्वर )

६ **शृंगारसंबंधी भाव.**

( च ) शृंगाराच्या अधिष्ठात्री देवता **मदन** व **रति** हें दंपत्य होय. तीं दोघेंही पुरुषांच्या अगर स्त्रियांच्या सौंदर्याचीं परमावधीचीं गमकें मानलेलीं आहेत. मदनाला शंकरानीं जाळला असल्यानें तो ' अनंग ' आहे, व मनांत त्याची उत्पत्ति असल्यानें ' मनसिज ' आहे. पुष्पसमुदाय—विशेषतः अशोक, निळें कमळ, आंब्याचा मोहोर, मदनबाण ( मोगऱ्याची जात ), व पांढरें कमळ हीं त्याचें ' धनुष्य ' ( किंवा कित्येकांच्या मतें 'बाण' ) असून भुंग्याची ओळ ही त्या धनुष्याची दोरी आहे. स्त्रियांचे नेत्र-कटाक्ष हे त्याचे बाण व चंद्र हा त्याचा मित्र आहे, अशा कल्पना आहेत.

" अशोक—नीलोत्पल—चूतमल्लिका—सरोरुहांचे स्फुट रेणु वाहती । वनीं
व्यथा कामिजनां करावया स्मरायुधें तीं जणुं सज्ज राहती ॥ १ ॥

( वनविहार ६—१५ ).

( छ ) स्त्रियांच्या हावभावांनीं कांहीं वृक्ष प्रफुल्ल होतात. ते येणेंप्रमाणेंः—

**लाथेनें त्या अशोका, तिलक-कुरबकां वीक्षणालिंगनांनीं ।**
**स्त्री-स्पर्शानें प्रियंगु-व्रततिस, बकुला वारुणीच्या चुळांनीं ॥**
**मंदारा नर्मवाक्यें, मृदुहसन-गुणें चंपका, फुंकरानें ।**
**आम्रा, नृत्यें कण्हेरीप्रति, विकसन ये त्या नमेरूस गानें ॥ १ ॥**

**४१९** संकेतांत जो भाव असेल त्याचा दाखल्याप्रमाणें उपयोग करून साहित्याला शोभा आणतां येते. उदाहरणार्थ, 'पैसा मिळविण्याचा राजमार्ग उद्योग हा होय' हें तत्त्व ठसवावयाचें झाल्यास 'उद्योग हा खरा परिस आहे' असें रूपक करितां येईल. त्याचप्रमाणें 'सत्पुरुष-कथा अद्भुत-रसदा म्हणतों हिलाच सुरभी मी' ( मोरोपंत ) इ०.

## अभ्यासपाठ १ ला.

'चकोर, चातक व चक्रवाक यांसंबंधीं कविसंकेत व माहिती सांगा' ( मुंबई विश्व० एफ. ए. परीक्षा, १८६३ ). कलम ४१९–४ पक्षी ( च ), ( छ ) व ( झ ) पहा.

## अभ्यासपाठ २ रा.

'घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें' यांतील संदर्भ लिहा. ( मुंबई विश्व० यू. एस. एफ. परीक्षा, १८९२ ). कलम ४१९–४ पक्षी ( च ) पहा.

## अभ्यासपाठ ३ रा.

**"तो नवगुणरत्नाकरु । ययां नवां रत्नांचा हारु ।**
**न फेडित ले दिनकरु । प्रकाशु जैसा ॥ १ ॥"**

या ओवींत कोणत्या संकेताचा उपयोग केला आहे? एका व्यक्तीच्या अंगीं नऊ गुण आहेत असें सांगून त्याच्यावर रत्नांचें रूपक केलें आहे, यावरून या ओवींत 'नऊ रत्नांच्या' संकेताचा उपयोग केला आहे. ( कलम ४१९, ५४ ).

## अभ्यासपाठ ४ था.

"तीन दुर्जन एके ठिकाणीं जमले आहेत अशी कल्पना करून संकेताचा दाखला देऊन त्यांचा निर्देश करा." दुष्ट-गुण-दर्शक तीन पदार्थांचा संकेत त्रिदोषांचा आहे त्याचा उपयोग करून असें म्हणतां येईल. 'हें दोषांचें त्रिकूट जमलें. आतां आपली मात्रा चालायचें कठिण दिसतें.' ( शारदा २–५ ).

## अभ्यासपाठ ५ वा.

" यज्ञदत्ताचें घर आजकाल स्वर्ग आहे, " या वाक्यावरून कोणतें सांकेतिक अनुमान काढितां येईल ? यज्ञदत्ताच्या घरांत धनधान्यसंतती वगैरेंची समृद्धि असून, कसलीही आधिव्याधी नाहीं. व तेथें सर्व प्रकारचे उपभोग आहेत. (कलम ४१९-९२ पहा ).

## अभ्यासपाठ ६ वा.

" रानड्याला छडीनें मारण्यासाठीं शिक्षकानें ती आणण्याचें काम त्यासच सांगितलें. अशा स्थितींत तो मुलगा ती आणतो, हा मजकूर कोणत्या न्यायाचा उपयोग करून व कसा सांगतां येईल ? " त्यांतील भावावरून हा मजकूर ' उष्ट्रलगुडन्यायानें ' व 'रानड्यानें उष्ट्रलगुडन्यायानें शिक्षकांचे हातीं छडी आणून दिली ' असा सांगतां येईल ( कलम ४१८-६ ).

## अभ्यासपाठ ७ वा.

" पुढील न्यायांचा उपयोग करून वाक्यें बनवाः--( १ ) अंधचटकन्याय ( २ ) चंद्रचकोरन्याय व ( ३ ) सिंहावलोकनन्याय. "

## अभ्यासपाठ ८ वा.

" प्रत्येक मनुष्याला तापांनीं व एषणांनीं व्यापलें आहे, या वाक्यांतील ' तापांनीं ' व ' एषणांनीं ' या शब्दांचा खुलासा करा. " १ ताप म्हणजे दुःखें. हीं " आध्यामिक, आधिभौतिक व आधिदैविक " अशीं तीन प्रकारचीं आहेत. २ एषणा म्हणजे इच्छा. या लोकैषणा, पुत्रैषणा व वित्तैषणा अशा तीन सांगितल्या आहेत. ( कलम ४१८-४५, ४१ पहा ).

---

# पाठ छत्तिसावा.

## भाषाशैली.

४२० साहित्य शब्दांनीं प्रकट होतें हें खरें, पण एकच विचार एक साहित्यलेखक ज्या शब्दांनीं मांडतो त्याहून दुसऱ्या साहित्यलेखकाचे त्याच विचाराविषयींचे शब्द कांहीं तरी वेगळे पडतातच. एकाच पंचतत्वांपासून बनलेल्या दोन मनुष्यांच्या आकृतींत ज्याप्रमाणें कांहीं तरी वेगळेपणा असतोच त्याप्रमाणें दोन साहित्यलेखकांच्या शब्दरचनेंत कांहीं तरी फरक असतोच. अशा प्रकारची साहित्यांतील शब्दरचनेची जी स्वयंविशिष्ट पद्धत तिला भाषाशैली असें म्हणतात. लेखकाच्या मनःप्रवृत्तीला अनुसरून त्याचे विचार व विचारांना अनुसरून उच्चार किंवा लेखन होतें. अर्थात् भाषाशैली ही साहित्याचें वैयक्तिक वळण किंवा बांधा होय.

४२१ अशा रीतीनें भाषाशैलीचे पुष्कळच प्रकार झाले आहेत. इंग्रेजी वाङ्मयांत ॲडिसन्‌ची भाषाशैली सोपी व चटकदार आहे, तर मेकॉलेची भाषा अलंकारिक, प्रौढ व ऐटदार आहे. गिबनची भाषा सरळ, व्यंजक व रसाळ आहे तर ह्यूमची भाषा भव्य व मनोवेधक आहे. ड्रायडन, पोप, यांची भाषाशैली जुन्या वळणाची, सालंकृत व खोचदार आहे, तर टेनिसन, शेले वगैरे मंडळी साध्या शब्दांत नवीन कल्पना आणण्याच्या व्यंजनाचातुर्याबद्दल प्रसिद्ध आहे. संस्कृत साहित्यांतही हाच प्रकार दिसून येतो. व्यास–वाल्मीकींची साधी अनलंकृत भाषा एका बाजूस, तर कालिदास–भवभूतींची ऐटदार व सालंकृत भाषा दुसऱ्या बाजूस तितकीच आल्हाद देते. बाणाची समासप्रचुर पण मनोहर रचना जयदेवाच्या सुबोध व रसाळ रचनेइतकी रम्य आहे.

४२२ मराठींतही भाषाशैलीचे पुष्कळ नमुने दृष्टीस पडतात. ज्ञानेश्वरांची जुनी पण सहजसुंदर दिव्य रचना आदर्शवत् होऊन राहिली आहे. तुकोबांची निर्भीड भाषा प्रसंगीं ‘ किती सांगूं तरी नायकती बटकीचे ’ म्हणून म्हणणार, तर प्रसंगीं ‘ सकळांच्या पायां माझें दंडवत ’ म्हणून आळविणार. समर्थांची धोपट वाणी

मात्रादिकांचे निर्बंध पार झुगारून ' धींधरा धींधरा तकृवा हडूथडूं गडूथडूं नका ' म्हणून आश्वासन देते, तर मुक्तेश्वर–वामनादि मंडळी सृष्टिवर्णनांचे व प्रसंगाचे मनोवेधक देखावे आपल्या रसभरित शैलीनें निर्माण करून, वाचकांना त्यांत गुंगविते. पंतांची संस्कृत-प्रचुर धांवरी शब्दरचना शाहीर मंडळींच्या सोप्या पण मर्दानी कवनाशीं विसंगतपणांत देखील तितकीच उठावदार दिसते. विनायक कोंडदेव ओक व लोकहितवादी या दोघांचेंही लिखाण सोपें व सरळ, पण एकाचा साधेपणा ' ड ' ला ' द ' त्व, व ' ट ' ला ' त ' त्व देऊन ' इंग्लंद देशांतलि लंदन राजधानींतल्या विक्तोरिया राणीचे ' गुणानुवाद गातो, तर दुसऱ्याचा साधेपणा शिवराळ शब्दांत उमटतो. त्याचप्रमाणें थोरल्या चिपळूणकरांचें सरळ व मनोवेधक लिखाण, धाकट्या चिपळूणकरांचें संस्कृतप्रचुर उपरोधिक पण ऐटबाज शब्दग्रथन; आगरकरांचें प्रौढ, कळकळीचें पण सीधें लेखन, टिळकांचें मुद्देसूद व खोंचदार लिहिणें; श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें बोजड असूनही विनोदानें हृदयंगम झालेलें लेखनकौशल्य; देवलांचें साधें व वेल्हाळ लिखाण; गडकऱ्यांचें मधुर पण कृत्रिम रचनाचातुर्य; रेव्हरेंड टिळकांचें सप्रसाद, गोड पण संस्कृतिभेदामुळें नेहमीं परकें वाटणारें लिखाण; परांजप्यांचें आवेशयुक्त आणि उठावदार प्रबंधन; आणि नरसोपंत केळकरांचें अष्टपैलु भाषाप्रभुत्व इत्यादि सारे भाषाशैलीचे वेगवेगळे नमुने होत.

**४१३** कित्येकांच्या भाषेंत कांहीं विशिष्ट शब्द, किंवा वाक्प्रचार किंवा कल्पना विशिष्ट प्रसंगीं हटकून येत असतात. कित्येकांचे विचार सोप्या व सहज वाक्यरचनेंत प्रकट होतात, तर कित्येकांच्या भाषेला आपोआप बोजडपणा प्राप्त होतो. बालपणाचें वर्णन कोल्हटकर व देवल या दोघांनींही प्रसंगविशेषानें केलें आहे. पण कोल्हटकरांच्या मनोहर कल्पना ' होय संसार-तरु-मुग्ध-कोरक भुवनिं ' इत्यादि दुर्बोध भाषेंत उतरल्या आहेत, तर देवलांच्या साध्या कल्पना ' बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडिघडी ' इत्यादि सहजमनोहर भाषेंत उमटल्या आहेत. सारांश, भाषाशैली ही प्रायः वैयक्तिक असते व तिचें अनुकरण करितां येत नाहीं. केल्यास तें कृत्रिम होतें.

**४१४** यालाही क्वचित् अपवादात्मक उदाहरणें सांपडतील. संस्कृत साहित्यांतील बाणभट्टाची प्रसिद्ध ' कादंबरी ' त्याच्या मुलानें पुरती करितांना त्याच्या भाषेचें इतकें हुबेहूब अनुकरण केलें आहे कीं, अमुकच ठिकाणापासून आपण

लिहिण्यास सुरवात केली, हें जर स्वतः त्यानेंच सांगितलें नसतें तर आज कदाचित् तें उमगलेंही नसतें. पुराणादिकांतून व अलीकडच्या मराठी काव्यांतून जे शेंकडों अपपाठ व क्षेपक शिरले आहेत ते तरी मुळाची नक्कल चांगली साधल्याचींच उदाहरणें होत. पण एकंदरींत भाषाशैलीचें अनुकरण ही दुर्घट गोष्ट होय यांत शंका नाहीं.

**४२५** तथापि आपल्या चेहेऱ्याचें निसर्गसिद्ध वळण खुलवून दाखविण्यासाठीं मनुष्य ज्याप्रमाणें पेहेराव, केश-प्रसाधना, उपकरणें इत्यादि कृत्रिम साधनांचा उपयोग करितो, त्याप्रमाणें साहित्यलेखकही आपल्या लिखाणाची छाप पाडण्यासाठीं कांहीं साधनांचा उपयोग करितात. अशा साधनांना 'उपालंकार' म्हणावें. भाषाशैलीचें अनुकरण करणें जरी दुर्घट असलें, तरी या साधनांचें अनुकरण प्रसंगविशेषीं करितां येतें व तें बहुतेक कुशल साहित्यलेखकांनीं केलेलें आढळतें. व्यवहारांत ज्याप्रमाणें मनुष्याच्या स्वाभाविक चेहेऱ्यापेक्षां पोषाखादि उपकरणेंच सद्यः परिणामकारी होतात त्याचप्रमाणें साहित्यांतही नैसर्गिक भाषाशैलीपेक्षांही कृत्रिम साधनें अधिक प्रभावी होतात. अशा प्रकारचीं कांहीं विशेष प्रचारांतील साधनें पुढें दिलीं आहेत.

( क ) **पलट**; म्हणजे सफाईनें एखाद्या मोठ्या गोष्टीला गौणत्व व लहान गोष्टीला महत्त्व देणें. जसें:—

**१ मोक्षाचें तों आम्हां नाहीं अवघड। तो असे उघड गांठोळीसी॥**
**भक्तीचे सोहळे होतील जीवासी। नवल तेविशीं पुरवितां॥**
( तुकाराम ).

**( २ ) शेताच्या अपुल्या उभा दिसतसे बांधावरी तो कुणी। *****
**बांधोनी कमरेस खड्ग बसला सिंहासनाधीश्वर॥ * * ***
**त्या तख्तावर बाहुली—नमितसे मालीक शेतांतला।**
**ह्या शेतांतिल भूपतीस मुजरा राखून मी ठेविला॥ १॥**
( यशवंत ).

**( ३ ) तुझ्या समचि हें गुणें अणु उणें नसे नाम, हा।**
**दिसे अधिकही, तसा गुण तुला असेना महा॥** ( केकावलि )

( ख ) **गुपित**; किंवा **कूट भाषा बोलून चटका लावणें.**

( १ ) लटकें म्हणतां खटकें झालें, सुगडायेवढे राळे।
आली उडत चिमणी तीचे वाटीयेवढे डोळे ॥ ( नामदेव ).

( २ ) दोघां ऐसीं तीन चालती । अगुणी अष्टधा प्रकृति ।
अधोर्ध्व सांडूनि वर्तति । इंद्रफणी ऐसीं ॥ १ ॥
( दासबोध ).

( ३ ) आद्याच्या पर्यंतापासुनि । अंताच्या आरंभामधुनि ।
एक अनंतें माप घेउनी । कैक अनंतें जाणें भरभर ॥ १ ॥
( वाग्वैजयन्ती ).

( ४ ) मसुरे येवढें बिंदुलें । त्यांत त्रिभुवन सांठवीलें ॥ (तुकाराम).

( ग ) **बिंगफोड** उर्फ **दुसऱ्याचें व्यंग पर्यायानें किंवा उघड विनोद करून दाखविणें.**

( १ ) हल्लींच्या दुर्धर देशस्थितींत शेंकडों महत्त्वाच्या विषयांवर अवश्य विचार कर्तव्य असतां इकडील पत्रकार काचोळीवर, चंद्रकळेवर, वगैरे टीका करून दाखवूं लागले; व नवराबायकोंचे प्रीतिकलह, पोषाकाच्या पेहेरावाच्या तऱ्हा इत्यादि विषयांवर विवेचन करूं लागले; तर तें किती शोभेल बरें ! ( निबंधमाला ).

( २ ) तरि अहिंसा बहुवेपरीं । बोलिली असे अवधारीं ।
आपुलाला मतांतरिं । निरोपितां ॥ १ ॥

परि ते ऐसी देखां । जैसिया खांडूनिया शाखा ।
मग तयाचि बुडुखा । कूंपु कीजे ॥ २ ॥ ( ज्ञानेश्वर ).

( ३ ) कांहीं अवयवांच्या फाजील वाढीमुळें आणि कांहींच्या फाजील कमीपणामुळें थबकट बनलेल्या चेहेऱ्याच्या तबकडीवरून हें जपानी कलाकौशल्य असावेंसें वाटतें. ( प्रेमसंन्यास ).

( ४ ) त्यांचीं कांहीं पेणसलीनें लिहिलेलीं टिपणें आहेत; परंतु त्यांतील लिपि म्हणजे मुंग्यांच्या पायांच्याच पंक्ति ! ( ल. कृ. चिपळूणकर ).

( घ ) **ताळेतोल** किंवा **विरोधि तुलनांनीं वैगुण्य किंवा श्रेष्ठपणा दाखविणें.**

( १ ) वैरियासी करी पाहुणेरू बरा।
काढितो ठोंबरा संतांलागी ॥ १ ॥
गाईसी देखोनी बदाबदा मारी।
घोड्याची चाकरी गोड लागे ॥ २ ॥ ( तुकाराम )

( २ ) मऊ मेणाहुनि आम्ही विष्णुदास।
कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
देऊं त्यास देऊं अंगींची लंगोटी।
नाठाळाचे काठी घालूं माथा ॥ २ ॥ ( कित्ता ).

( ३ ) मनुष्याचा स्वभाव असा आहे कीं, वस्तु जोंपर्यंत प्राप्त आहे तोंपर्यंत तिची तो अवगणना करितो आणि ती नष्ट झाली म्हणजे मग दीर्घ विलाप मांडतो. ( मोडक ).

( ४ ) घनपाठी दशग्रंथी वैदिक ' रघुनाथभट्ट ' परांजपे व धर्मशिक्षणाविरुद्ध कसून लिहिणारे 'रँगलर' परांजपे यांच्यांतील भेद खरोखर जमीनअस्मानाचाच नव्हे काय ! ( न. चिं. केळकर ).

( ५ ) परदेशच्या पेढीवर दर्शनी हुंड्या पटतात आणि शेजारच्या दुकानदाराला रुपयाची मोड मिळत नाहीं ! इकडे पाठीवर पाय देऊन आलेला भाऊ पोटावर पाय द्यायला सोडीत नाहीं तर तिकडे शब्दांच्या शपथेखातर ज्यांची पुरतीशी तोंड ओळख सुद्धां नाहीं अशीं वधूवरें तोंडाशीं तोंड द्यायला तयार होतात ! ( प्रेमसंन्यास ).

( ङ ) **बेपर्वाई;** म्हणजे **दुसऱ्याच्या मताविषयीं बेपर्वाई दाखविणें.**

( १ ) कोणी निंदा कोणी वंदा। आम्हां स्वहिताचा धंदा ॥
काय तुम्हांसी गरज। आम्ही भजूं पंढरिराज ॥
( तुकाराम ).

( २ ) म्हणा हवा तर खुळा मला। मुळीं न त्याची क्षिति मला।
( गद्गकर ).

( ३ ) टाकुनिया चिद्राजीव। प्रळयामाजी द्या जीव।
अचेतनाच्या गुंगींत। ऐका प्रळयाचें गीत ॥
मृत विश्वाचें तेरावें। कडवें चाले तेरावें ॥

कोणी वंदा, कोणी निंदा प्रेमप्रळया प्रेमरसें।
गोविंदाग्रज गात बसे ॥ १ ॥ ( वाग्वैजयन्ती )

( च ) अनुषंगप्रहार; म्हणजे प्रस्तुतावरोबरें अप्रस्तुताची हजेरी घेणें.

( १ ) आतां शरण कोणा जावें । सत्य कोणातें मानावें ॥
नाना पंथ नाना मतें । भूमंडळीं असंख्यातें ॥
एक मानिती सगुण । एक म्हणति निर्गुण ॥
एकीं केला सर्वत्याग । एक म्हणती राजयोग ॥
रामदास सांगे खूण । भक्तीवीण सर्व शीण ॥ १ ॥
( रामदास )

( २ ) आतां सरते शेवटीं वरील दोघांहूनही जाडी प्रकरण जे वरील महाविख्यात स्वामी त्यांच्याविषयीं कांहीं लिहून हा अंक व हा भाग आटोपतों. यांस वरील दोघां बाबूंच्याहूनही वरच्या पदवीस चढविण्याचें कारण उघडच आहे कीं, ते त्यांच्यासारखे केवळ प्रषित होऊं पहात नाहात; तर बुद्ध, ख्रिस्त, महंमद, राममोहनराय यांच्याप्रमाणें नव्या पंथाचा प्रवर्तकच होण्याची त्यांनीं इच्छा धरली आहे. ( निबंधमाला )

( ३ ) नेणों कोणाचें हें स्थळ । परि कैसें अभिलाखाचें बल ।
जे घरोघरी कपाल । पीटवीतसे ॥ १ ॥

नास्तिकां देयावेया तोंड । वेदांचें गाढें बंड ।
तें देखौनि पाखंड । आनचि वाजे ॥ २ ॥ ( ज्ञानेश्वर )

( छ ) परुषप्रहार किंवा दुसऱ्याचें व्यंग कडक, रुक्ष, भडक शब्दांनीं दाखविणें.

( १ ) आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटां झाली धनी ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरी बोडी डोयी दाढी ॥ १ ॥
( रामदास )

( २ ) कीर्तनाच्या विकरा मातेसीं गमन । ( तुकाराम ).

( ३ ) नीतीसाठीं वपन मांडिती । प्रेताहातीं नवरी देती ।
अनाथ विधवा पदीं चिरडिती ।
सैतानावरि ताण असा करि सृष्टीचा सुलतान ॥ १ ॥
( वाग्वैजयन्ती )

( ४ ) हिंदुधर्माच्या नांवाखालीं मोडणारे जे अनेक लज्जास्पद आचार या देशांत रूढ आहेत त्यांत शिमग्याला पहिला नंबर दिला पाहिजे.... होळीच्या राखेंत माती, शेण व त्याहूनही घाण अशीं द्रव्यें मिसळून तयार केलेल्या खातेऱ्याच्या पंचामृतानें आपापलीं अंगें नखशिखांत माखून घेऊन टेंपरवारी वराह स्वरूप कित्येक मोठ्या हौसेनें धारण करितात. ( आगरकर )

( ज ) काळीज-फोडी किंवा मृदु व गोड शब्दांनीं काळजाचा ठाव घेऊं पाहणें.

( १ ) बा रे पांडुरंगा कधीं भेटी देसी ।
झालों परदेशी उतावीळ ॥
तुजवीण सखा मज नाहीं कोणी ।
केव्हां चक्रपाणी भेट देसी ॥ ( तुकाराम )

( २ ) प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ति ।
आणि मी दुबला अर्चितसे भक्ती ।
म्हणौनि बोलु जऱ्ही गंगावती । तऱ्हीं स्वीकराल ॥ १ ॥
बाल बापाचां ताटीं रिगे । आणि बापातेंचि जेवऊं लागे ।
किं तो संतोषाचोनि वेगें । मुखचि वोडवी ॥ २ ॥ ( ज्ञानेश्वर )

( ३ ) बुझावूं मी किती तूतें ? करावी मी किती हांजी ।
कितादा मंत्र उच्चारूं ? तुझा मी, तूंहि हो माझी ॥

( झ ) चिरेफाडी; किंवा उपहास करून रेवडी उडविणें.

( १ ) दंड कमंडलु बंड माजविसि, मुंड मुंडसी तपा ।
न सार्थक, लटक्या साऱ्या गपा ॥
दर्भ मुष्टिच्या गर्भि धरुनियां निर्भर पशुच्या वपा ।
जाळिशि तिळा तांदुळा तुपा ॥ ( रामजोशी )

( २ ) अभद्र शिव्याश्रापांनीं त्याची छाटाछाट करण्याचा प्रयत्न एका बाजूनें करून हे शाहणे दुसऱ्या बाजूनें कर व नोकरी यांच्या रूपानें त्याची सेवा मूढपणें करीतच असतात; आणि अचंबा करतात कीं विषवृक्ष अद्याप वठला कसा नाहीं. ( वि. का. राजवाडे )

( ३ ) **ऐसे संत झाले कली । तोंडी तंबाकूची नळी ॥**
**स्नानसंध्या बुडाविली । पुढें भांग ओढवली ॥** ( नामदेव )

( ४ ) कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहींत.

( न. चिं. केळकर ).

पण आमच्या शूद्र धर्म स्थापकांची तर कशी मौज आहे ! त्यांस पुरतें व्याकरणाचें व शुद्ध लिहिण्याचेंही ज्ञान नाहीं ... अशा स्थितींत आम्ही आपल्या शूद्र बंधूंस अशी विनंति करितों कीं, श्रुतिस्मृतींचा उहापोह करण्याची हौस तूर्त त्यांनीं एकीकडे ठेवावी, अगोदर लेखनशुद्धीच्या सूत्रांची संथा घ्यावी... आणि यांतून पार पडून कर्ता–कर्म– क्रियापदाची थोडी-बहुत ओळख पटली म्हणजे मग गीर्वाण भाषेविषयीं व मनुवसिष्ठादि-कांविषयीं सावकाश विचार करितां येईल ? ( निबंधमाला )

( ञ ) **पाठमारी**; किंवा **प्रथम पुष्कळ स्तुति करून मग एखादें मोठें वैगुण्य दाखविणें.**

( १ ) देशहितार्थ उलाढाल करण्याविषयीं हव्यास, ग्रंथरचना, सभापांडित्य, वगैरेविषयीं हौस, हीं सर्व नव्या दमाच्या तरुण बांडांतही आढळणार नाहींत अशीं आज घटकेला या वयातीत पुरु-षाचे ठायीं तरतरीत आहेत. आतां हें खरें आहे कीं, वरील आस्था-पूर्वक उद्योगाशीं व उत्साहाशीं इतर अनेक गुणांचें साहचर्य जसें असायाला पाहिजे तसें प्रस्तुत व्यक्तीचे ठायीं आढळत नाहीं, इ०

( निबंधमा. )

( २ ) अंहं ! तेवढें मात्र विचारूं नकोस ! श्रीमंत आहे, हौशी आहे, मायाळू आहे, तें सगळें हवें तसें आहे. पण वयाची गोष्ट तेवढी काढूं नकोस.

( शारदा )

( ३ ) तेव्हां आमचे अंगीं मूळचें तेजहि आहे व पात्रताहि आहे; नाहीं काय तर फक्त जागृति. ( चांदोरकर )

( ४ ) आगा गोरें आणि तरुणें । वरि लेइलें असे भूषणें ।
परि एकलेनि प्राणें । सांडिलें जोंवि ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

( ट ) जवळ जोडी; किंवा शब्दांतील ध्वनि, रूप, किंवा अर्थ यांच्या सादृश्याचा उपयोग करणें.

( १ ) श्री म्हण, न स्त्री म्हण, हें त्वद्वचन मनासि कंप देतें गा ॥
( मोरोपंत )

( २ ) असा सदाचार पथाहुनी तदा अली मदाचार-विशेष सूचवी॥
( वनविहार )

( ३ ) ग्रंथकारावरून ग्रंथाची परीक्षा करीत नाहींत,
तर ग्रंथावरून ग्रंथकाराची करितात. ( निबंधमाला )

( ठ ) ठासबोली; ऊर्फ जोरकस व ठाम शब्दयोजना करून आपल्या विधानाला सिद्धांताचा डौल आणणें.

१ ) पुस्तकी ज्ञान म्हणजे खरें ज्ञान नव्हे व व्यवहारचातुर्य तर नव्हेच ( न. चिं. केळकर ).

( २ ) नारायणीं जेणें घडे अंतराय।
हो कां बापमाय त्याजावी ते ॥ १ ॥ ( तुकाराम )

( ३ ) जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच ।
जें दे पतीस सुख फार कलत्र तेंच ॥ ( वामन )

( ४ ) समर्थाचिया सेवका वक्र पाहे
असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥ ( रामदास )

( ५ ) तोचि ब्राह्मण, जेथें क्षांति, दया, दान, सत्य, तप, शील ॥
( मोरोपंत )

( ६ ) तर प्रस्तुत कवच्या काव्याच्या अनेकार्थत्वाविषयीं आज सुमारें शंभर वर्षें लोकांत जी बोलवा आहे ती वरील कलमांतील दोन सिद्धांतांप्रमाणें निवळ बाजारगप्प आहे. ( निबंधमाला )

( ७ ) परंतु हिंदु धर्माचीं तत्वें अधिक व्यवहारोपयोगी आहेत, केवळ चिंतनोपयोगी नाहींत असें पुढें तुमच्या लक्ष्यांत येईल. ( म. शि. गोळे )

( ८ ) पण तिचें ( भक्तीचें ) तुमच्यानें सत्वहरण होणार नाहीं, व सरते शेवटीं आपल्या प्रभावानें

**' मन सुधारकीं रंगलें। अवघे जन सुधारक झाले ॥ '**

असें करून टाकल्याशिवाय ती राहणार नाहीं ! ( आगरकर )

**( ड ) शालीनता; ऊर्फ लीनबोली; म्हणजे अत्यंत आदरानें व मर्यादेनें बोलणें.**

**( १ ) तो अहोरात्राचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु ।**
**प्रकास्योंविण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १ ॥**
**तेया चित्सूर्या श्रीनिवृत्ति । आतां नमोचि म्हणे पुढुती ।**
**जो बाधकां येइजताहे स्तुती । बोलाचिया ॥ २ ॥**

( ज्ञानेश्वर )

( २ ) टिळकआगरकरांचे मतभेद म्हणजे आकाशांतलि नक्षत्रांच्या शर्यती!

( एक० व्या० )

**( ३ ) ज्ञानियांचा राजा गुरु महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ।**
**मज पामराशी काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ॥**

( तुकाराम )

( ४ ) शिवाय हेंही सांगणें येथें अप्रस्तुत होणार नाहीं कीं, ज्या महापंडिताचा पितृनामानें निर्देश करण्याचा अधिकार आम्हांकडे आला आहे त्या...परम पूज्य श्रीमत्पितृपदीं प्रणाम करून पूर्वोक्त अवतरणाविषयीं आमचे विचार वाचकांस सादर करितों. ( निबंधमाला )

**( ढ ) लपंबोली; किंवा गुळमुळीत व मुग्ध शब्दयोजना करणें.**

**( १ ) या अभिप्रायास कितीकां रसज्ञांची मंजुरी पडेल ती पडो !**

( निबंधमाला )

**( २ ) जगाचा जो ऐसा धनि कवण तो पाव मज गा ! ॥**

( वामन )

( ३ ) **तैसा मी अनुगृहीतु । साधूंचा निरोपितु ।**
**ते आपुला अलंकरितु । भलेतैसा ॥ १ ॥**
**आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणीवांसि ठाके उभें ।**
**तें पूर्ण नोहे तैं लाभे । तुम्हां कोपों ॥ २ ॥** ( ज्ञानेश्वर )

( ४ ) आगगाडीनें माणसें लवकर मुंबईस जातात, तर रोगही मुंबईहून काशीस तिसऱ्या दिवशीं जातो. त्याचा आधीं बंदोबस्त करा आणि मग गांवांतल्या गांवांत रोगी बाहेर काढावयाचा की नाहीं याचा विचार करा; आणि तोंही लोकस्थितीकडे लक्ष्य देऊन करा एवढेंच आमचें काय तें म्हणणें आहे. ( टिळकांचे निबंध )

( ण ) **झगडबोली;** किंवा **सलगीची भाषा बोलून किंवा त्रागा करून आपला भाव दाखविणें.**

( १ ) **गळा बांधोनीयां दोर । धरिला पंढरीचा चोर ॥** ( तुकाराम )
( २ ) **अरे विठ्या अरे विठ्या । मूळ मायेच्या कारट्या ॥**
**विठ्या तुझें गेलें मढें । तुला देखुनि काळ रडे ॥** (जनाबाई)
( ३ ) **राधा–प्राप्त्यर्थ जसा तो स्वकरगतामला यशा शिनळ ।**
**सोडी दमयन्त्यर्थे क्षिप्रचि अतिदुर्लभा तशाशि नळ ॥ १ ॥**
( मोरोपंत )

( ४ ) आमच्या रावबहादुरांसारख्या महापंडितांस अंतीं ' च ' असला काय, आणि ' चा ' असला काय, त्याची क्षिति नाहीं हें उघड आहे; पण त्यांच्या अभिप्रायावरून जर मुनित्रयाची किंमत करावयाची तर एखाद्या नागऱ्याच्या हातून तानसेनाला सर्टिफिकिट पोंचविलें पाहिजे.

( ५ ) **श्रीगुरूचोनि नांवें माती । डोंगरिं जेया पासिं होती ।**
**तेणें कोलियें त्रिजगतीं । एकावद केली ॥ १ ॥** ( ज्ञानेश्वर )

( त ) **दपट बोली;** किंवा **गोष्ट उघड आहे असें भासवून किंवा आपल्या मताची भूमिका उच्च गृहीत धरून प्रमाणें देण्याचें नाकारणें.**

( १ ) **रामकृष्ण नामें उच्चारीन दोनी ।**
**लाभ अथवा हानी देव जाणे ॥ १ ॥**

निर्लज्ज होउनी नाचेन कीर्तनीं ।
लाभ अथवा हानी देव जाणे ॥ २ ॥ (तुकाराम)

( २ ) ज्ञानोदयाची लेखणी आज सुमारें चाळीस वर्षें जरी चाललेली आहे ... तरी महाराष्ट्र भाषेचे शुद्ध प्रयोग कानीं पडण्याचा संभव वरील शहरांच्या रस्त्यांतही जितका आहे, तितका आमच्या ख्रिस्ती मंडळींच्या मोठमोठ्या सभांतही नाहीं ही गोष्ट वस्तुतः पाहतां अगदीं उघड आहे व आमच्या जरठ बंधूंस आमच्यासारख्या पूर्ववयस्कानें ती सांगावी असें नाहीं. ( निबंधमाला )

( ३ ) कुणि कांहीं म्हणा मन जडलें ॥ धृ० ॥
पृथिवीचें जळ आकाशमार्गें न चढावें तें चढलें ॥ १ ॥
( भगवंतात्मज )

( ४ ) बसुनी तेथें तीन्ही काळीं । पाहुनि मूर्खपणाच्या चाली ।
जगा हंसूं गालाच्या गालीं । ब्रह्मानंदीं ।
रंगुनी स्वैर स्वच्छंदीं ॥ १ ॥ ( वाग्वैजयंती )

( ५ ) फाटेफोडी किंवा मुद्याला सोडून दुसराच विषय उपस्थित करणें किंवा प्रस्तुत विषयाला फांटे फोडणें.

( १ ) परी पश्चिमाहृदायें तांबडें सूर्यबिंब विलसे ।
कशी रंगली पूर्वा याचें कारण कांहि नसे । * * *
वदे तिला हें रहस्य असलें कथीन कानांत । * * *
ओढुनि जवळी ऐकविला तिस मुकाच कानांत । * * *
रविबिंबासम चुंबनाबिंबचि विलसत या गालीं । * * *
सांग वल्लभे ! नाचतसे कां त्यावरि ही लाली ॥ १ ॥
( वाग्वैजयंती )

( २ ) तूं गा कोण ? अपूर्व; कोठ वससी ? हें विश्व जी तत्वतां ।
( वामन )

( ३ ) सृष्टिपूर्वीं ब्रह्म असे । तेथें सृष्टि मुळींच नसे ।
आतां सृष्टि दिसत असे । ते सत्य किं मिथ्या ॥ १ ॥...
' जीवभूत : सनातन : ' । ऐसें गीतेचें वचन ।
येणें वाक्यें सत्यपण । सृष्टीस आलें ॥ २ ॥

**'यदृष्टं तन्नष्टं येणें' । वाक्यें सृष्टि मिथ्यापणें ।**
**सत्य मिथ्या ऐसें कोणें । निवडावें ॥ ३ ॥** (दासबोध)

(४) लोकहितवादींनीं आमच्या जुन्या पंडितांस केवळ 'व्यवहारशून्य' ठरवितांना थोडकासा हाही विचार करून पहावयाचा होता कीं, इंग्रेजी विद्येंत निपुण झाल्यानें तरी कितीसें व्यवहारचातुर्य येत असतें ?
(निबंधमाला)

(द) **लाडबोली;** किंवा **विनयाचा आश्रय करून वादविवाद टाळणें.**

(१) **पंडित ब्राह्मण पुसतील अर्थ। त्यांसी मी अनाथ काय बोलूं ॥**
(तुकाराम)

(२) **येह्रवीं तऱ्हि मी मूर्खु । जऱ्हैं जाला असे अविवेकु ।**
**तऱ्हीं संतकृपादीपकु । सोज्वलु असे ॥ १ ॥**

**तऱ्हीं न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।**
**करुनि घेयावें हें तुमतें । विनविलें मियां ॥ २ ॥** (ज्ञानेश्वर)

(३) मुळीं अगोदर आडिसनची उपमा आम्ही घेऊं इच्छीत नाहीं....ज्या विख्यात ग्रंथकाराचें महत्त्व पोप, जॉन्सन, मेकॉले अशा सारख्यांनीं भक्तिपुरःसर वर्णिलें आहे त्याची बरोबरी करूं जाणें, यापरतें धाडस कोणतें ? (निबंधमाला)

(ध) **अफाट बोली;** किंवा **शब्दांचें अवडंबर उभें करणें.**

(१) **ती अत्यद्भुत गूढ शक्ति सहसा संचारितां अंतरीं ।**
**मुक्तात्मा गगनीं उडे, बिथरतो इंद्राश्व तें पाहुनी ॥**
**दैत्यांचें बल देवसत्वाहि तसें अंगीं चढे त्या क्षणीं ।**
**सायुज्यत्व विराट पूरुष अहा ? देतो स्वयें लौकरी ॥ १ ॥**
(केशवसुत)

(२) **हिच्या लक्तरांची असे लाज आम्हां,**
**नका फक्त पाहूं हिच्या लक्तरां ।**

हिचें कुद्रती रूप लावण्य देखा,
जयाचा रसज्ञांमधीं अस्करा ॥
न घालूं जरी वाङ्मयांतील उंची हिरेमोतियांचे हिला दागिने।
मराठी असे आमुची मायबोली,
कशाला बढाई, कशाला जिणें ॥ १ ॥

( माधव जूलियन )

( ३ ) अहंपणाच्या गाऊं गाना । मुक्या मनाच्या उघड्या ताना ।
स्वानुभवानें हलवूं माना ।
ठराविकाला लाथ मारुनी नभासही उल्लंघूं ॥ १ ॥

( वाग्वैजयन्ती )

( न ) वेढबोली; किंवा भिन्न भिन्न तर्क, प्रमाणें किंवा युक्तिवाद लढविणें.

( १ ) अर्जुना हें नेणसी । जरि तत्वता विचारिसी ।
तरि वधिता तूं न्हवसी । हे वध्य न्हवती ॥ १ ॥
अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंतचि मानसी ।
तऱ्हीं शोचूं न पवसी । पांडुकुमरा ॥ २ ॥
एथ आणिकही एक पार्था । तुज बहुतीं परीं पल्हातां ।
दुःख करावेया सर्वथा । विषो नाहीं ॥ ३ ॥ ( ज्ञानेश्वर )

( २ ) एक तर असें मंत्रपठण रोजचे रोज करीत गेल्यानें वेळ कंटाळवाणा वाटत नाहीं....दुसरें असें कीं मंत्रपठणामुळें दांतांचीं मुळें व ओंठाचे व जिभेचे स्नायु बळकट होतात. तिसरें असें कीं ज्याप्रमाणें जांभयांमुळें प्रकृति निकोप राहते असें कांहीं डाक्टरांचें मत आहे, त्याप्रमाणें तोंड वरचेवर उघडल्यानें व मिटल्यानेंही राहते, असें सिद्ध करून देतां येईल. ( सुदाम्याचे पोहे )

( ३ ) कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥...
प्रायः सुमुहूर्ताचा शोध करायास लागला वेळ ॥ इ०

( मोरोपंत )

**( प ) झडबोली;** किंवा **आंकड्यांची गर्दी, जिनसांची यादी वगैरे देऊन विषयास महत्त्व आणणें.**

( १ ) या गुलामगिरींत ' पद्माडुकरीण ' आहे, ' टामस पेन्स ' आहे, ' विश्वामित्र ' आहे, ' वसिष्ठ ' आहे, ' होमर ' आहे, ' बद्‌मास नाना ' आहे, ' टर्कीन्‌ साहेब ' आहे, ' मनू ' आहे, ' भागवत ' आहे, ' अमेरिकेंतील बळीचा मातानुयायी जार्ज वाशिंगटन ' आहे-...' भट प्रोफेसर ' आहे,...' लंगोट्या बहाद्दर आहे, ' दिगंबर विद्याखातें ' आहे,...सर्व कांहीं आहे ! ! ( निबंधमाला )

( २ ) **भेरी निशाण मांदल । शंख टीविला भोंगल ।**
**आणि भासुर रण कोल्हाल । सूभटांचे ॥ १ ॥** ( ज्ञानेश्वर )

( ३ ) **मृत्तिका खाणोनि घर केलें । तें माझें ऐसें दृढ कल्पिलें ।**
**परि तें बहुतांचें हें कळलें । नाहींच तयांसी ॥ १ ॥**
**मूषक म्हणती घर आमुचें । पाली म्हणती घर आमुचें ।**
**माक्षिका म्हणती घर आमुचें । निश्चयेंसी ॥ २ ॥**
**कांतण्या म्हणती घर आमुचें । मुंगळे म्हणती घर आमुचें ।**
**मुंग्या म्हणती घर आमुचें । निश्चयेंसी ॥ ३० ॥** ( दासबोध )

( ४ ) आगगाडीची धडक झाली, घोडाच उधळला, पाण्यांतच पाय घसरला, घरच कोसळलें, या गोष्टी शरीरनाशाला प्रतिपदीं टपलेल्या असतात. ( मोडक )

(५) **एक अर्बुद साठी कोटी देखा । तीस लक्ष दहा सहस्र लेखा ।**
**सात शतें नव मास मापा ।**
**तया हिरण्यकशिपा काय झालें ॥ १ ॥**
**चौदा चौकड्या लंकानाथा ।**
**नव्याणव सहस्र राया दशरथा ।**
**तेही गेले स्वर्गपंथा । मागें सर्वथा नुरलेची ॥ २ ॥** (नामदेव)

फ ) **लागबोली;** किंवा **उपरोधिक भाषा योजणें.**

१ ) **निंदक कामाचा कामाचा । गडी आत्मारामाचा ॥ १ ॥**

**निंदक अमुचा सखा । अमुचीं पापें धूतो फुका ॥ २ ॥**

( एकनाथ ).

( २ ) वेदांची आवृत्ति इंग्लंडांत निघावी, व पाणिनीचा जीर्णोद्धार जर्मनींत व्हावा, आणि आमच्या इकडच्या महापंडितांनीं पाठशाळा मोडल्याचें श्रेय घेऊन 'हें एक पुरंदरचें बंड मोडलें' म्हणून नाचूं लागावें, हें ह्या आर्यभूमीच्या पुत्रांस केवढें भूषण होय ! ( निबंधमाला ).

( ३ ) लोकशिक्षणाकरितां ज्यांचें जनन अशीं पुण्यांतील कांहीं वर्तमानपत्रें निलाजरेपणाच्या व तिरस्करणीय कृत्यांवर पांघरूण घालतात, व कांहीं तर पाठ थोपटतात व म्हणतात कीं "वाहवारे बच्यांनो ! गाजवलीत, आज राखलीत बाजू ! धन्य तुमची ! आज आपल्या शहराचा व मातापितरांचा उद्धार केलात" ! ( आगरकर ).

( ४ ) गिबननें सहस्रावधि ग्रंथांचा आधार घेऊन आपलें भारूड रचलें. दुसऱ्यांचा उष्टा मजकूर घेऊन कोणी भारेचे भारे ग्रंथ नाहीं कां तयार करावयाचा ? पण आमच्या शूद्र इतिहासकाराचें पहा ! असा मासलेवाईक इतिहास लिहून ठेवला आहे कीं त्यास आधार म्हणून कोठेंही सांपडावयाचा नाहीं ! ( निबंधमाला ).

( ५ ) अल्पिष्टनप्रभृतीनीं नवें गद्य जन्माला घालण्याची सिद्धि चालविली; पण घरचा वारसदार होता त्याचा पक्का पूसतपास केला नाहीं.

( प्रो. द. वा. पोतदार ).

( ब ) **पडदापाडी**; म्हणजे **औत्सुक्य उत्पन्न करून पडदा पाडणें.**

( १ ) नंतर पुन्हा मागल्या खोलींतल्या खिडकीशीं जाऊन ओरडावें म्हणून मागें परतलो–तों काय भयंकर प्रसंग ! कोंपऱ्यांतून केवढा तरी जाळ उठला ! ( मी ).

( २ ) सुंदरी जवळ उभी होती तिच्याकडे मी एक वेळ पाहिलें आणि मुकाट्यानें तेथून निघालों व त्या गोष्टीचा विचार करीत तडक घरीं आलों–पण घरीं येतों तों कोण निराळाच भयंकर प्रसंग ! ( मी ).

( ३ ) **दुमदुमतें स्थळ तें अजुनी । त्या एकच करुणागानीं ।**

जा जाउनि ऐका कानीं । ऐकाल याच बोलाला ।
–' राजहंस माझा निजला ॥ १ ॥ ( वाग्वैजयंती )

( ४ ) प्रियकर पितरांच्या गूढ एकांत जागीं ।
अनुमति न मुलांही लाभते प्रेमभागी ॥
तदुपरि जननीनें दीपही लुप्त केला ।
म्हणुनि कविचिया ये अंधता कल्पनेला ॥ १ ॥
( गृहविहार–१४–६९ )

( भ ) आडलपी; किंवा लोकांच्या अभिरुचीस विशेष प्रिय असलेले शब्द, कल्पना किंवा व्यक्ति यांचा निर्देश करून भाषेला महत्त्व आणणें.

( १ ) ज्ञानाविण जे जे कळा । ते ते जाणावी अवकळा ॥
ऐसें ' भगवंत ' बोलिला । चित्त द्यावें त्याच्या बोला ॥
( रामदास )

( २ ) रसवंतीच्या पहिल्या बाळा ' मुकुंदराजा ' ला ।
पहिला वहिला अष्टांगांनीं प्रणाम हा त्याला ॥
शहर ' पुण्याच्या, ' ' शिवनेरी ' च्या, ' पंढरि 'च्या देशा ।
'पुंडलिका' च्या; 'शिवराया'च्या, 'टिळकां'च्या देशा ॥
( वाग्वैजयन्ती )

( ३ ) त्या डोंगरांत जी दुरून खिंड दिसते तींतून ' श्रीसमर्थ ' जात असतां जेव्हां ते खिंडीच्या मध्यावर आले असतील, तेव्हां त्यांची ती अश्वारूढ मूर्ति पाटण व चाफळ या दोनी गांवच्या भाग्यवंत लोकांना पहावयास मिळाली असेल ! ( देव )

( ४ ) ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर प्रभृति थोर वागीश्वरांचा ' मागोवा ' घेत आणि कृष्णाजी सभासद किंवा कृष्णाजी शामराव यांसारख्या संद्या बखरनवीसांना ' वाट पुसत ' जर आमची मंडळी निघाली असती तर विशाल व अभंग अशा प्राचीन अधिष्ठानावर आरूढ होऊन ते न जाणों ततोप्यधिक यशाचे वांटेकरी झाले असते.
( प्रो. द. वा. पोतदार )

( ५ ) **नाहीं घोरपडीशिवाय शिवली भिंतीस ज्याच्या शिडी ।**
**फेंकाया शकले न दृष्टि रिपुही ज्याच्याकडे वांकडी ॥**
**'तान्हाजी' सम वीरसिंह पडला ज्या कारणें संगरीं ।**
**त्या या 'सिंहगडीं' निरंतर शिवा स्वाराज्य आतां करी॥१॥**
( मोगरे )

( ६ ) **मज गमे ऐसा जनक तो । मांग साचा ॥ धृ० ॥**
**मुख सुरकुतलें, मस्तक पिकलें,**
**शरीर रोगांनीं पोखारिलें । स्मशान ज्यानें संनिध केलें ।**
**त्या प्रेताला दुहिता विकतो ॥ १ ॥** ( शारदा )

**४२६** ह्या व अशाच प्रकारच्या इतर साधनांनीं कुशल साहित्यलेखक व वक्ते आपली भाषा सजवित असतात. हे प्रकार एकाच जातीच्या भाषाशैलीचे नव्हत हें उघड आहे. त्यांतील कांहीं टकािलेखांत, कांहीं काव्यांत, कांहीं निबंधांत, कांहीं कादंबरी नाटकांत, व कांहीं वक्तृत्वांत व वादविवादांत उपयोगी पडणारे आहेत. त्याचप्रमाणें ते सगळे सर्वदा अनुकरणीय आहेत असें नाहीं. नवीन साहित्यलेखकानें प्रायः स्वतःच्या तारतम्याचा उपयोग करून, प्रसंग, काळ व परिस्थिति यांच्या धोरणानें त्यांचा उपयोग करावा.

## अभ्यासपाठ १ ला.

" या पूर्व–संस्कार–त्यागाबरोबरच त्यांनीं ह्रस्वदीर्घांची ओळख टाकून दिली कीं काय कोण जाणे ! " या वाक्यांत भाषाशैलीच्या कोणत्या साधनाचा उपयोग केला आहे ? ह्रस्वदीर्घांची ओढाताण हा व्याकरणदृष्ट्या दोष असल्या-मुळें ( कलम ३८६ ) येथें गर्भित निंदा आहे. सबब 'उपरोधिक भाषे' चा म्हणजे 'लागबोली' चा उपयोग येथें केला आहे.. ( कलम ४२५ फ. ).

## अभ्यासपाठ २ रा.

" पुढील वाक्यांत भाषाशैलीच्या कोणत्या साधनांचा उपयोग केला आहे तें सांगाः—

( १ ) **काव्य करावें, म्यां नच वचकावें, दूषितो परि लघूस ।**
**कां न सदन बांधावें कीं, त्यांत पुढें बिळें करिल घूस ॥१॥**
( मोरोपंत )

( २ ) हा जितका दुर्गुणी त्यापेक्षां ती शतपट सद्गुणी. हा जितका कुरूप त्यापेक्षां ती शतपट सुरूप ! ( शारदा २-४ )

( ३ ) गोमयाच्या व गोमूत्राच्या द्वारें नरकवास टाळतां येत नाहीं असें जरी गृहीत धरलें तरी त्यांच्या सेवनानें नो सुसह्य तरी होत असला पाहिजे. ( सुदा० पोहे )

## अभ्यसपाठ ३ रा.

" एखाद्या मनुष्याचें घर गलिच्छ आहे " हा मजकूर भाषाशैलीच्या एखाद्या साधनाचा उपयोग करून उठावदार रीतीनें सांगा. ' त्याच्या घरांत पावसाळ्यांत गळत नाहीं अशी जागा म्हणजे फक्त कोनाडे होत. उकिरडा कोणता व दिवाणखाना कोणता, हें समजण्यास मार्ग नाहीं; कागदांचे तुकडे, कचरा, चिंध्या, तंबाकूची राख, खरकटें इत्यादिकांचें चोहोंकडे पूर्ण साम्राज्य आहे ' इत्यादि.

## अभ्यासपाठ ४ था.

मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्या भाषाशैलीची तुलना करा व मोरोपंताच्या लोकप्रियतेचीं कारणें सांगा. ( बी. ए. परीक्षा, १८६६ ). " मुक्तेश्वराची संवेदनाशक्ति मोरोपंतांहून अधिक तीव्र असल्यामुळें त्याच्या शैलींत स्वाभाविकपणा अधिक आहे. माधुर्य व प्रसाद हे गुण मुक्तेश्वराच्या भाषेंत मोरोपंती भाषेहून अधिक आहेत. मुक्तेश्वराची भाषा साधी, गोड व सरळ आहे तर पंतांची संस्कृत-प्रचुर, प्रौढ, ऐटदार व अलंकारिक आहे. मुक्तेश्वराला श्लोकरचना चांगली साधली नाहीं व पंतांची श्लोकरचना आर्यारचनेइतकीच सफाईदार उतरली आहे; यावरून पंतांचें भाषाप्रभुत्व मुक्तेश्वराहून अधिक आहे. मुक्तेश्वराची शैली पंतांहून अधिक सरस असूनही, पंतांच्या यमकादि शब्दालंकारांच्या, ऐटदार रचनेच्या, व विविधत्वाच्या छापेमुळें पंतांची भाषाशैली व कविता अधिक लोकप्रिय झाली. "

## अभ्यासपाठ ५ वा.

मोरोपंत व तुकाराम यांच्या भाषाशैलीची तुलना करा. " तुकारामबुवांची संवेदना एकांगी असली तरी पराकाष्ठेची तीव्र असल्यामुळें तिचा उमाळा अत्यंत जोरदार आहे व पंतांचा त्या मानानें पुष्कळच मंद आहे. तुकोबांची भाषा निर्भीड, साधी, धोपट व उच्च कल्पनाप्रचुर आहे, तर पंतांची उपचारांच्या

थांच-पेंचांनीं संपन्न, अलंकारयुक्त, ऐटदार व सामान्यकल्पनांत वावरणारी आहे. व्याकरणदृष्ट्या पंतांची भाषा तुकोबांहून अधिक शुद्ध आहे. दोघांच्याही भाषा परिणामकारक आहेत, पण तुकोबांची आदर उत्पन्न करिते व पंतांची सलगी उत्पन्न करिते. "

### अभ्यासपाठ ६ वा.

रामदासांच्या भाषाशैलीचे विशेष सांगा. " रामदासांच्या भाषाशैलीचा मुख्य गुण म्हणजे ' ओज. ' ह्या गुणांत ती कोणत्याही मराठी कवीहून वरचढ आहे. त्यांची शब्दयोजना साधी, जोरदार व छंदादिकांचे व व्याकरणाचे निर्बंध प्रसंगीं गुंडाळून ठेवणारी असून अत्यंत परिणामकारक आहे. त्यांच्या भाषेच्या एकदेशीयत्वामुळें तिच्यांत रसोत्पत्तीला फारसा अवकाश नाहीं. "

### अभ्यासपाठ ७ वा.

साधी सरस शब्दयोजना, अलंकारिक वाक्यरचना व भाषाशैलीच्या कृत्रिम साधनांनीं नटविलेली साहित्यरचना यांतून अधिक श्रेष्ठ कोणती व कां ? " साधी व सरस रचना सर्वांत श्रेष्ठ. कारण संवेदनाशक्तीचा प्रवाह सुरू झाल्यावर त्याचा उमाळा साधा व सरळ असाच वाहणार व तोच सहृदय वाचकांची संवेदना जागृत करूं शकणार हें निसर्गसिद्ध आहे. त्याचप्रमाणें असल्या भाषाशैलीचा परिणामही आपल्या रसवत्त्वामुळें चिरकालिक होतो. अलंकारयुक्त रचना व उपालंकारांनीं सजविलेली रचना या त्या मानानें कृत्रिमच होत. अर्थात् त्या मनोरंजकत्वामुळें जरी सद्यः प्रभावी असल्या तरी त्यांचा उमाळा कृत्रिम असल्यामुळें त्यांचा परिणाम कायम टिकत नाहीं. "

---

# पाठ सदतिसावा.

## किरकोळ लिखाण.

४२७ किरकोळ लिखाणांत ‘ पत्रलेखन, ’ ‘ अर्ज ’ व ‘ जाहिराती ’ ह्या तीन बाबी विशेष महत्त्वाच्या आहेत. पत्रलेखनाची चाल आपल्यांत पूर्वीपासून आहेच. अर्थात् पत्रांचे मायने पुष्कळ जुने असून त्यांतील बरेच थोड्या फार फरकानें अजून रूढही आहेत. आमच्या इकडे इतिहास लिहून ठेवण्याची प्रवृत्ति कमी असल्यानें जुनीं पत्रें हें इतिहास मिळवावयाचें एक महत्त्वाचें साधन होऊन बसलें आहे व अर्थातच त्यांना मोठें महत्व प्राप्त झालें आहे. ‘ अर्जा ’ची कल्पना देखील ‘ यादी, ’ ‘ अर्जदास्त ’ वगैरेंच्या रूपानें आपल्यांत पूर्वीपासून आहे. ‘ जाहिराती ’ची कल्पना मात्र अगदीं नवी असून आम्ही ती पाश्चात्यांपासून उचलली आहे.

४२८ हेमाद्रिकृत म्हणून अकारण प्रसिद्ध असलेला ‘ लेखनकल्पतरु ’ नांवाचा एक ग्रंथ सन १८५३ मध्यें मुंबईस प्रसिद्ध झाला होता. त्यांत पत्र-लेखनाच्या ( १ ) शुद्ध ( २ ) सात्विक व ( ३ ) रहस्य अशा तीन रीती सांगितल्या असून त्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत, व पुढें शेंसव्वाशें मायने पद्यांत दिले आहेत. उदाहरणार्थ एकदोन पद्यें घेऊं:—

**‘ श्रीमंत ’ स्वप्रभुला, ‘ श्रीया मंडित ’ दिवाण लोकांस**
**‘ श्रीया विराजित ’ असें प्रभुच्या सर्वांहि बंधुवर्गास ॥ १ ॥**
**स्वपित्यास ‘ तीर्थरूप ’ हें ‘ स्वरूप ’ गुरुमातुलाणि चुलत्यास ।**
**स्वाग्रज-वृद्ध-स्वजना, याहुनि लिहिणें कदा न भलत्यास ॥ २ ॥**

या ग्रंथाचे निरनिराळे अंक केले आहेत. पहिल्यांत वरप्रमाणें मायने सांगून पुढें दुसऱ्यांत लेखांतील इतर मजकूर कसा असावा याविषयीं दिग्दर्शन केलें आहे. तिसऱ्या अंकांत लिहिण्याचे गुप्त, प्रकट, प्रगल्भ वगैरे भेद सांगितले आहेत.

असले लेखनप्रकार पेशवाईचे अखेरपर्यंत कमीजास्त प्रमाणांत रूढ होते यांत शंका नाहीं. मासल्याकरितां कांहीं पुढें दिले आहेत.

( क ) पत्र १ लें. अभंग वृत्तांत वाचतां येण्याजोगी रचना.

**' विनंति विशेष, आपणा कारणें । पक्क आंबे दाणे, एक शत ॥**
**चांगल्या झाडाचे, बहु नामांकित । गोडीस बहुत योग्य ऐसे ॥**
**आणोनी सारे बहुत माफजाती । करुनी गड्या हातीं पाठविले ॥इ०**

( ख ) पत्र २ रें. आर्येंत वाचण्याजोगी रचना.

**' विज्ञापना अशी कीं, राजश्री देवरावंदादांनीं ।**
**मजला विनंति केली कीं अमुच्या सर्व भाउबंदांनीं '** ॥ इ० ॥

( ग ) पत्र ३ रें. सांकेतिक भाषा.

" अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. वसंत बहुल तृतीया इंदुवार पावेतों गोकाक, घटप्रभादक्षिणतीर, सैन्यासह वडिलांचे आशीर्वादें करून सुखरूप असों विशेष....वडिलांचा मुक्काम आज बारींत नणदी म्हणोन गांव आहे, तेथें येत आहेत. उद्यां परवां येथें यावे असें आहे. तिकडील सर्व वर्तमानाची आज्ञा व्हावी. ' श्रीपूरकर ' व भस्मपंचका 'चे वर्तमानाची आज्ञा झाली पाहिजे. सदैव आशीर्वाद पत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना. "

हें पत्र कै० श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांस कै० श्रीमंत परशुरामभाऊ साहेबांचे पुत्र श्रीमंत रामचंद्रराव यांनीं लिहिलेलें आहे. त्यांत ' श्रीपूरकर ' म्हणजे कोल्हापूरकर छत्रपति व भस्मपंचक म्हणजे ' शेणवी, मराठे, पठाण, लक्ष्मीबाई शिंदे व यमुनाबाई शिंदे अशा, मुलखाचें भस्म करणाऱ्या पांच द्रव्यांचा उल्लेख केला आहे.

**४२९** पत्रांच्या मायन्यांची जुनी परंपरा हल्लीं बरीच सुटली आहे, तथापि श्रीशंकराचार्य, छत्रपति, संन्यासी, साधु वगैरे वंद्य व्यक्तींचे व नात्यांचे मायने बहुधा तसेच कायम आहेत. विशेष महत्त्वाचे कांहीं मायने पुढें दिले आहेत.

### १ श्रीजगद्गुरु शंकराचार्यांची बिरुदावली.

श्रीमत्परहंस परिव्राजकाचार्यवर्य पदवाक्यप्रमाण पारावार पारीण, यमनियमासन प्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठ, तपश्चक्रवर्ती, ध्याना-

द्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्य, व्याख्यानसिंहासनाधीश्वर, सकलनिगमागम सारहृदय, सांख्यत्रयप्रतिपादक, वैदिकमार्गप्रवर्तक, सर्वतंत्रस्वातंत्रपुवराधीशपंचगंगातीरनिवास कमलानिकेतनकरवीरसिंहासनाधीश्वर श्रीमच्छंकरपादजान्हवीजनित श्री.........महाराज यांचे श्रीचरणसेवेसी."

## २ इतर संन्यासी.

"श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य वेद–भूदेवनरदेव पूजित...महाराज यांचे चरण सेवेसी......याची नारायणस्मरणसहस्त्रपूर्वक विज्ञापना इ०......हे विज्ञापना."

## ३ संत, साधु, महंत (ब्राह्मण).

"श्रीगुरुभक्तिपरायण तीर्थस्वरूप वेदमूर्ति राजमान्य राजश्री दिवाकर गोसावी यांसी, स्नेहांकित दत्ताजी त्रिमल नमस्कार विनंति, ( किंवा विज्ञापना ) विशेष."

## ४ छत्रपति.

"स्वस्तिश्री क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर श्रीराजा शंभु छत्रपति स्वामींचे चरणसेवेसी." इ०

**५ सद्गुरु.** ( समर्थांस लिहिलेल्या पत्रावर शिवाजीनें घातलेला मायना )

"श्रीसद्गुरुवर्य, श्रीसकलतीर्थरूप, श्रीकैवल्यधाम, श्रीमहाराज, श्रीस्वामी, स्वामींचे सेवेसी चरणरज शिवाजी यांनीं चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना जे...बहुत काय लिहिणें हे विज्ञापना" इ०

## ६ बापास पत्र.

"तीर्थरूप राजश्री विठ्ठलपंत पुरोहित, मुक्काम सातारा, वडिलांचे सेवेसी. अपत्यें वामनानें दोनी कर जोडून त्रिकाल चरणीं मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना......सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## ७ इतर वडील मनुष्यास.

"तीर्थस्वरूप राजमान्य राजश्री नारायण विश्वनाथ साठे मुक्काम पेण, वडिलांचे सेवेसी, अपत्यें महादेव पुंडलीक साठे यानें ......... हे विज्ञापना."

### ८ मुलास.

" चिरंजीव विजयीभव राजश्री रामचंद्र गोविंद केळकर, मौजे जामगांव यांसी, प्रती. गोविंद नरसिंह केळकर याचे अनेक आशीर्वाद विशेष........हे आशीर्वाद. "

### ९ इतर लहानास.

" चिरंजीव राजश्री......यास......याचे आशीर्वाद विशेष...हे आशीर्वाद."

### १० आईस. ( सुवासिनी ).

" तीर्थरूप सौभाग्यवती वज्रचूडेमंडित मातुश्री काशीबाई मुक्काम मिरज, वडिलांचे सेवेसी. अपत्यें......दोनीकर...... ही विज्ञापना. "

### ११ आईस. ( विधवा ).

" तीर्थरूप गंगाभागीरथी रखमाबाई पाटणकर इ० ...... ही विज्ञापना. "

### १२ इतर वडील स्त्रीस.

" तीर्थस्वरूप सौभाग्यवती ( विधवा असल्यास गंगाभागीरथी ) रमाकाकू रानडे, वडिलांचे सेवेसी...... ही विज्ञापना. "

### १३ विवाहित मुलीस अगर इतर तत्तुल्य स्त्रीस.

" चिरंजीव सौभाग्यवती वज्रचूडे मंडित रंगूबाई ईस अनेक आशीर्वाद...हे आशीर्वाद. "

### १४ बरोबरीच्या गृहस्थास.

" राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री......स्वामींचे सेवेसी. पोष्य... याचा साष्टांग नमस्कार विनंति विशेष......बहुत काय लिहिणें लोभ असावा ही विनंति. "

### १५ परक्या शिष्टास.

" श्रीयुत रा. रा.......यांसी प्रेमपुरस्सर विनंति विशेष ...... ही विनंति. "

### १६ उपाध्याय किंवा अन्य वैदिक यास.

" तीर्थस्वरूप वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री......यांस कृतानेक शिर-साष्टांग नमस्कार विज्ञापना विशेष......हे विज्ञापना. "

## १७ वैदिकाकडून गृहस्थास.

"श्रीचरणीं तत्पर रा. रा......यांस आशीर्वाद उपरि......हे आशीर्वाद."

## १८ जहागिरदार, इनामदार वगैरेंस.

"श्रीमंत सकलगुणालंकरण रा. रा ...स्वामीचे सेवेसी आज्ञांकित...याचा .ारसाष्टांग नमस्कार विज्ञापना विशेष....सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना."

ह्या मायन्यांवरून पत्र लिहिण्याचें सामान्य धोरण लक्ष्यांत येण्यास हरकत नाहीं. प्रसंगोपात् विशेष जिव्हाळ्याच्या मनुष्यास 'मित्रवर्य'; अधिकाऱ्यास "रावसाहेब" शास्त्री, वैद्य, पुराणिक इत्यादिकांस 'वेदशास्त्रसंपन्न' इत्यादि फरक तारतम्यानें करावे लागतात. पूर्वी तारीख व मुक्काम हे पत्रांतील मजकुरांतच बहुधा घालीत असत, ते आतां पत्राच्या मथळ्यावर मंगलसूचक श्रीकार किंवा तसलाच एकादा मंगलसूचक शब्द मध्यावर घालून, त्याच्या दोन्ही बाजूंस किंवा क्वचित् एकाच बाजूस घालतात. 'विवाह' 'मुंज' इत्यादि मंगलसूचक पत्रांवर केशराचे थेंब उडवून तीं पाठविण्याचा शिष्टसंप्रदाय आहे. पत्राच्या बाहेरचा पत्ता शक्य तितका खुलासेवार घालणें नेहमीं सोयीचें असतें.

**४३०** अर्ज हा देखील एक पत्राचाच प्रकार आहे. मात्र त्यांत क्षेमकुशलाचें वर्तमान कळवावयाचें नसून एखाद्या अमलदाराकडे कांहीं तरी दाद मागावयाची असते. अर्ज बहुधा इंग्रजींत लिहिले जातात, तथापि तो मराठींत लिहावयाचा झाल्यास प्रथम अंमलदाराचा नुसताच हुद्दा किंवा नांवासह सबंध हुद्दा घालून अखेरीस 'मेहरबानांस जाहीर होय, हा अर्ज' असें म्हणून लगेच तारीख घालतात व खालीं उजव्या बाजूस सही व डाव्या बाजूस मुक्काम व पुन्हां तारीख घालतात. उदाहरणार्थ.

## १ कलेक्टरास अर्ज.

"मेहेरबान खुदावंत कलेक्टर साहेब बहादुर जिल्हा खानदेश यांचे हुजूरास अर्जदार नारायण विठ्ठल पोतनीस मुक्काम यवतमाळ जिल्हा खानदेश याचा अर्ज कीं...मेहेरबानांस जाहीर व्हावें, हा अर्ज, तारीख १९ नवंबर १९०५ इ".

यवतमाळ<br>ता. १९ नवंबर १९०५ } **नारायण विठ्ठल पोतनीस.**

४३१ " जाहिरात म्हणजे दुसऱ्याची कोणती तरी गरज किंवा आवश्यकता पूर्ण करण्याविषयीं आपली पात्रता लेखनद्वारा जाहीर किंवा प्रसिद्ध करणें. " ही गरज एखाद्या जीवनोपयोगी पदार्थाविषयीं असो, व्यापारविषयक मालाविषयीं असो, व्याधिनिर्मित व्यंग दूर करणाऱ्या उपायाविषयीं असो, किंवा नोकरीविषयीं असो, ती आपण एखाद्या पदार्थाच्या पुरवठ्यानें किंवा व्यक्तिशः नोकरीनें नाहींशी करूं हें कळविण्याकरितां जाहिरातीचा उपयोग करितात. एखाद्या मनुष्याला आपल्या मुलाकरितां एक शिक्षक नेमावयाचा आहे, तर ' अमुक अमुक प्रकारचा शिक्षक पाहिजे ' अशा आशयाची जाहिरात तो एखाद्या वर्तमानपत्रांत देईल, व त्यायोगें, एखाद्या चरितार्थाची अडचण वाटणाऱ्या शिक्षकाच्या उपयोगीं पडण्याविषयीं आपली पात्रता प्रदर्शित करील; तर उलटपक्षीं एखादा शिक्षक ' अमुक प्रकारची नोकरी पाहिजे ' अशा आशयाची जाहिरात एखाद्या वर्तमानपत्रांत देऊन, एखाद्या मुलाची शिक्षणविषयक गरज पूर्ण करण्याविषयीं आपली पात्रता दाखवील. अशा प्रकारें दुसऱ्याच्या गरजेची पूर्णता करण्याविषयीं आपली पात्रता दाखविणारें जें वाक्यप्रबंधन तें जाहिरात होय.

४३२ जाहिरातींच्या उद्देशभेदानुसार त्यांचे अनेक प्रकार होतात. लोकांना एखाद्या महत्वाच्या बाबतीसंबंधानें इषारत देणाऱ्या जाहिरातीस ' जाहिरनामा किंवा नोटीस ' असें म्हणतात. सामान्य संस्थेनें किंवा व्यक्तीनें दिलेल्या सार्वजनिक उपयोगाच्या जाहिरातीस ' जाहीर विनंति किंवा सूचना ' असें म्हणतात. राजानें काढलेल्या जाहिरातीस ' फर्मान ' म्हणतात. इ०

४३३ व्यापार विषयक जाहिरातीच्या मुळाशीं स्वार्थी हेतु असल्यामुळें तिची रचना पुढील तत्त्वांवर करावी लागते.

१ संक्षेप. जाहिराती देणें खर्चाची बाब असल्यामुळें जाहिरातीचा मजकूर शक्य-तितक्या थोड्या शब्दांत ठेवावा लागतो.

२ चटकदारपणा. लोकांना आपली किंवा आपल्या मालाची उपयुक्तता पटावी अशा प्रकारची मजकुराची मांडणी व त्या धोरणानें साधनांचा उपयोग. हीं साधनें येणें प्रमाणेंः-( क ) चटकदार मथळा. ( ख ) लोकप्रिय व्यक्तींच्या नांवाचा उपयोग ( ग ) उपयुक्तता दाखवितांना मोघमपणा न राखतां विशिष्टपणावर जोर देणें. ( घ ) गरज व उपयुक्तता

यांचा तर्कशुद्ध मेळ घालणें (ङ) मानसशास्त्राचा उपयोग करून उपयुक्तता ताबडतोब आहे असें पटविणें, व (च) तज्ज्ञांचे अभिप्राय.

स्थान व रीति यांचें वैचित्र्य. जाहिरात पुष्कळ लोकांचे नजरेखालून जावी याकरितां पुष्कळ स्थानीं व पुष्कळ प्रकारांनीं तिची योजना करणें.

## अभ्यासपाठ १ ला.

आपली शाळेंतील हालहवाल कळविणारें एक पत्र आपल्या मामास लिहा.

## अभ्यासपाठ २ रा.

" एका मुलानें आपल्या चुलत्याजवळ त्याच्या बायकोस म्हणजे आपल्या चुलतीस देण्यासाठीं पत्र दिलें त्यांत पुढील मजकूर होता. ' तीर्थरूप उमाकाकू ह्यांस, सप्रेम विनंति विशेष. माझें सर्व यथास्थित चाललें आहे. विशेष मजकूर चिरंजीव काका समक्ष निवेदन करतील. कळावें हे आशीर्वाद. " ह्या पत्रांतील चुका दुरुस्त करा.

## अभ्यासपाठ ३ रा.

तुमच्या शाळेच्या हेडमास्तरांचे मनांत एज्युकेशनल इन्स्पेक्टर यांस आपल्या शाळेची परीक्षा घ्यावयास बोलवावयाचें आहे; तर ते त्यांस मराठींत पत्र कसें लिहितील ?

## अभ्यासपाठ ४ था.

छत्रपति सरकार कोल्हापूर, यांजकडे ' मराठा शिष्यवृत्ति ' मिळण्याविषयीं एका मराठे मुलास अर्ज करावयाचा आहे. तो त्यानें कसा लिहावा ?

## अभ्यासपाठ ५ वा.

श्रीमंत रामचंद्र परशुराम पटवर्धन यांच्या एका पत्रांत पुढील वाक्यें आहेत. " पुण्यास ढालगांवकर आले म्हणोन ऐकतों, त्यास कसे आले ? बळिरामांचें, त्यांचें व नरवाडकर यांचें कसें आहे ? " सदर वाक्यांत ढालगांवकर म्हणजे बाळोबा तात्या पागनीस, बळिराम म्हणजे नाना फडणीस व नरवाडकर म्हणजे दौलतराव शिंदे, असा अर्थ अभिप्रेत आहे. तर हें पत्र कोणच्या वर्गांत मोडेल ?

## अभ्यासपाठ ६ वा.

तुम्हांस एक तात्पुरत्या शिक्षकाची नोकरी चांगल्या कुटुंबवत्सल घरांत करावयाची आहे असें समजून ' केसरीं ' त देण्यासाठीं एक जाहिरात तयार करा.

## अभ्यासपाठ ७ वा.

एका अमेरिकिन कारखानदारानें लंडनमधील एका वर्तमानपत्रांत आपल्या हजामतीच्या उपयोगी पडणाऱ्या ' ब्रशा ' संबंधीं जाहिरात दिली, पण त्यांत स्वतःचे ब्रशांचे विशिष्ट गुणापेक्षां हजामतीचे उपयुक्ततेवरच अधिक जोर दिला. या चुकीचा परिणाम काय झाला असावा ? या चुकीमुळें त्याचे ब्रश न खपतां इतर लंडनमधल्या कारखानदारांचे ब्रश व हजामतीच्या उपयोगाचें सामान खपलें असावें. ( कलम ४३३, ग ).

## अभ्यासपाठ ८ वा.

एका सार्वजनिक बागेच्या फाटकावर पुढील पाटी आहे. " येथील फुलांस व फळास कोणी हात लावूं नये. " ही जाहिरात आहे काय ? असल्यास कोणत्या प्रकारची ?

---

# पाठ अडतिसावा.

## वाङ्मयाची कसोटी.

**४३४** येथवर व्याकरणदृष्ट्या व भाषादृष्ट्या मराठीच्या सजावटीचा बहुतेक अंगांनीं विचार झाला. आतां भाषेंत निर्माण होणारें जें वाङ्मय त्याच्या बरेवाईट-पणाच्या कसोटीसंबंधी दोन शब्द सांगून हा विषय संपवूं.

**४३५** कोणत्याही भाषेचें वाङ्मय तीन हेतूंनीं निर्माण होत असतें (१) समाजाचे नेहमींचे व्यवहार चालविण्यासाठीं. जसें:—रोजनिशा, तवारिखी, पत्रें, जाहिराती इत्यादि. (२) समाजाचें गुणदोषात्मक यथार्थ चित्र दाखवून त्यांतील व्यंगें काढून टाकावीं या इच्छेनें. जसें:—कादंबऱ्या, नाटकें, लघुकथा, इतिहास, चरित्रें, निबंध, टीकालेख इत्यादि, व (३) समाजापुढें तात्त्विक उच्च ध्येय ठेवून त्या ध्येयानुसार समाजाला गतिप्रेरणा करण्यासाठीं. जसें:—पुराणें, काव्यें, ध्येयात्मक नाटकें, कादंबऱ्या, तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ, वर्तमानपत्रें, मासिकें इत्यादि.

**४३६** यांतून पहिल्या प्रकाराच्या गुणावगुणांविषयीं पूर्वीं प्रसंगोपात् उल्लेख आला आहे, त्याहून जास्त सांगण्यासारखें त्या प्रकारच्या वाङ्मयास महत्त्व नाहीं. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारच्या वाङ्मयाला मात्र 'सत्य', 'शिव' व 'सौंदर्य' या तिनीं धर्मांची आवश्यकता असून, ते त्यांमध्यें ज्या मानानें उतरले असतील त्या मानावर वाङ्मयाचा बरेवाईटपणा ठरत असतो. 'सौंदर्या' मुळें वाङ्मय चट-कदार होतें, 'शिव' म्हणजे मंगलोत्पादकतेच्या धर्मामुळें तें परिणामकारक होतें व 'सत्य' म्हणजे शाश्वत अशा तत्त्वबोधानें तें मार्गदर्शक होतें. हे तीनही धर्म एकमेकांहून उत्तरोत्तर वरचढ आहेत व वाङ्मयाच्या भूमिकेनुसार त्यांत ते कमी अधिक प्रमाणांत उतरलेले असतात. ज्यांत नुसतेंच सौंदर्य आहे व मंगलोत्पाद-कता व तत्त्वबोध मुळींच नाहींत किंवा असत्प्राय आहेत अशा वाङ्मयापेक्षां मंगलोत्पादकता व तत्वबोध या धर्मांनीं संपन्न असलेलें वाङ्मय सौंदर्यहीन असलें तरी अधिक प्रशस्त होय. दुसऱ्या प्रकारच्या वाङ्मयाला विशेषेंकरून या 'मंगलो-

त्पादक धर्मा' ची विशेष आवश्यकता असते. वाङ्मयाच्या जनकाची विचारसरणी, तर्कपद्धति, त्यानें केलेली पात्रांची स्वभावरचना, कथासूत्राची योजना, भिन्न भिन्न पात्रांची त्यानें लावलेली विल्हेवाट ( Poetical justice ), ती लावितांना त्यानें दाखविलेलें चातुर्य इत्यादिकांच्या परिणामानें वाङ्मयांत मंगलोत्पादनाचा धर्म उत्पन्न होतो व तो जितका व्यवस्थित साधला असेल तितकें वाङ्मय परिणामकारक होतें.

४३७ येथें एक मोठी गोष्ट लक्ष्यांत ठेवली पाहिजे ती ही कीं, प्रत्यक्ष व्यवहारांत समाजाच्या चरित्रांतलि मंगलोत्पादनाचे कार्यकारणसंबंध समाजाच्या दीर्घायुष्यामुळें व अदृष्ट कर्तृत्वामुळें दूरांतरित व गूढ असतात. अर्थात् त्यांचें यथार्थ चित्र दाखविणाऱ्या ' इतिहास ', ' चरित्रग्रंथ ' ऐतिहासिक नाटकें कादंबऱ्या ' इत्यादि वाङ्मयांत सौंदर्य मंगलोत्पादनादि धर्म उतरविणें हें प्रायः लेखकाच्या हातीं रहात नाहीं. यथार्थ निवेदनाच्या आवश्यकतेमुळें त्यास कृत्रिम सौंदर्य आणतां येत नाहीं—स्वाभाविक काय उतरेल तेवढेंच; मंगलोत्पादनाची दिशा स्वतःच्या पदरची आखतां येत नाहीं—परमेश्वर—दत्त जें काय इष्टानिष्ट समाजाच्या वांट्यास आलें असेल त्याची कार्यकारण—मीमांसा करितांना जें काय मंगलोत्पत्तीचें दिग्दर्शन करतां येईल तेवढेंच; व सत्यदर्शन देखील ध्येयानुसार करितां येत नाहीं—ओघानें जें झालें असेल त्यांतूनच घेण्याजोगें तत्वनिदर्शन जितकें करितां येईल तितकेंच; अशी त्याची परावलंबी स्थिति असते. पण अशा स्थितींत सुद्धां कुशल साहित्यजनक समाजाच्या किंवा व्यक्तीच्या यथार्थ—निरूपणात्मक चरित्रांची मार्मिक छाननी करून वेगवेगळ्या घटनांचे कार्यकारणसंबंध समाधानकारक रीतीनें उलगडून दाखवितात व सर्वसामान्य नीतितत्त्वें व प्रत्यक्ष अनुभव यांचा मेळ घालतात. आणि हें करितांना ज्या सरळपणा, निःपक्षपातपणा, मार्मिकता इत्यादि गुणांचा ते उपयोग करितात त्यांच्या सजावटीवर त्यांच्या वाङ्मयाची सरसनीरसता अवलंबून राहते.

४३८ परन्तु ' काव्य, नाटक, लघुकथा ' इत्यादि ज्या काल्पनिक वाङ्मयांत लेखनांतर्भूत समाजाचा चरित्रक्रम मर्यादित घेतलेला असतो व ज्यांतील मंगलोत्पादनाचे कार्यकारणसंबंध सर्वथा लेखकाच्या हातीं असतात, त्यांत शिष्टसंमत नीतितत्त्वें व त्यांच्या आचरणापासून होणारें परिणामात्मक मंगलामंगल यांचा मेळ घालणें केवळ लेखकाच्या तारतम्यावर अवलंबून राहतें व तो त्याजा-

करून जसा घातला जाईल त्या मानानें त्या लेखनाची श्रेष्ठ–कनिष्ठता ठरत असते. ईशसृष्टीतील घडामोडींचे धागेदोरे जरी मानवी बुद्धीला अगम्य असले तरी मानवी सृष्टींतील घटनांचे धागेदोरे मनुष्याच्या हातींच असल्यामुळें, त्यांचे संबंध त्यानें सामान्य नीतितत्त्वांच्या ध्येयानुसारच उलगडले पाहिजेत हें उघड आहे.

४३९ ही गोष्ट ध्यानांत न घेतल्यामुळें केव्हां केव्हां चांगले वाङ्मयलेखकही आपल्या वाङ्मयसृष्टींतील कार्यकारणांची कसोटी ईशसृष्टीची नक्कल करून ठरवितात. परमेश्वरी घटनांचीं गूढ प्रमेयें मानवी दृष्टीच्या आटोक्याबाहेरची असल्यामुळें, एका विनोदी कवीनें म्हटल्याप्रमाणें " पतिव्रताकू बिपत खडी, छिनाल जा वैकुंठ चढी, उधो शाम तेरी बडी, अंदाधुंद सरकार है " असा प्रकार हमेश त्या सृष्टींत दृष्टीस पडतो, पण तीच अंदाधुंदी ' शब्दसृष्टीच्या ईश्वरा'नेंही आपल्या जगतांत चालविल्यास प्रत्यक्ष व्यवहारापासून काल्पनिक वाङ्मयाचें विशिष्टत्वच मुळीं नाहीसें होऊन त्याची भूमिका कमी दर्जाची होईल व लेखकाच्या मानानें अज्ञ म्हणून गृहीत धरलेल्या वाचक किंवा प्रेक्षक वर्गाची दिशाभूल केल्यासारखें होईल.

४४० कुशल वाङ्मयलेखकाला ज्याप्रमाणें घटनांचा मेळ घालण्यांत तारतम्याची आवश्यकता असते, त्याचप्रमाणें 'सौंदर्य, शिव व सत्य' यांचें तर्कशुद्ध प्रमाण राखण्यांतही तारतम्याची जरूरी असते. एखाद्या वाङ्मयांत ' शिव व सत्य ' हे दोन्ही धर्म चांगले उतरले असूनही जर त्यांत सौंदर्याची छाप प्रमाणाबाहेर पडेल तर ' शिव व सत्य ' यांच्या परिणामाला ती हानिकारक होऊन वाङ्मयाचा कस अकारण कमी होईल. उदाहरणार्थ ' शारदा ' व 'एकच प्याला' हीं दोन नाटकें घेऊं. दोन्ही नाटकांत भिन्न जातींचें सौंदर्य भरपूर आहे, 'शिव व सत्य' हे दोन्ही धर्मही उतरले आहेत, पण शारदा नाटकांतील शिवोत्पादनाची दिशा ईशसृष्टींतील अनुभवाला सोडून ध्येयात्मक केल्यामुळें व ' सौंदर्य ' प्रमाणबद्ध मर्यादेंत राखल्यामुळें तें नाटक अत्यंत परिणामकारक झालें आहे; उलट पक्षीं ' एकच प्याला' नाटकांतील मंगलोत्पादनाची कल्पना ध्येयात्मक न ठेवतां सत्य सृष्टींतल्या धोरणानुसार ठेवली असल्यामुळें व त्यांतील सौंदर्य प्रमाणाबाहेर बेसुमार वाढविल्यामुळें त्याची परिणामजनकता कमी झाली आहे. ' सुधाकर ' कितीही अट्टल दारूबाज असला, व दारूबाजाच्या कुटुंबाचा शेवट नाटकांत दाखविल्याप्रमाणें शोकजनक होतो हें जरी निष्ठुर सत्य असलें, तरी सुद्धां 'सिंधू'सारख्या सतीच्या

पुण्याईनें नाट्यसृष्टींतल्या 'सुधाकरा'चें व्यसन सुटून, तद्द्वाराच नाटकाचें उद्दिष्ट मंगल जें मद्यपाननिषेध तें नाटककारानें साधावयास पाहिजे होतें एक, किंवा 'सुधाकरा' शेजारीं 'सिंधू' इतकें उठावदार पात्र घ्यावयास नको होतें एक, असाच मनाचा ग्रह झाल्यावांचून राहत नाहीं. 'सुधाकरा' सारख्या दुर्वृत्त पात्राबरोबर 'सिंधू' सारख्या अत्युच्च पात्राची साथ दिल्यावर चांगल्या वाईटांचा जो विरोध उत्पन्न झाला त्यांत अखेर छाप कोणाची पडावी याचें कोडें सोडविण्यांत लेखकानें पाश्चात्य संस्कृतीच्या वळणावर जाऊन सत्यसृष्टीचें धोरण पत्करल्यामुळें त्यानें नाटकाचा शेवट शोकजनक केला आहे. पण त्या गोष्टीचा परिणाम विपरीत होऊन प्रेक्षकांच्या व वाचकांच्या मनावर 'सिंधू'च्या सतीत्वाची छापच इतक्या जोरानें उमटते की तिच्या उमाळ्यांत तिच्या अनिष्ट शेवटासंबंधीं जी सहानुभूति उत्पन्न होते, तिजपुढें, या अनर्थाचें मूळ जें मद्यपान व 'तळीराम' त्यांची अनिष्टता फिकी पडते, व मंगलोत्पादन व सत्यदर्शन हे दोन्ही धर्म गौण होतात. तेंच 'शारदा' नाटकांत सौंदर्याचा व मंगलाचा प्रमाणबद्ध मिलाफ केल्यामुळें, व मंगलोत्पादनाची दिशा तर्कशुद्ध राखल्यामुळें नाटकाचा परिणाम उठावदार झाला आहे. दोन्ही नाटकें चांगलीच लोकप्रिय झाली, पण 'शारदा' नाटकाच्या लोकप्रियतेचें मूळ घटनांच्या तर्कशुद्ध कल्पकतेंत असून त्यानें समाजाच्या आचारांत इष्ट क्रान्ति घडविली व 'जरठकुमारीविवाहा'चें जवळ जवळ उच्चाटन केलें; उलट 'एकच प्याला' नाटकाच्या लोकप्रियतेचें मूळ त्याच्या सौंदर्यांत असून त्याच्या घटनेंतील योजकता-दोषामुळें त्यानें एकाही दारूबाजाचें व्यसन सोडविलें नाहीं किंवा सोडवावयाची बिनतोड अशी एखादी दिशाही दाखविली नाहीं !

६४१ तथापि 'सत्य, शिव व सौंदर्य' ह्या तिन्ही धर्मांच्या समुच्चयाचें उत्कट समानाधिकरण ज्यांत साधलें आहे व प्रमाणबद्ध मिश्रण झालें आहे असें वाङ्मय फारच विरळ निपजतें हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. ' सत्य ' व ' शिव ' हे बऱ्याच अंशीं भावनांचे धर्म असल्यामुळें त्यांच्या अंगोपांगांच्या छटा पुष्कळ वेळां वादविषय होऊं शकतात. अशा स्थितीत एखाद्या समाजाच्या संस्कृतिपरंपरेला अनुसरून, अधिकारी वाणीनें ' सत्य व शिव ' यांचें यथार्थरूप दाखवून व त्यांचें ' सौंदर्या'शी बेमालूम मिश्रण करून समाजापुढें वाङ्मयाचे नमुनेदार आदर्श ठेवणारे ' व्यास वाल्मीकि ' किंवा ' ज्ञानेश्वर ' युगांतून एखादेवेळींच संभवतात. आदिकवींच्या पश्चात् कालिदासासारखे कविकुल-मुकुटमणि आर्यावर्तांत होऊन

गेले तरी शिवाजीच्या कर्तृत्वाला स्फूर्ति रामायणमहाभारतांतील कथांच्या श्रवणानेंच झाली हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें 'अहल्या-द्रौपदी' सारख्या दिव्य स्त्रियांशेजारीं बसविण्याइतक्या योग्यतेची गडकऱ्यांची 'सिंधू' ही निर्विवाद आहे, तरी देखील पंचकन्यांची संख्या आहे तीच कायम राहणार; त्यांच्या विधात्यांनीं त्यांच्या दिव्यपणांत जादूची तशी फूकच मारून ठेवली आहे!

४४२ ही 'सत्य-शिव-सौंदर्याच्या मनोहर मिलाफाची परमावधीची कल्पना झाली. इतक्या उच्च दर्जाचें वाङ्मय समाजास चिरंतन मार्गदर्शक व प्रेरक असतें हे खरें, पण तें समाजाच्या सामान्य कक्षेबाहेरचें असल्यामुळें त्याच्या नित्य निर्वाहाला झेपत नाहीं हेंही तितकेंच खरें आहे. सूर्यचंद्र हे विश्वाचे शाश्वत दीप खरे, पण सामान्य व्यवहारांत उपयोगीं पडणारे दिवे ज्याप्रमाणें 'स्नेह-सूत्र-वन्ही' च्या मिलाफानें निर्माण करावे लागतात, किंवा ज्याप्रमाणें एंजिन हें अग्नि-रथ-परंपरेचें खरें प्रेरक असूनही प्रवाशांचा निर्वाह साध्या डब्यांतूनच होत असतो, त्याप्रमाणें असलें उच्च वाङ्मय हें नेहमी क्षितिजाच्या संधिसीमेसारखें समाजाच्या आवाक्याबाहेरच राहतें व त्याचा निर्वाह नेहमीं मध्यम प्रतीच्या म्हणजे कलम ४३५ मध्यें सांगितलेल्या दुसऱ्या प्रकारच्या वाङ्मयानें होत असतो. या प्रकारच्या वाङ्मयांत 'शिव' व 'सत्य' यांचें एखादें बेताचेंच अंग किंवा उपांग ( Central idea ) समाजाच्या नित्योपयोगाच्या धोरणानें निवडून त्याला 'सौंदर्या'ची विशेष उठावानें जोड देऊन तें समाजाच्या दृष्टीपुढें ठेवलेलें असतें. अर्थात् असल्या वाङ्मयाचे घटक उठावदार 'सौंदर्य' व मर्यादित 'शिव' आणि 'सत्य' हे असतात, व त्या धोरणानुसार या धर्मांचा मिलाफ जसा वठला असेल तशी वाङ्मयाची कसोटी लागून तें उच्चनीच ठरतें. वरचाच दृष्टांत पुढें चालवून बोलावयाचें झाल्यास असल्या वाङ्मयांत कांहीं विजेच्या किंवा किटसनच्या बत्त्या किंवा फर्स्ट क्लासाचे डबे असतात. कांहीं शृंगारलेले दिवे किंवा सेकंड क्लासाचे डबे असतात, आणि कांहीं राकेलचीं ठावकीं किंवा थर्डक्लासचे डबे असतात! ज्या वाङ्मयांत मर्यादित 'शिव व सत्य' आणि 'सौंदर्य' यांचें बांधेसूद मिश्रण झालें असेल तें उत्कृष्ट वाङ्मय, ज्यांत 'शिव आणि सत्य' यांच्याहून 'सौंदर्या'ची छाप अधिक पडते तें मध्यम वाङ्मय, आणि ज्यांत 'शिव व सत्य' असत्प्राय किंवा विकृत आहेत आणि फक्त भडक सौंदर्यच आहे तें निकृष्ट वाङ्मय होय.

४४३ 'सत्य, शिव व सौंदर्य' यांच्या स्वरूपाचें किंवा मिश्रणाचें बिनतोड असें एखादें प्रमाण सांगणें अशक्य आहे, कारण त्यांच्या लक्षणांत क्षेत्रकाल-

परिस्थितींच्या भेदानुसार नेहमीं फरक पडत असतो. साधी व अनलंकृत वाक्य-रचना, मर्यादित अर्थाची शब्दयोजना व सत्यवृत्तकथन हा इतिहासांत सौंदर्य-धर्म मानला जाईल तर तोच काव्याची सौंदर्यहानि करणारा दोष होईल. त्याच-प्रमाणें 'दासबोधां'त साहित्याचे गुणधर्म सांगतांना समर्थांनीं विनोदाच्या भोक्त्याला 'टवाळ' ठरवून स्त्रीजातीचे हावभाव वर्णन करणाराला 'मूर्खाच्या' कोटींत ढकललें आहे! अर्थात् तें विशिष्ट कालाला व परिस्थितीला अनुसरून केलेलें विधान असल्यामुळें त्या विशिष्ट परिस्थितीपुरतेंच ग्राह्य होय हें उघड आहे. सारांश, उपरोक्त तिन्ही धर्मांचें लक्षण हें बहुधा रसिकांनीं आपल्या सराईत बुद्धीच्या तारतम्याचा उपयोग करून ठरवावयाचें असतें व त्याच्या मिश्रणाचें प्रमाण सदभिरुचीच्या स्फूर्तीनें कसास लावायाचें असतें. सराईत अभिरुचीनें केलेल्या वाङ्मयाच्या निरीक्षणांत चटकन दिसून येणाऱ्या प्रमाणबद्धतेला 'औचित्य' असें मोघम नांव आहे, व या औचित्याच्याच गमकानें बहुधा मध्यम प्रतीच्या वाङ्मयाची कसोटी ठरविली जाते.

**४४४** सौंदर्याचे 'सहज' व 'कृत्रिम' असे दोन प्रकार असतात. सरळ व अनलंकृत रचनेंत माधुर्य-प्रसादादि गुणांना आपोआप उत्पन्न झालेलें किंवा उत्कृष्ट कल्पनांच्या भरारीनें निर्माण झालेलें, तें सहज सौंदर्य होय. उलट अलं-कारादिकांच्या भाषाशैलीच्या साधनांच्या आणि इतर साहित्योपकरणांच्या उप-योगानें थाटविलेलें जें सौंदर्य तें 'कृत्रिम' सौंदर्य होय. पहिलें सौंदर्य विशेष टिकाऊ व दुसरें विशेष चमत्कृतिजनक असतें. दोघांमुळेंही वाङ्मयास शोभा येते. सौंदर्यादि धर्माची हानि एखाद्या रचनादोषानें झाली म्हणजे औचित्यदृष्ट्या कशी चटकन ओळखावी, याची कल्पना येण्याकरितां कांहीं रचनादोषांचे मासले पुढें दिले आहेत.

१ विषयाला, कालाला किंवा परिस्थितीला अनुचित भाषा वापरणें. जसें:— (क) हलक्या पात्राला भारदस्त किंवा भारदस्त पात्राला हलकी भाषा इ. (ख) रामावतारांतील नाटकांत कृष्णाला उद्देशून नांदी. (ग) दुःखाच्या ऐन भरांत सुखदर्शक भाषा बोलणें इ.

२ विषयाचा, कालाचा व परिस्थितीचा विपर्यास करणारी भाषा योजणें. जसें:—तर्कशास्त्राच्या प्रमाणांत अतिशयोक्ति, उन्हाळ्यांत पावसाळ्याचें वर्णन, देशाच्या मध्यभागीं समुद्राचा निर्देश इ.

३ आपल्या तत्त्वज्ञानाला, संस्कृतीला व परंपरेला बाधक अशा कल्पनांचा उपयोग करणें. जसें:—'स्त्रियांनीं विवाह करूं नये,' 'शिवाजी, राम, कृष्ण इत्यादि पुरुष हिंसक होते,' 'देशोन्नतीला धर्माची गरज नाहीं' इत्यादि विधानें.

४ भाषेच्या सजावटीसाठीं उपयोगांत आणलेल्या साधनांत रचनादोष, लिंग-विपर्यास, अव्याप्ति अतिव्याप्ति सारखे अर्थदोष, वगैरे राहूं देणें, जसें:—

(क) आकाशांत ज्याप्रमाणें चांदणी चमकावी त्याप्रमाणें ती चालूं लागली. (रचना–दोष).

(ख) यज्ञदत्त लक्ष्मीसारखा सुंदर दिसला. (लिंगविपर्यास)

(ग) 'ब्राह्मण जेवायला सांग' असें म्हणण्याऐवजीं 'शेंडीवाल्याला जेवायला सांग' असें म्हणणें. (अव्याप्ति)

(घ) 'ब्राह्मण जेवायला सांग' असें म्हणण्याऐवजीं 'मनुष्य जेवायला सांग असें म्हणणें. (अतिव्याप्ति)

**टीप**:–उद्दिष्टार्थ दाखवावयास अपुऱ्या पडणाऱ्या शब्दांच्या किंवा कल्पनेच्या प्रयोगाला 'अव्याप्ति;' व उद्दिष्टार्थाहून व्यापक अर्थाच्या शब्दाच्या किंवा कल्पनेच्या प्रयोगाला 'अतिव्याप्ति' असें म्हणतात. पहिल्या उदाहरणांत 'शेंडीवाला' शब्द अर्थाला अपुरा पडतो, व दुसऱ्या उदाहरणांत 'मनुष्य' हा मोघम शब्द फार व्यापक होतो.

५ रसांत किंवा सौंदर्यादि धर्मांच्या ओघांत खंड पडूं देणें, किंवा प्रतिकूल रसाचें मिश्रण करणें. जसें:—

**(१) तूं जेंवि देवकीला भेटसि तैसाचि भेट आतेला ॥**
**आम्हांहुनि तूंचि अधिक, घृत सोडुनि कोण करिल आ तेला ॥ १ ॥** (सौंदर्यहानि)

६ तर्कव्याकरणादि शास्त्रें व कलादिकांच्या नियमांना सोडून विधानें करणें जसें:—'हिंदूंनीं पागोटें घालण्याचें सोडलें म्हणून त्यांचें राज्य गेलें.' 'काव्यें म्हणजे रंडागीतें होत' इत्यादि.

**४४५** हे व इतर असले दोष वाङ्मयाचा कस उतरविण्यास कारण होतात. आतां हें खरें आहे कीं, 'सौंदर्य, सत्य व शिव' यांचा प्रकर्ष ज्यांच्या लिखाणांतून

सररास आढळतो, अशा शेक्सपियर मोरोपंतासारख्यांनींही ते प्रसंगोपात् केलेले आढळतात; तरी देखील त्यांचें दोषरूपत्व कमी होऊं शकत नाहीं. हें जाणून होतकरू वाङ्मयोपासकानें वर सांगितलेले दोष टाळून व भाषेच्या कसोटीसंबंधी केलेल्या सूचना लक्ष्यांत ठऊन आपल्या वाङ्मयाची सजावट व इतरांच्या वाङ्मयाचें निरीक्षण करावें हें उचित होय.

## अभ्यासपाठ १ ला.

" हरीभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्यांना वाङ्मयांत कोणतें स्थान आहे ? " हरीभाऊंच्या कादंबऱ्यांपैकीं बहुतेक ऐतिहासिक व सामाजिक आहेत; अर्थात् त्या दुसऱ्या प्रकारच्या वाङ्मयांत मोडतात ( कलम ४३५—२ ). त्यांच्या कादंबऱ्यांनीं सामाजिक सुधारणेचें आगरकरांसारख्यांनाही न साधलेलें कार्य बरेंच केलें, अर्थात् त्यांत मंगल व सत्य हे धर्म उतरले आहेत. तें कार्य करितांना त्यांनीं सौंदर्याचा उत्कर्षही साधला असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या परिणामकारक झाल्या आहेत. शिवाय सौंदर्याचें प्रमाण त्यांनीं इतर दोन्ही धर्मांशीं सुसंगत ठेवल्यामुळें व त्यांची भाषाशैलीही बहुधा निर्दोष असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांना वाङ्मयांत उच्च प्रतीचें स्थान मिळालें आहे. ( कलम ४४२ ).

## अभ्यासपाठ २ रा.

" गोविंदाग्रज व मोरोपंत यांची वाङ्मयलेखक या नात्यानें तुलना करा. " गोविंदाग्रजांचें वाङ्मय काव्य, नाटकें व विनोदी लेख अशा भिन्न स्वरूपाचें आहे तर मोरोपंतांचें केवळ काव्यात्मक आहे. अर्थात् गोविंदाग्रजांच्या वाङ्मयांत वैचित्र्य आहे. गोविंदाग्रजांच्या वाङ्मयाचा हेतु समाजचित्र रेखाटून त्यांतील व्यंगें काढून टाकण्याचा व समाजापुढें ध्येयात्मक आदर्श ठेवण्याचा, असा द्विविध आहे, तर मोरोपंतांचा फक्त समाजापुढें ध्येयात्मक आदर्श ठेवण्याचाच आहे. गोविंदाग्रजांनीं वाङ्मयसृष्टि स्वतःची निर्माण केली आहे तर मोरोपंतांनीं व्यासवाल्मीकींच्या सृष्टींतील मंडळी उसनी घेतली आहेत. मोरोपंतांचें वाङ्मय आर्यसंस्कृतीच्या परंपरेला अनुसरून निर्माण झालें असल्यानें व तें प्रायः अनुकरणात्मक असल्यामुळें मंगलोत्पादकतेचा व सत्यदिग्दर्शनाचा धर्म त्यांच्या वाङ्मयांत उत्कर्षानें उतरला आहे, तर गोविंदाग्रजांच्या वाङ्मयावर पाश्चात्य संस्कृतीची छाप अधिक पडल्यामुळें त्यांच्या वाङ्मयांत त्या दोन्ही धर्मांचा कस पुष्कळदां कमी झाला आहे. मोरोपंतांच्या वाङ्मयांत सौंदर्याचें मिश्रण बहुधा प्रमाणबद्ध आहे पण

कित्येक वेळां ते यमकादि क्षुद्र सौंदर्याच्या नादानें अर्थाची हानी होऊं देतात. उलट गडकऱ्यांच्या वाङ्मयांत सौंदर्याचें प्रमाण बहुधा बेसुमार असतें व त्यामुळें बाकीच्या दोन्ही धर्मांचा गुण कमी होतो. मोरोपंतांच्या सौंदर्याचें लक्षण बहुधा रसालंकारात्मक आहे, तर गडकऱ्यांचें सौंदर्य बहारीच्या कल्पनांत आहे. मोरोपंतांची भाषाशैली संस्कृतशब्दप्रचुर म्हणून क्वचित् क्लिष्ट भासते, तर गडकऱ्यांची भाषाशैली पर्शियन-शब्द-प्रचुर म्हणून बरीच कृत्रिम वाटते. एकंदरींत दोघांचेंही वाङ्मय उच्च दर्जाचें आहे.

## अभ्यास पाठ ३ रा.

"भावनात्मक काव्यास वाङ्मयांत कोणतें स्थान मिळेल?" भावना-गीतांचा हेतु एखाद्या विषयासंबंधी श्रोत्यांची भावना जागृत करणें हा असतो; अर्थात् सत्य व शिव यांच्या अधिष्ठानाला त्यांत जागा राहील व तें दुसऱ्या प्रकारच्या उच्च वाङ्मयांत मोडेल ( कलम ४३५ ). पण भावनेचा विषय जर नुसता सौंदर्यात्मकच निवडला तर तें तिसऱ्या प्रकारच्या म्हणजे कनिष्ठ वाङ्मयांत मोडेल ( कलम ४४२ ). गोविंदाग्रजांचें "राजहंस माझा निजला" हें या प्रकाराचें उत्कृष्ट उदाहरण आहे. त्या गीतांतील उत्कट रसामुळें, मनोहर कल्पनांमुळें व गोड भाषेमुळें तें गीत नितान्त रमणीय काव्य झालें आहे, पण मंगलोत्पादनाचा धर्म त्यांत कुठेंच आला नसल्यामुळें त्याची गणना कनिष्ठ प्रतीच्या वाङ्मयांतच करणें भाग आहे.

## अभ्यासपाठ ४ था.

"सौभद्र नाटकाचें वाङ्मयदृष्ट्या परीक्षण करा." सौभद्र नाटक पौराणिक म्हणजे एका अर्थी ऐतिहासिक आहे व त्यांतलि मध्यवर्ती कल्पना कृष्णार्जुनांच्या एका लीलेसंबंधी निवडली आहे. अर्थात् मनोरंजन म्हणजे सौंदर्योत्पत्ति हा त्यांत प्रधान हेतु असून कृष्णार्जुनांच्या लीलांची उजळणी म्हणजे पौराणिक आदर्शांच्या चरित्राचें स्मरण या रूपानें 'सत्य व शिव' यांचें दिग्दर्शन हा त्यांत गौण हेतु आहे. नाटकाची रचना बांधेसूद झाली असून सौंदर्यही स्वाभाविक व प्रमाणबद्ध साधलें आहे. सबब हें नाटक दुसऱ्या प्रतीच्या म्हणजे उच्च वाङ्मयांत मोडेल.

## अभ्यासपाठ ५ वा.

शेक्सपियरच्या नाटकांचीं मराठी भाषांतरें झालीं आहेत त्यांवरून त्याच्या वाङ्मयांत आढळणारे विशेष कोणते असें तुम्हांस वाटतें? शेक्सपियर हा ख्रिश्चन

म्हणजे द्वैतवादी संस्कृतीचा असल्यामुळें त्याच्या तत्त्वज्ञानाची दिशा इकडील तत्त्वज्ञानाच्या दिशेहून भिन्न आहे. अर्थात् ईशसृष्टींतील विरोधी घटनांचे कार्य-कारणसंबंध लावतांना त्यानें पाश्चात्य तत्त्वज्ञानाची विचारपद्धति स्वीकारावयास पाहिजे होती. पण तसें करण्यांत सामान्य नीतितत्त्वांच्या आचरणांत व त्यास मिळणाऱ्या फलांत त्याला जो पात्र-वैचित्र्यामुळें केव्हांना केव्हां तरी विसंवाद दाखवावाच लागला असता, तो त्यानें अत्यंत कुशलतेनें टाळला आहे. एवढेंच नव्हे, तर त्याच्या नाटकांतून जीं भिन्न भिन्न स्वभावाचीं शेंकडों पात्रें त्यानें मार्मिकपणानें रेखाटलीं आहेत त्यांची अखेर विल्हेवाट लावतांना त्यानें नीतीचा कांटा अत्यंत कसोशीनें उपयोगांत आणला आहे. एखाद्या प्रमुख पात्रांत केवढेंही व्यंग किंवा दोष असला, तरी त्याच्या वागणुकींत जर नीतीच्या मर्यादेचें लवमात्र उल्लंघन झालें नसेल तरच त्यानें तें नाटक सुखपर्यवसायी केलें आहे, एरवीं नाहीं. उदाहरणार्थ 'त्राटिका' (Taming of the shrew) व 'मोहनतारा' (Romeo and Juliet) हीं नाटकें घेऊं. 'त्राटिका' नाटकांतील नायक व नायिका हीं दोघेंही खोडकर पात्रें असूनही त्यांच्या हातून नीतीचें उल्लंघन कोठेंही न झाल्यामुळें त्यानें तें नाटक आनंदपर्यवसायी केलं आहे. तेंच 'मोहनतारा' नाटकांतील नायकनायिकांचें दंपत्य प्रेमळ व सुस्वभावी दाखविलें असूनही त्या दोघांचा विवाहापूर्वी प्रेमसंबंध झाला एवढ्या पाश्चात्य समाजांत दोषरूप मानल्या न जाणाऱ्या व्यंगामुळें तें नाटक त्यानें शोकपर्यवसायी केलें आहे. उत्कृष्ट कल्पना, पात्रांची विविधता व त्यांतून दिसून येणारें स्वभाव-वैचित्र्य, सौंदर्याचें शिव व सत्य यांशी प्रमाणबद्ध साहचर्य, व नीतीच्या तत्त्वानुसार फलभोग देण्याची निष्ठुर तत्परता हे त्याच्या वाङ्मयाचे विशेष होत.

### अभ्यासपाठ ६ वा.

" पुढील वाक्यांत कोणते दोष आहेत ?

**१ सबळ जनक माझा राम लावण्यपेटी ॥** ( रामदास )

**२ सकलहि दिशा झाले ल्याया तुझ्या तनुला झगे ॥**(सीताशर्ती)

**३ तुकोबा सदेह स्वर्गास गेले ही एक निवळ थाप आहे.**

( महाराष्ट्र सारस्वत )

१ पहिल्या वाक्यांत रूपकालंकारासाठीं जें 'पेटीचें' उपमान योजिलें आहे तें अगदींच किरकोळ असल्यानें 'अव्याप्ती' चा दोष झाला आहे ( कलम ४४४–४ घ, टीप ).

२ दुसऱ्या वाक्यांत 'अनुचित भाषाप्रयोगा'चा दोष झाला आहे. सीतादेवी-सारख्या पुराण साध्वीच्या वस्त्रसमुदायांत 'झगा' या हिंदी शब्दाचा व तज्जन्य पाश्चात्य कल्पनेचा प्रवेश विपरीत आहे (कलम ४४४–१).

३ तिसऱ्या वाक्यांत औचित्यभंगाचा दोष झाला आहे. वंद्य विभूतींविषयीं ज्या समजुती प्रचलित आहेत त्यांच्यासंबंधीं असे सडेतोड रुक्ष उद्गार काढणें उचित नाहीं. (कलम ४४४–३)

## अभ्यासपाठ ७ वा.

"अलीकडील नाटकांची दिशा कोणत्या रोखानें चालली आहे?" अलीकडील नाटकांचें ध्येय मनोरंजन हेंच मुख्यतः ठेवलेलें आढळतें. अर्थात् सौंदर्याचा धर्म त्यांत उतरविण्याची लेखकांची खटपट असलेली आढळून येते. तें सौंदर्यहि बहुधा कृत्रिम विनोदानें किंवा असद्भिरुचीला आवडणाऱ्या भाषाशैलीनें उत्पन्न केलेलें असतें. अर्थात् हीं नाटकें अधोगतीच्या दिशेनें जात आहेत.

## अभ्यासपाठ ८ वा.

"काव्याचें स्थान वाङ्मयांत कोणतें? व उत्कृष्ट काव्याची कसोटी तुम्ही काय ठरवाल?' काव्य हा उल्लसित मनोवृत्तीचा धर्म असल्यामुळें (कलम ३८९) तें विकारात्मक असण्याचाच संभव अधिक, व विकाराचा गढूळ लोट निघून गेल्यावर देखील निघणारे काव्याचे साद विकारजन्य रसात्मकच असणार (कलम ३९२). तथापि तशा मनःस्थितींतही काव्यांत 'शिव व सत्य' यांच्या ध्येयानुसारच बोल निघत असल्यामुळें काव्य हें उच्च कोटींतलें वाङ्मय आहे. काव्याची संवेदना जर ज्ञानेश्वरांच्या मताप्रमाणें 'पर–तत्त्व–स्पर्श' रूप असेल तर त्या काव्याला वाङ्मयांत पहिल्या प्रतीचें स्थान मिळतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे काव्याचें तत्त्वज्ञान 'शिव–सत्यात्मक' व काव्याचा प्रवाह 'सौंदर्यात्मक' असतो. अर्थात् 'सौंदर्य' हीच उत्कृष्ट काव्याची मुख्य कसोटी असते, व शिव आणि सत्य हे धर्म त्यांत व्यंग्य अतएव सौंदर्य रूपानेंच राहतात. नुसतेंच सौंदर्यात्मक काव्य कनिष्ठ वर्गांत मोडेल, पण त्यांत देखील सौंदर्य जर चांगलें साधलें असेल तर तें काव्य चांगलेंच म्हटलें पाहिजे. 'सत्य, शिव व सौंदर्य' हे तिन्ही धर्म काव्यांत सौंदर्यात्मक उतरतात हा चांगल्या काव्याचा विशेष होय व तसल्या काव्याला पहिल्या प्रतीच्या वाङ्मयांत पहिल्या प्रतीचें स्थान मिळतें.

---

# महाराष्ट्र साहित्यसुधा.



## पाठ ३९ वा.



### ज्ञानेश्वर.



### १ राजस सुख.

अधिकारिया रिगतां गावों । जाला जैसा उत्स
कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ॥ १ ॥
नाना रोगिं जीभेपासिं । केलें गोडें होंति सारवरस।
कां वत्सनागा जैसी । महुललै ते ॥ २ ॥
पहिलें संवचोरा मैत्र । भेटहाटिचें कलत्र ।
कां लाघविचे विचित्र । विनोद ते ॥ ३ ॥
पैं नावें विष महुरें । परि मारूनि अतिखरें ।
तैसें आदि जें गोडिरें । अंतीं कडू ॥ ४ ॥
पार्था तें सुख साचें । वलिलें आहे रजाचें ।
म्हणौनि न सीवं तेयाचें । आंग कहीं ॥ ५ ॥

### २ नैष्कर्म्य-सिद्धि.

मग आलिंगिला पूर्णिमां । उणीव सांडी चंद्रमा ।
तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तेया ॥ १ ॥
मुखाभासें आरिसा । परौता नेलेयां वीरेषा ।
पांतेपणें विण जैसा । पांत ठाके ॥ २ ॥

देउलिचिया कामा कलशु । परमु गंगे सिंधुप्रवेशु ।
कां सुवर्णशुद्धि कसु । सोलांवां जैसा ॥ ३ ॥

तैसें आपुलें नेणणें । फेडिजे कां जाणणें ।
तें हिं गीळूनि जें असणें । ऐसी जे दृशा ॥ ४ ॥

तिये परौतें काहिं । निफजणें एथ नाहीं ।
म्हणौनि म्हणिपे पाहिं । परम सिद्धि ते ॥ ५ ॥

## ३ भगवद्गीतेंतले श्लोक.

ऐसेयां सें सात श्लोकां । परि आगला एकु एका ।
आतां कोणु वेगलिका । वानावा पां ॥ १ ॥

दीपा आदीलु मागीलु । सूर्यासि धाकुटा वडीलु ।
अमृत-सिंधु खोलु । उतलु काइसा ॥ २ ॥

तानी आणि पारिठी । इया कामधेनूतें दीठी ।
सूनि जैसिया गोठी । कीजती ना ॥ ३ ॥

तैसे पहिले आणि सरते । श्लोक न म्हणावे गीते ।
जूनि नवि पारिजातें । असाति काई ॥ ४ ॥

तैसें हें गीतेचें दुभतें । वत्स करूनि पार्थातें ।
दुभिनली पुरतें । श्रीकृष्णु गाए ॥ ५ ॥

## ४ भववृक्ष सव्यय असून अव्यय कसा ?

जैसा मेघांचेनि तोडें । सिंधु एकें आंगें घडे ।
आणि नदी एरीकडे । भरतीचि असती ॥ १ ॥

यऱ्हवि दानसीलु पुरुषु । वेचकपणें संचकु ।
तैसा व्ययेंचि हा रुंखु । अव्ययो हा ॥ २ ॥

जांतां वेगें बहुवसें । न वचे कां भुइं रुतलें असे ॥
तें रथाचें चक्र दीसे । जियापरी ॥ ३ ॥

परि भिंगोरि निधिये पडिली । गमे भूमीसि जडली ।
ऐसा वेगातिसो भुली । हेतु होए ॥ ४ ॥

तैसें यया रुखाचें होणें जाणें। तर्के होंतेनि वहिलेपणें।
म्हणौनि लोकु ययातें म्हणे। अव्ययो हा ॥ ५ ॥

## ५ सद्गुरूंचा अवर्णनीय मोठेपणा.

जय जय आचार्या। समस्त सुरवर्या।
प्रज्ञाप्रभातसूर्या। सुखोदया ॥ १ ॥
रविचंद्रादिशूक्ति। उदो करितां त्रीजगती।
तें तूझिया दीप्ती। तेज तेजां ॥ २ ॥
चलबालिजे अनिलें। तें देविकेनि जी बळें।
नभ तुज माजि खेले। लपीं थपीं ॥ ३ ॥
वेद जें वानूनि चांग। जवं न दीसे तूझें आंग।
मग आम्हां तेया मूग। एकी पांती ॥ ४ ॥
आणि दूजेया थाउ मोडे। जेथ परेसिं वैखरी बुडे।
तो तूं मां कवणें तोंडें। वानावासि ॥ ५ ॥

## ६ देहाचें रूप.

हें तवं पांचांचें जालें। कर्माचा गुणिं गुंतलें।
भवंतसे चाकिं सूदलें। जन्ममृत्युचा ॥ १ ॥
हे कालानलाच्या कुंडीं। घातली लोणियांची उंडी।
मासी पांख पाखडी। तवं हे सरे ॥ २ ॥
हें विपाएं आगी पडे। तरि भस्म होनि उडे।
जालें श्वाना वारिपडें। तरि तेंचि विष्ठा ॥ ३ ॥
यां चूके दोन्ही काजां। तरि होये क्रिमिचा पुंजा।
ऐसा परिणामु कपिध्वजा। कश्मलु गा ॥ ४ ॥
उजियडा आंधारेया। जो पाडु मृता उभेया।
तोचि गा आत्मेयां। देहा जाण ॥ ५ ॥

## ७ आत्म्याचें रूप.

या देहाची हे दशा। आणि आत्मा तो ऐसा।
पैं सिद्ध नित्यु आपैसा। अनादिपणें ॥ १ ॥

सकलु ना निष्कलु । अक्रियु ना क्रियाशीलु ।
कृशु ना स्थूलु । निर्गुणपणें ॥ २ ॥

आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु ।
अल्पु ना बहुवसु । अरूपपणें ॥ ३ ॥

रीता ना भरितु । रहितु ना सहितु ।
मूर्तु ना अमूर्तु । शून्यपणें ॥ ४ ॥

एतुला ना तेतुला । आयिता ना रचला ।
बोलता ना उगला । अलक्षपणें ॥ ५ ॥

## ८ अडाणी भक्तीचा मासला.

माझी मूर्ति आपजवी । ते घराचां कोनिं बैसवी ।
आणि देवादेवीं । यात्रे जाए ॥ १ ॥

एकादसिचां दिसिं । जेतुला पाडु आमासिं ।
तेतुलाचि नागांसि । पंचमीसि ॥ २ ॥

चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होए ।
चाउदसिं म्हणे माए । तूझाचि वो दुर्गे ॥ ३ ॥

नवमीतें मांडी । आणि बैसे नवचंडी ।
आदित्यवारीं वाढी । भैरवां भरीं ॥ ४ ॥

पाठिं सोमवारु पावे । आणि बेलेंसि लिंगा धांवे ।
ऐसें एकलाचि आघवें । जोगावी जो ॥ ५ ॥

## ९ अर्जुनास दाखविलेलें विश्वरूप.

आणि तिये विश्वरूपिं येकिकडे । जग आघवें आपुलेनि पवाडें ।
जैसे समुद्रामाझि बुडडे । साने दिसती ॥ १ ॥

कां आकाशीं गंधर्वनगर । भूतलिं पिपीलिका बांधलें घर ।
नातरि मेरूवरि सपूर । परमाणु बैसले ॥ २ ॥

जी भूतल भूरुहिं मांडलें । जैसें नक्षत्रीं गगन गूढलें ।
तैसें मूर्तिमय भरलें तूझें देखतसें रूप ॥ ३ ॥

एथ अग्निची दीठि करपत । सूर्यु कोडि एक हारपत ।
एसणें तीव्रपण अद्भुत । तेजाचें येया ॥ ४ ॥

हों काज प्रकाशाचां महार्णवीं । बुडौनि गेली सृष्टि आघवी ।
किं युगांतविद्यूचां पालवीं । झाकोललें गगन ॥ ५ ॥

## १० मनुष्यांची उलटी रीति.

जेयाचें आयुष्य धाकुटें होए । बल प्रज्ञा जीरौनि जाए ।
तेयाचे नमस्कारिजती पाए । वडील म्हणौनि ॥ १ ॥

जवं जवं श्वान बालिया वाढे । तवं तवं भोजें नाचति कोडें ।
आयुष्य निमालें आंतुलीकडे । ते ग्लानि नाहीं ॥ २ ॥

जन्मलेया दिहें दिवसें । हों लागे कालाचेया ऐसें ।
कीं वाढतीं करिति उल्हासें । उभिति गुढिया ॥ ३ ॥

अगा मर हा बोलु न सांहांति । आणि मेलेयां तरि रडती ।
परि असतें जींत न गणिति । गेसासे पैं ॥ ४ ॥

अहा कटा ! ओखटें । हें मृत्युलोकिचें उपराटें ।
एथ अर्जुना जऱ्हें अवचटें । जन्मलासी ॥ ५ ॥

## ११ पांडवांचा जयनाद.

तणें महाघोषनिर्घातें । शेषकूर्म अवचितें ।
गजबजौनि भारातें । सांडूं पांति ॥ १ ॥

तेथ तीन्ही लोक डंडलत । मेरुमंदार आंदोलत ।
समुद्रजल उसलत । आकाशवेऱ्ही ॥ २ ॥

पृथिवीतल उलंडों पांत । आकाश असे अडदरत ।
तेथ रासौभा होंत । नक्षत्रांचा ॥ ३ ॥

गेली रे सृष्टि गेली । देवां मोकळवांदि जाली ।
ऐसी एकताली पीटली । सत्यलोकीं ॥ ४ ॥

दिहाचि दीनु थोंकला । जैसा प्रलयदीपु माल्हवला ।
तेंथ हाहाकारु उठिला । तिहीं लोकिं ॥ ५ ॥

## १२ परमेश्वरी वाक्यमुक्ताफळांनीं चकविलेला अर्जुन.

जेथ तद्ब्रह्मादि वाक्यफलें । जियें नानार्थ रसरसालें ।
बाहाकांतें आहाति परिमलें । भावांचेनि ॥ १ ॥

झाकरि अनुमानाचेनि करतलें । धेउनि तियें वाक्यफलें ।
प्रतीतिमुखि एकें वेलें । घालूं पाहिलीं ॥ २ ॥

तवं विचाराचिया रसना न दाटति । परि हेतुचां दशनींही
न फुटती ।
ऐसें जाणौनि सुभद्रापाति । चुंबी चि ना ॥ ३ ॥

मग चमत्कारला म्हणे । इयें जलिंचि मा तारागणें ।
कैसा झांषकलों आसलगपणें । अक्षरांचेनी ॥ ४ ॥

इयें पदें नव्हति फुडिया । गगनाचिया चि मां घडिया ।
एथ आमाचिये मती बुडिया । थाउं न निगे ॥ ५ ॥

## १३ साहित्याची परमोच्च कल्पना.

जें साहित्य आणि शांती । हे रेखा दिसे बोलती ।
जैसी लावण्यगुणयुवती । आणि पतिव्रता ॥ १ ॥

आदिं चि साखर आवडे । आणि तेचि जरि ओखदा जोडे ।
तरि न सेवावी कां कोडें । नांवा नांवा ॥ २ ॥

साहाजें मलयानीलु मंदु । तेया ही होये अमृताचा स्वादु ।
आणि तेथ चि जोडे नादु । दैवंगत्या ॥ ३ ॥

तरि स्पर्शें सर्वांग जीववी । स्वादें जीभेतें नाचवी ।
तेवि चि कानाकरवि म्हणवी । बापु माझा ॥ ४ ॥

तैसा मनाचा मारु न करितां । इंद्रिया दुःख नें दितां ।
एथ मोक्षु असे आइकतां । श्रवणांमाझि ॥ ५ ॥

## १४ मायानदीचा प्रचंड पूर.

जिथे ब्रह्माचलाचां आधाडां । पहिलेया संकल्पजलाचेया
उभडा ।
सर्वे चि महाभूतांचा बुडडा । साना आला ॥ १ ॥

जे सृष्टिसंचाराचेनि ओघें । चडतकालकलांचेनि वेघें ।
प्रवृत्तिनिवृत्तीचीं तुंगें । तटें सांडी ॥ २ ॥
जे गुणघनाचेनि वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें ।
घेऊनि जांत नगरें । यमनियमांचीं ॥ ३ ॥
जेथ प्रपंचाचीं वलणें । कर्मा अकर्माचीं ओभाणें ।
वरि तराति ओसाणें । सुखदुःखांचीं ॥ ४ ॥
ते पाणियांचेन वहिलेपणें । आझूं न धरतीचि ओभाणें ।
ऐसा मायापुरु हा कवणें । तरिजैल गा ॥ ५ ॥

## १५ परमेश्वराचे मुद्रांकित.

पाहे पां ध्वजेचें चिरगुट । राया जतन करितां कष्ट ॥
तैसा मी एक पतित । परि तुझा मुद्रांकित ॥
मषीपत्र तें केवढें । रावो चालवी आपुल्या पाडें ॥
बापरखुमादेवीवरदा । सांभाळी आपुल्या ब्रिरिदा ॥ १ ॥

## निवृत्तिनाथ.



## १६ देवभक्तांचा अन्योन्य संबंध.

आम्ही किरण तूं सूर्यो । आम्ही अस्तु तूं उदयो ॥
कैसा देहीं देवो दिवटा । परा पश्यंती चारी वाटा ॥
आम्ही कळा तूं चंद्रमा । तूं अमृत आम्ही गरिमा ॥
आम्ही निधि तूं निधान । आम्ही ध्येय तूं साधन ॥
निवृत्ति उपराति वाहे । हृदयीं कृष्णनाथ ध्याये ॥ १ ॥

## सोपानदेव.



## १७ कडक सोंवळें कशांत आहे?

पृथिवी सोंवळी आकाश सोंवळें । मन हें वोवळें अभक्ताचें ॥
ब्रह्म हें सोंवळें न देखों वोंवळें । असों खेळेमेळें इये जनीं ॥

ब्रह्मांड पंढरी सोंवळी हे खरी । तरसी निर्धारीं एक्या नामें ॥
सोपान अखंड सोंवळा प्रचंड । न बोले वितंड हरिविण ॥ १ ॥

## मुक्ताबाई.

### १८ आत्मानुभवांतील मौजा.

मुंगी उडाली आकाशीं । तिणें गिळिलें सूर्यासी ॥
थोर नवलाव झाला । वांझे पुत्र प्रसवला ॥
विंचू पाताळासी जाय । शेष माथां वंदी पाय ॥
माशी व्याली घार झाली । देखोनि मुक्ताई हांसली ॥ १ ॥

## नामदेव.

### १९ दुर्लभ जोड्या.

सुवर्ण आणि परिमळ । हिरा आणि कोमळ ।
योगी आणि निर्मळ । हें दुर्लभ जी दातारा ॥ १ ॥

देव जरी बोलता । जरी कल्पतरू चालता ।
गज जरी दुभता । हें दुर्लभ जी दातारा ॥ २ ॥

धनवंत आणि दयाळु । व्याघ्र आणि कृपाळु ।
अग्नि आणि सीतळु । हें दुर्लभ जी दातारा ॥ ३ ॥

सुंदर आणि पतिव्रता । सावधान होय श्रोता ।
पुराणिक आणि ज्ञाता । हें दुर्लभ जी दातारा ॥ ४ ॥

क्षत्रिय आणि शूर भला । चंदन फुलीं फुलला ।
स्वरूपीं गुण व्यापिला । हें दुर्लभ जी दातारा ॥ ५ ॥

ऐसा संपूर्ण सर्वगुणी । कोवि पाविजे शारंगपाणी ।
विष्णुदास नामा करी विनवणीं । मुक्ति चरणीं त्याचिया ॥६॥

## गोरोबा कुंभार.

### २० निर्गुणाची मगरमिठी.

निर्गुणाचे भेटी आलों सगुणासंगें। तंव झालों प्रसंगें गुणातीत।
मज रूप नाहीं नांव सांगूं काई। झाला कांहीं बाहीं बोलूं नये॥
बोलतां आपली जिव्हा पैं खादली। खेचरी लागली पाहतां पाहतां॥
म्हणे गोरा कुंभार नाम्या तुझी भेटी। सुखासुखी मिठी पडली
कैसी॥ १॥

## नरहरि सोनार.

### २१ धंदेवाला कसबी सोनार.

देवा तुझा मी सोनार। तुझ्या नामाचा वेव्हार॥
देह बागेसरी जाणें। अंतरात्मा नाम सोनें॥
त्रिगुणांची करुनि मूस। आंत ओती ब्रह्मरस॥
जीव शिव करुनी फुंकी। रात्रंदिवस ठोकाठोकी॥
विवेक हातवडा घेऊन। कामक्रोध केले चूर्ण॥
मनबुद्धीची कातरी। रामनाम सोनें चोरी॥
ज्ञान ताजवा घेउनि हातीं। दोन्ही अक्षरें जोखिती॥
खांद्या वाहोनी पोतडी। उतरला पैलथडी॥
नरहरि सोनार हरिचा दास। भजन करी रात्रंदिस॥ १॥

## चोखा मेळा.

### २२ वरल्या रंगाची फसवणूक.

ऊंस डोंगा परि रस नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा॥
कमान डोंगी परि तीर नाहीं डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा॥
नदी डोंगी परि जळ नाहीं डोंगें। काय भुललासी वरलिया रंगें॥
चोखा डोंगा परि भाव नाहीं डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा॥१॥

## जनाबाई.



### २३ पंढरपूरचा कैदी.

धरिला पंढरीचा चोर । गळा बांधुनियां दोर ॥
हृदय बंदिखाना केला । आंत विठ्ठल कोंडला ॥
शब्दें केली जडाजुडी । विठ्ठलपायीं घातली बेडी ॥
सोहं शब्दें मार केला । विठो काकुळती आला ॥
जनी म्हणे बा विठ्ठला । जीवें न सोडीं मी तुला ॥ १ ॥

## सेना न्हावी.



### २४ परमार्थांत शिरला तरी न्हावीच.

आम्ही वारिक वारिक । करूं हजामत बारीक ॥
विवेक दर्पण अयना दावूं । वैराग्य चिमटा हालवूं ॥
उदक शांति डोई घालूं । अहंकाराची शेंडी पिळूं ॥
भावार्थाच्या बगला झाडूं । कामक्रोध नखें काढूं ॥
चहूं वर्णां देउनि हात । सेना राहिला निवांत ॥ १ ॥

## कान्होपात्रा.



### २५ भक्ताच्या लाजेची जबाबदारी देवावर.

पतितपावन म्हणविसी आधीं । तरि कां उपाधि भक्तांमागें ॥
तुझें म्हणवितां दुजें अंगसंगा । उणेपणा सांगा कोणाकडे ॥
सिंहाचें भातुकें जंबुक पैं नेतां । थोराचिया माथा लाज वाटे ॥
म्हणे कान्होपात्रा देहसमर्पण । करावें जतन ब्रीदासाठीं ॥ १ ॥

## भानुदास.



### २६ हिरेमाणकांची उतारपेठ.

माणिकांचें तारूं चंद्रभागे आलें । भूषण तें झालें सनकादिकां ॥
पंढरपूर हें निळियांची खाणी । नवलाव साजणी देखियला ॥

अवघिया देशांसी न्यावया पुरलें । आगरीं उरलें जैसें तैसें ॥
भानुदास म्हणे नीळ हा चोखडा । सुजडु हा जडा जीवनमुद्रा ॥१॥

## एकनाथ.

### २७ विटंबना.

राजाला आळस संन्यासा सायास । विधवेसी विलास विटंबना ।
व्याघ्रासि शांतता गाईसी उग्रता । वेश्येसी हरिकथा विटंबना ॥
दानेंविण पाणि घ्राणेंविण घाणी । नामेंविण वाणी विटंबना ॥
एकाजनार्दनीं भावभक्तीविना । पुण्य केलें नाना विटंबना ॥ १ ॥

## मुक्तेश्वर.

### २८ षड्रिपूंची उचित योजना.

काम असावा ईश्वरभजनीं । क्रोध असावा इंद्रियदमनीं ।
तीर्थ-प्रसाद-शेष-ग्रहणीं । लोभ अपार असावा ॥ १ ॥
मोह असावा सज्जनांशीं । मद असावा दुर्जनांशीं ।
मत्सर सदा संसारासी । असावा तो असे कीं ? ॥ २ ॥

### २९ विश्वामित्राचें कृत्रिम तपोवन.

प्रवेश करितां तया वनीं । राया आश्चर्य देखे नयनीं ।
धेनु-व्याघ्र एके स्थानीं । एकमेकां चाटिती ॥ १ ॥
नकुळसर्प क्रीडती सुखें । मार्जारी-स्तना लागती मूषकें ।
सिंहकरी करीत कौतुकें । वनामाजि विचरती ॥ २ ॥
उलूका निरवूनि पिलियांसी । वायस जाती चरावयासी ।
विश्वामित्र-माया ऐसी । सहसा न कळे मानवां ॥ ३ ॥
निर्वैर श्वापदांचे गण । देखोनी विस्मित रायाचें मन ।
पुढें जातां सुगंध जीवन । तडागीं पूर्ण देखिलें ॥ ४ ॥

वनश्री वर्णावी कवणें। उपमे नंदनवन उणें।
नाना वृक्षीं फळें सुमनें। रस सुवासें दाटलीं ॥ ५ ॥

## तुकाराम.

### ३० जातिवंत संत.

हिरा ठेवितां ऐरणीं। वांचे मारितां जो घणीं ॥
तोचि मोल पावे खरा। करणीचा होय चुरा ॥
मोहरा तोचि अंगें। सूत न जळे ज्याच्या संगें ॥
तुका म्हणे तोचि संत। सोशि जगाचे आघात ॥ १ ॥

### ३१ तुम्ही आम्ही एक.

तरुवर बीजापोटीं। बीज तरुवराशेवटीं ॥
तैसें तुम्हां आम्हां जालें। एकीं एक सामावलें ॥
उदकावरील तरंग। तरंग उदकाचें अंग ॥
तुका म्हणे बिंब छाया। ठायीं पावली विलया ॥ १ ॥

### ३२ ध्येयप्राप्तीनंतरचें समाधान.

इच्छावें तें जवळी आलें। काय बोलें कारण ॥
नामरूपीं पडली गांठी। अवघ्या गोठी सरल्या ॥
मुकियाचे परी जीवीं। साखर जेवीं खादली ॥
तुका म्हणे काय बोलें। आतां भलें मौन्याचि ॥ २ ॥

### ३३ ज्ञानाला भक्तीची साथ.

गोड नांवें क्षीर। परि साखरेचा धीर ॥
तैसें जाणा ब्रह्मज्ञान। बापुडें तें भक्तीविण ॥
रुचि नेदी अन्न। त्यांत नसतां लवण ॥
आंधळ्यांचे श्रम। सिकविल्याचेंचि नाम ॥
तुका म्हणे वीणा। तारांवीण व्यर्थ जाणा ॥ १ ॥

## ३४ मूर्तिपूजेचें रहस्य.

केला मातीचा पशुपती । परी माती नोहे पशुपती ।
शंभुची पूजा शंभुसी पावे । माती मातीमाजि सामावे ॥ १ ॥

केली काशाची जगदंबा । परि कासें नोहे अंबा ।
अंबेची पूजा अंबेनें घेणें । कासें राहे कासेपणें ॥ २ ॥

केला पाषाणाचा विष्णु । परि पाषाण नोहे विष्णु ।
विष्णुपूजा विष्णुसी जाये । पाषाण पाषाणत्वें राहे ॥ ३ ॥

तैसे आम्हां पूजिति संत । पूजा घेतो भगवंत ।
आम्ही किंकर संतांचे दास । संत पदवी नको तुकयास ॥ ४ ॥

## रामदास.

---

## ३५ शरीराची उत्पत्ति—मीमांसा.

रजस्वलेचा जो विटाळ । त्याचा आळोनि झाला गोळ ।
त्या गोळाचेंचि केवळ । शरीर हें ॥ १ ॥

वरी वरी दिसे वैभवाचें । अंतरीं पोतडें नरकाचें ।
जैसें झांकणें चर्मकुंडाचें । उघडितांच नये ॥ २ ॥

नरकाचें कोठार भरलें । आंत बाहेर लिडिबिडिलें ।
मूत्रपोतडें जमलें । दुर्गंधीचें ॥ ३ ॥

डोळां निघती चिपडें । नाकीं दाटतीं मेकडें ।
प्रातःकाळीं घाणी पडे । मुखीं मळासारखी ॥ ४ ॥

मुख ऐसें कुश्चिळ दिसे । पोटीं विष्ठा भरली असे ।
प्रत्यक्षास प्रमाण नसे । भूमंडळीं सर्वथा ॥ ५ ॥

## ३६ शिवाजीस सर्टिफिकेट.

सकळकर्ता तो ईश्वरु । तेणें केला अंगिकारु ।
तया पुरुषाचा विचारु । विरुळा जाणे ॥ १ ॥

महायेत्न सावधपणें । समई धारिष्ट धरणें ।
अद्भुतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ २ ॥

येश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा ।
नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ ३ ॥

येहलोक परलोक पाहणें । अखंड सावधपणें राहणें ।
बहुत जनांचें साहणें । देणें ईश्वराचें ॥ ४ ॥

धर्मस्थापनेचे नर । झाले आहेत पुढें होणार ।
ते ईश्वराचे अवतार । देणें ईश्वराचें ॥ ५ ॥

## वामन पंडित.

---

## ३७ गोपाळकाला.

संतोषतो नंद-कुमार साचा । बाळांत तैशा परमा रसाचा ॥
पंक्तीस दे लाभ अजी वनांत । बुद्धी जयांच्या जगजीवनांत ॥ १ ॥

निजमुख कवणाही आड दृष्टी असेना !
रचुनि बसवि ऐसी भोंवती बाळ-सेना ।
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या ।
म्हणुनि बहुत पंक्ती मंडळाकार केल्या ॥ २ ॥

हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्यभागीं । मुलें भोंवती ऱ्हस्व-दीर्घे विभागी ॥
लहानांपुढें थोर अंभोज-पत्रें । अशीं बैसवीलीं भवाकांतपत्रें ॥ ३ ॥

असे कर्णिका अंबुजामाजि जेंवि । मुलांमध्यभागीं बसे कृष्ण तेवीं ।
मुखीं ग्रास सप्रेम घालूनि हातीं । दहींभात दे, देव लीला पहाती ॥ ४ ॥

वंशी नादनटी, तिला कटितटीं खोवोनि पोटीं पटीं ।
कक्षे वामपुटीं स्व-शृंग, निकटीं वेताटिही गोमटी ॥
जेवी नीर-तटी-तरू-तळवटीं, श्रीश्याम-देहीं उटी ।
दाटी व्योम-घटीं सुरां, सुखलुटी घेती जटी धूर्जटी ॥ ५ ॥

## मोरोपंत.



### ३८ सुभद्रेला पळविल्यामुळें खवळलेला बळराम.

झटिति भट-कटक बहु करि कन्या नेली म्हणून बोभाट।
जो जो बळासि सांगे वाटे त्या दस्युचाच तो भाट ॥ १ ॥

प्रस्फुरदधर-दल प्रभु बलभद्र म्हणे खरेंच सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटू गांठितसे जो पटांत आंगारे॥ २ ॥

कोठें रथ? मुसळ पुरे! कवच कशाला? धनुष्य राहों द्या! ॥
वत्सेला निज-धर्षण-कर-खळ-दंडोत्सवास पाहों द्या ॥ ३ ॥

पर्वीं अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे।
संध्या-राग-सुरंजित-शरदभ्राहूनि फार तो शोभे ॥ ४ ॥

कोप-ज्वर-भर-कंपित-काय प्रभु लोचनें करी शोणें।
होणें पुढें सुदुर्घट, वारावें त्या महेश्वरा कोणें? ॥ ५ ॥

### ३९ कौरव सैन्यापुढें उत्तर राजपुत्राची झालेली गाळण.

ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटक-बागुलासि पोर पळे।
शत्रु-प्रताप-दाव-ज्वालांनीं तो कुरंग होरपळे ॥ १ ॥

उत्तर म्हणे नको गे, पायां पडतों बृहन्नडे सोड।
जोड दिली, दुखवुं नको केवळ पितृ-कर-तळ-स्थ हा फोड॥२॥

बोले बृहन्नडे हें कुरुबळ कल्पांत-सिंधुसें गमतें।
ने रथ पुरांत, माझें मन नयनाहि पाहतां बहु भ्रमतें ॥ ३ ॥

दुर्योधन, दुःशासन, कर्ण, कृप, द्रोण, भीष्म ज्या कटकीं।
त्यांत मरेनचि शिरतां, कांट्यावरि घालितां चिरे पट कीं॥४॥

कुरवाळोनि म्हणे गा राजसुता! योग्य तूं न कांपाला।
मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ ५ ॥

### ४० परमेश्वराच्या औदासीन्याबद्दल तर्क-वितर्क.

उठतां बहु त्वरेनें कोठें जातां असें तुम्हां देवी।
पुसती झाली जाणों पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥

बहुधा बळिचें द्वार क्षणभरही सोडितां नये देवा ।
न चुकावी छल-पाप-प्रायश्चित्तार्थ साधुची सेवा ॥ २॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं परि ते दयार्द्र या रंकीं ।
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥ ३ ॥
कीं मीच एक उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन ।
वतन स्वकीय करतें मज कां त्वन्नाम मंगलायतन ? ॥ ४ ॥
कीं मागें गुप्त उभा असलि प्रेमें उभारुनी बाहे ।
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकसी बा हे ॥ ५ ॥

## रघुनाथ पंडित.

## ४१ नळराजा आणि सोन्याचा हंस.

तया हंसांचे देह कांचनाचे । पक्ष झळकति ते वीज जशी नाचे ॥
रंग माणिकसे चंचुचे पदांचे । जसे अधरींचे भीमकन्यकेचे ॥ १ ॥

त्यांतील एक कलहंस तटीं निजेला ।
जो भागला जलविहार विशेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ।
पक्षी तनू लपवि, भूप तया पहातो ॥ २ ॥

टाकी उपानह, पदें अति मंद ठेवी ।
केली इजार वरि डौरहि, मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच, अशा उपायीं ।
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥ ३ ॥

कलकल कलहंसें फार केला सुटाया ।
फडफड निज पक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणिबंधीं टोंचिता होय चंचू ।
धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ! ॥ ४ ॥

तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥

स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ।
कठिण समय येतां कोण कामास येतो ? ॥ ५ ॥

## ४२ दयमंतीची हंसास धरण्याची धांदल.

असा पक्षी लक्षी बहु-विहग-लक्षीं न मिळता ।
सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवायिता ॥
अगाई ! हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी ।
धरूं जाते हातें हळुहळु तयातें न कळुनी ॥ १ ॥

हे मंद-मंद-पद सुंदर कुंद-दंती । चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दंती॥
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते । निष्कंप-कंकण करास पुढें करीते ॥ २ ॥

गवसलाच असा खग भासला । तंव तदीय सखी-जन हांसला ॥
मग सवेंचि बुझावुनि हांकिला ।उडविलाचि पिटाळुनि टाकिला ॥३॥

कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो ॥ नाहींच दूर, न समीप, तसा बसे तो ॥
पाहे सुधा-कर-मुखी कलहंसराया ॥ लाहे मनोरथ तयास पुन्हा धराया ॥ ४ ॥

हंस धरीन म्हणोनि मनोरथ हा मज होय विनोद तुम्हांला ।
हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला ॥
जा परत्याच, तुम्ही नलगेच ! असें वदुनी नृपराज-सुता ते ।
राहविला सखिचा जन आपण मात्र तयास धरूं मग जाते ॥५॥

अमृतराय.



## ४३ अस्सल निवृत्तीचा उपदेश.

अखंड हरि हरि वदारे । किति सेवाल धन-दुर्मदा ॥ ध्रु० ॥

काय रानांत आटल्या नद्या । काय तरू म्हणति फळ न द्या ।
किति कांडोकांडि मिरवाल मुद्या । गेलि घडी न येरे उद्यां ॥१॥

काय बिदींत न मिळती चिंध्या । काय न मिळे भोंपळा दुध्या
या तों युक्ति सुखाच्या सुध्या । वाचा एकोबाचा पुस्तकाध्या ॥२॥
काय पर्वतिं बुजल्या दऱ्या । काय दुकाळ पडला कऱ्या ।
काय महाग तृणाच्या बोऱ्या । या तों वैराग्य-युक्ती खऱ्या ॥३॥
बाहु असतां आपणांपाशीं । मग कशास पाहिजे उशी ।
काय अडचण महदाकाशीं । ठाय नेदी काय पृथ्वी कुशी ॥४॥
कर जोडुनि अमृत विनवितो । बाहु उभारुनी गर्जतो ।
जो निश्चय धरूनि बैसतो । त्या घरीं बसल्या राम देतो ॥ ५ ॥

आनंदतनय.

## ४४ रावणाची फजीती.

लंकानायक सायकासन गुणीं सज्जावया सज्जला ।
तों सीता भयकंपिता, जन महा-चिंतांबुधीं मज्जला ॥
झाल्या म्लानमुखी मनोरम सखी, तो जों भुजा सांवरी ।
तो आकार विकार देखुनि उठे हाःकार माडीवरी ॥ १ ॥

हातें थोपटिल्या भुजा, मज असा नाहीं त्रिलोकीं दुजा ।
मेरूही मजशीं खुजा, सुरवरीं माझीच आधीं पुजा ॥
ऐसा जल्पुनि चाप जाड उचलों जातां न हाले रजा ।
जैसा शैल मतंगजास न ढळे, पाहे विदेहात्मजा ॥ २ ॥

एका दों न चळेचि कार्मुक करीं हें नेटकें जों कळे ।
लावी हात बळें समग्रहि तदा, तों कांहिंसें आकळे ॥
मोठी आरभटी करून चुकटी दंतावळी चावुनी ।
आक्रोशें अतिविक्रमें क्षिति-तलीं जानुद्वया लावुनी ॥ ३ ॥

विसां करांहीं धनु तें न तोले । न सांवरे यास्तव देह डोले ॥
भारें तयाच्या बहु खाय झोले । तशांतही रावण काय बोले ॥४॥
'या भूपें पण जिंकिला, उभाविलें कोदंड चंडाकृति ।
मद्दोर्दंड उदंड दंड करिती, शाबास माझी धृती' ॥

डोले बोलत, तोल तो न धरवे, गेलाचि झोला भला।
आलें चाप अपाप त्यावरि उरीं, तो भूतळा पातला ! ॥ ५ ॥

रामजोशी.

## ४५ मदन–पुतळी.

सोन्याचें पायजिव तळीं, मदन–पुतळी, टाकि भूतळीं, मंजु झुमकार।
सुंदरी म्हणसि बाहेर चालला हर, हिचें माहेर, कुठें घरदार ॥ धृ० ॥
ती उभी मोठि ऐटिनं, हार दाटिनं, बोलणं कोटिनं, मांडिवर वार ।
दैवानं ध्यावि लाभली, नार बांधली, बहुत साधली विरळ कुणिवार ॥१॥
चाल– यापरी होउनि बेताल ।
त्या तरुणाहि बहु परिमाळ ।
पुरविन म्हणे मनाचा ख्याल ।
लागला विषय हरताळ ।
श्रृंगार करुनि अळुमाळ ।
लागला छंद बहुसाल, भेट कधि द्याल, इच्छा आजकाल ठिकाणा सांगा ।
कविराय चमकला हीर, लोकचाहीर, इतर शाहीर काजवे वांगा॥२॥

ब. पां. किर्लोस्कर.

## ४६ रागावलेली रुक्मिणी.

आति कोपयुक्त होय परी सुखविते मला।
भृकुटि वक्र करुनि बघत, लाल गाल सर्व होत,
थरथर तनु कांपवीत, इंदुवदनीं घर्म सूटला ॥ धृ० ॥
जणुं कनकाची मूर्ति अग्निमाजी तावली ।
कीं नभ तोडुनि वीजचि ती खालीं उतरली ।
कीं ज्वलनाची ज्वाला कुंडांत पेटली ।
एक जागीं पद न ठरत, हृदय भरत रिक्त होत,
अधरबिंब काय फुटत, तोंवि वरी दंत रोंविला ॥ १ ॥

## गो. ग. आगरकर.

### ४७ नायगाराचा धबधबा.

थोड्या वेळांत पतिदर्शनाच्या आनंदलहरी तिच्या हृदयांत येऊं लागून तिचें पाऊल वेगानें पुढें पडूं लागतें. व प्रत्येक पावलास पुढें जाण्याची तिची उत्कंठा अधिकच तीव्र होते. मनाच्या अशा स्थितींत असणाऱ्या स्त्रीस कोणी अडथळा केला असतां तिचा क्षोभ होऊन ज्याप्रमाणें ती अडथळा करणारावर मोठ्या रागानें चवताळून जाते त्याप्रमाणें अजाद्वीपाचा प्रतिरोध प्रियदर्शनार्थ उतावीळ झालेल्या या चपलेस दुःसह होऊन ती क्रोधानें इतकी फणफणूं लागते कीं, तिचें तें भयानक स्वरूप पाहून व गर्जना ऐकून प्रेक्षकांच्या अंगावर कांटा उभा राहतो! अजाद्वीपास हिसडा देऊन जेव्हां ती दीडशें फूट उंचीच्या कड्याखालीं उडी घेते, तेव्हां तिला रागाचे जे कल्लोळ येतात त्यामुळें दशदिशा भरून जाऊन आसमंतांतील इतर ध्वनि पंचत्वाप्रत पावल्यासारखे भासतात. क्रोधाग्नीनें सर्व उदकसंचय अत्यंत तप्त होऊन त्यास उसळ्या येत आहेत कीं काय, व त्यांतून स्फटिकासारख्या शुभ्र व हिऱ्यासारख्या तेजोमय अंबुकणांच्या बाष्पाचे अनंत लोळ निघत आहेत कीं काय असा भास होतो!

## न. चिं. केळकर.

### ४८ काळाचें घड्याळ.

काळ हा डमरूसारख्या किंवा एखाद्या वाळूच्या घड्याळासारखा आहे. या घड्याळांत दोन बाजूंला दोन मोठे समान आकाराचे पारदर्शक फुगे असतात. त्यांतला एक भूतकाळ व दुसरा भविष्यकाळ. भूतकाळाच्या फुग्यांतले क्षणरूपी वाळूचे कण भविष्यकाळच्या फुग्यांत हळूंहळूं पडत असतात व युगांची कल्पना आपण ध्यानांत घेतली तर, तास भरला म्हणजे पहारेकरी जसा भरलेला फुगा वर व रिता फुगा खाली करून वाळूचें घड्याळ उलटें टांगून ठेवतो, त्याप्रमाणें युगांतराच्या प्रारंभीं लीलाप्रिय परमेश्वरही हें काळाचें घड्याळ पुनः प्रवृत्तीकरितां उलटें टांगून ठेवतो.

गं. रा. मोगरे.

## ४९ सह्याद्रि.

कोठें खोल महा भयानक दरी पाहोनियां ज्यांकडे ।
सूर्याचे करही भयें दचकुनी माघारती बापुडे ॥
कोठें घोष करीत पुण्य तटिनी जातां समुद्राकडे ।
खालीं आदळती धडाधड जणूं पापाचलाचे कडे ॥ १ ॥

कोठें त्र्यंबकराज-पुण्य-महिमा वर्णीत गोदावरी ।
जातां पंचवटीवरूनि नमन श्रीरामचंद्रा करी ॥
भीमाशंकर सोडुनी निज सखी घेऊनि नीरा सवें ।
कोठें नेउनि पंढरीस वसवी भीमा जनांचे थवे ॥ २ ॥

नाहीं घोरपडीशिवाय शिवली भिंतीस ज्याच्या शिडी ।
फेंकाया शकले न दृष्टि रिपुही ज्याच्याकडे वांकडी ।
तान्हाजीसम वीरसिंह पडला ज्याकारणें संगरीं ।
त्या ह्या सिंहगडीं निरंतर शिवा स्वाराज्य आतां करी ॥ ३ ॥

ह. ना. आपटे.

## ५० पावसानंतरचें वातावरण.

सुमारें घटका दीड घटका आधींपर्यंत एकसारखा पाऊस पडून वर सांगितलेल्या रस्त्यावरलीं व आसपासच्या झाडींतलीं सर्व झाडेंझुडपें भिजून चिंब होऊन गेलीं होतीं. शेंड्यावर पडलेलें पाणी खालच्या फांद्यांवर, खालच्या फांद्यांवरून त्यांच्या खालच्या फांद्यांवर, वरच्या पानांवरून खालच्या पानांवर, पुन्हा त्या खालच्या पानांवरून त्यांच्या खालच्या पानांवर, याप्रमाणें पाण्याचे बिंदु टपटप् पडून त्या सर्वांचा मिळून केवढा तरी मोठा आवाज होत होता. त्यांत आणखी ते सर्व बिंदु मिळून खालीं पडलेल्या पाचोळ्यावर पडत, व मध्येंच वाऱ्याचा मोठा थोरला सोसाटा येऊन, जास्तच झपाट्यानें पाणी खालीं पडे, तेव्हां तर तो आवाज एखाद्या वाटसरास दचकविण्याजोगाच होई.

## पंडिता रमाबाई.

### ५१ तुफानाचे वेळचें सृष्टिसौंदर्य.

चोहोंकडून मोठमोठाल्या लाटा उसळून येऊन एकमेकांवर आपटत आहेत, वारा मोठा सोंसाट्याचा वाहत आहे, समुद्राच्या वरल्या भागावर पराकाष्ठेचें धुकें पडलें आहे, आणि समुद्राच्या मेघाच्या गर्जनेनें लोकांच्या कानठाळ्या बसत चालल्या आहेत, तरी या आनंदी पक्ष्यांना त्याचें कांहींच वाटत नाहीं! एखादा अरब जसा आपल्या तरुण तेजस्वी घोड्याला वायुवेगानें दामटीत जातो, त्याप्रमाणें ते मोठमोठाल्या कल्लोळांच्या पाठीवर बसून जसे काय शर्यत खेळत असतात! केव्हां केव्हां मेघांचीं पटलें फोडून सूर्यनारायण विजयी वीराप्रमाणें आकाशांत प्रकाशमान होई, तेव्हां गगनमंडलांत सबंध इंद्र-धनुष्याचा देखावा वर्णनीय व आनंदकारक असा होत असे!

## गोविंदाग्रज.

### ५२ विधवेचा एकुलता एक राजहंस.

हें कोण बोललें बोला।
राजहंस माझा निजला॥ धृ०॥

दुर्दैवनगाच्या शिखरीं नवविधवा दुःखी आई।
तें हृदय कसें आईचें मी उगाच सांगत नाहीं।
जें आनंदींही रडतें दुःखांत कसें तें होई।
हें कुणी कुणा सांगावें।
आईच्या बाळा ठावें।
प्रेमाच्या गांवा जावें—।
मग ऐकावें या बोला। राजहंस माझा निजला॥ १॥

*　　*　　*

करूं नका गलबला अगदीं लागली झोंप मम बाळा।
आधींच झोंप त्या नाहीं खेळाचा एकच चाळा।
जागतांच वाऱ्यासरसा खेळाचा घेइल आळा।

वाजवूं नका पाऊल ।
लागेल तया चाहूल ।
झोंपेचा हलका फूल ।
मग झोंपायाचा कुठला । राजहंस माझा निजला ॥ २ ॥

* * *

हे काळे कुरळे केश खेळतात डोक्यावरती ।
ही दृष्टि पहा मम वदनीं नेहमीं अशी ही असती ।
हें तेज अशा रत्नाचें झालें कां आहे कमती ।
कानांत नाचती डूल ।
तोंडावर हसरें फूल ।
जीवाची घालुनि झूल ।
मी असाच झांकिन याला । राजहंस माझा निजला ॥ ३ ॥

* * *

हें असें जाहलें म्हणतां तरि देवचि निजला कांहो ।
जरि निर्दय होउनि निजला, आळवीन फोडुनि टाहो ॥
कीं असा पोटचा गोळा पोटांतचि देवा राहो ।
ही कुऱ्हाड आकाशाची ।
मजवरती पाडायाची ।
नाहींच कल्पना त्याची ।
हा तुमचा कावा सगळा । राजहंस माझा निजला ॥ ४ ॥

* * *

सांगुनी असें सकलांशीं मृत बाळ उराशीं धरुनी ।
तन्मुखीं स्वमुख ठेवोनी चुंबिलें एकदां फिरुनी ।
पाहिलें नीट निरखोनी आणि तीही गेली निजुनी ।
मग पुन्हा कधीं ती उठली ।
जाणीव कुणा ही कुठली ।
परि मति या प्रश्नें हटली- ।
" बोलेल कोण या बोला । राजहंस माझा निजला ! " ॥ ५ ॥

## म. ह. मोडक.

——:०:——

## ५३ सापाचें शब्दचित्र.

ओहो! तो पहा, वितळलेल्या रुप्याचा छोटासा ओघळ जमिनीवरून चालला आहे! चालला आहे कशाचा--वाहतो आहे. गति किती गमतीची! चपळ असून शांत. पाण्याची लाट कीं वाऱ्याची झुळूक. पुन्हा लाट म्हणावी तर गर्जत नाहीं, ओघ म्हणावा तर धचधचा नाहीं. सर्व शरीर एका वेळीं गतीत असूनही कांहीं भाग या कलावर झुकलेला, कांहीं उलट कलावर, निंमे सरळ पुढल्या झोंकावर व निंमे मागें मुरडलेला. तथापि कोणत्याही भागाला फाजील संकोच नाहीं, फाजील ताण नाहीं. सर्व शरीर सारखें एक तोलांत चाललेलें. गोंगाट नाहीं. बोभाट नाहीं, टिकल्याच्या चंद्रहाराचा सर घसरतो आहे, कीं सुबक बुंदक्याचा गळपट्टा पडला आहे, कांहीं ओळखत नाहीं.

*　　*　　*　　*

आतां झाली विषाची लाट! गवताच्या गर्दींतून हा विषारी बाण सणाणतो आहे! क्रोधानें इतका दुमडला आहे कीं श्वास घेण्याला फुरसद नाहीं. नुसता फणकारा चालला आहे! अखिल ब्रह्मांडांतलि क्रूरता, दुष्टपणा हिंस्रता एकवटून तुमचेपुढें स्वारी खडी आहे. बरें देहांत वळवळ तरी किती ! वानरापेक्षां वृक्षारोहणांत तलख, माशापेक्षां जलतरणांत सराईत, रोहीपेक्षां टिपण टाकण्यांत तरबेज, जेठीपेक्षां पिळदार आणि वाघोबालाही पाणी पाजण्याला समर्थ असलें हें प्रकरण आहे.

## साधुदास.



## ५४ रंगमहालांत सीतामाईचा प्रथम प्रवेश.

**या परिस्थितित काल तयाचा, अल्प दीर्घ बनुनी जंव गेला ।**
**जानकीस तंव घेउनि दारीं ठाकला प्रिय-सखी-जन-मेळा ॥ १ ॥**
**त्या तिला जसजशा ढकलीती घेइ ती तसतशी पद मागें ।**
**अस्फुट प्रचुर सीत्कृति-शब्दें तन्निवारण करी बहु रागें ॥ २ ॥**

आणिलीहि न पुढें पद टाकी, लोटिली तरि तटूनाचि राहे ।
ओढिली तरि पुनश्च वळोनी मागुती फिरवुनी मुख पाहे ॥ ३ ॥
शेवटीं करुनि नेट सख्यांनीं आंत ती ढकालिली नव बाला ।
ओढुनी त्वरित दार गृहाचें लाविली झट कडीहि तयाला ॥ ४ ॥
इष्ट तीच घटना घडलेली पाहुनीहि विनयांकित रामा ।
ती अधोवदन दारवठ्याशीं राहिली भिउनियां परिणामा ॥ ५ ॥

यशवंत.



## ५५ न्याहरिचा वकुत.

न्याहरिचा वकुत होईल । मैतरणी बिगिबिगि चाल ॥ धृ० ॥
नांगूर सुटीच्या आंत । पोचाया होवं तत ।
सोडितिल हात बैलाला । धुंडील नदर कोनाला ।
नदरे न पडन् मी जरी ।
जाईल मर्जि ग तरी ।
उरिं रुतल माझ्या सुरी ।
नग नग गमावूं येळ । मैतरिणी बिगि बिगि चाल ॥ १ ॥
लइ वाडुळ जुपि झाल्यालीं । अस्तयाल समदिं शिणल्यालीं ।
शिण जाइल न्याहरी करून । अन् सांग कुना देखून ।
त्यें खुले तोंड घामानं । भरघोसहि कणसाहुन ।
पाहिलं जरी रोज मी ।
तरि हौस न होई कमी ।
फिर फिरुनि बगायास मी ।
होतसे मनिं उतावीळ । मैतरिणी बिगि बिगि चाल ॥ १ ॥

ना वा. टिळक.



## ५६ जन्मभूमीच्या नांवांतली जादू.

खुशी तुला पाहुनी धन्य माते ! अशी रूपसंपन्न तूं निस्तुला
तूं कामधेनू ! खरी कल्पवल्ली ! सदा लोभला लोक सारा तुला ॥

या वैभवाला तुझ्या पाहुनीयां मला स्फूर्ति नृत्यार्थ होते जरी।
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी! तसें पाहिलें मी न कोठें तरी ॥ १ ॥
माते! महात्मे, तुझे तत्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवी।
श्रेणी ययांचीं सदा माझिया गे मना पूजनीं आपल्या वांकवी ॥
यांची यशें ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय तें गे जरी।
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी! तसें पाहिलें मी न कोठें तरी ॥ १ ॥
तूझ्या महोदर सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी।
झालों, तरी गे तृषा मन्मनाची कधींही कधींही न होणें कमी ॥
आई! गुरुस्थान अंतीं जगाचें तुझें यांत शंका न कांहीं जरी।
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी! तसें पाहिलें मी न कोठें तरी ॥ ३ ॥

गिरीश.



## ५७ अंधारी दरी.

बाजुस इकडे दरी भयंकर। समोर तिकडे डोंगर सुंदर ॥
काळखाइ ही खाया उठली। हिरवळ तिकडे निळसर नटली।१।
कड्याखालती काळोखानें। दाट कोंदलीं काळीं रानें ॥
खोल खोल भयकर अंधारीं। बघतां नयना ये अंधारी ॥ २ ॥
पाचू माणिक-नीळ-मण्यांनीं। समोर चमके टोंक नभांतुनि ॥
दरींत तर वांकुन बघवेना। सुंदरतेवर नजर ठरेना ॥ ३ ॥

विठोबा अण्णा दप्तरदार.



## सगुण ध्यान.

हरि हा आनंदाचा कंद ॥
आनंदाचा कंद उभा पुढें भक्तसखा गोविंद ॥ धृ० ॥

सजल-नीरद-श्यामतनू, नव-रत्न- खचित-सौवर्ण-मुकुट, शिरपेंच तुरा, वरि कलगि विराजित, कुटिलालक निटिलासि कस्तुरी तिलक केशरी गंध ॥ १ ॥ श्रवणिं मनोहर मकर- कुंडलें, फुल्ल गल्ल,

कर्णांत-दीर्घ-सुप्रसन्न-लोचन, इंदुवदन, तिल-पुष्प-नासिका, कुंदरदन हनु, अधर-बिंब-गत हास्य मंद मंद ॥ २ ॥ कंबु-कंठ, कौस्तुभाभरण, शुभ-पटीर-पंक-नव-द्रव-रूषितपीवरांस, केयूर-विभूषित-कनक-कटक-सह-रत्न-तोडर-प्रभानुभासित, शंख-सुदर्शन-गदा-सरोरुह-लसच्चतुर्भुज, ललितांगुलिं-धृत-रत्न-मुद्रिका-वृंद ॥ ३ ॥ विशाल वक्षस्थलीं रमाकुच-कुंभ-कुंकुमालेप-लिप्त-श्रीवत्स-लांछित, सुवर्ण-यज्ञोपवीत-मध्य-वलि-त्रय-बंधुर, निम्न-नाभि तनु, रोम-राजि-लुठदुत्त-रीय-पट, पारिजात-नव-कुसुम-तुलसिका-मिश्रहार, पादाग्रचुंबि नभ भरुनि जयाचा मधुर सूटला गंध ॥ ४ ॥ कटी-तटीं जरिकाठि पीत-कौशेयवास-पट, वास-सुवासित, विचित्र-शृंखल, अगणित-मणि-झणझणित-मंजुल-क्वणित-किंकिणी, विपुलतरोरु-द्वंद्व-विराजित-जानु-जंघ, सुकुमार सरलतर, कनक-वलय-युत-रत्न-तोडरें, मंजु मंजु-सिंजान-हीर-मंजीर-परिष्कृत, सहजरक्त मृदु-वज्र-अंकुश-ध्वजांबुजांकित, वृत्तवृत्त-उत्तुंग-रक्त-नख-चक्रवाल-सत्पुण्य--अंघ्रिका-ध्वस्त—महध्द्दयांधतमस, मंदाऽकिनी-माहेर-चरणयुग-धृत-रणराणिक, जयाच्या क्षणिक ध्यानें तुटतीं झटिति सर्व भवबंध ॥ ५ ॥ कोटि-कोटि-कंदर्प-रूप-लावण्य-दर्पहर, ध्यान-मनोहर, अनंत-जन्म-मनोमल-पटली-निर्मूलनकर, भक्तिगम्य, ताप-त्रय-भंजन, आसेवनक, ध्यानिं पाहतां वाटे जणुं नयनांत भरावें, हुंगावें, दृढ आलिंगावें, कीं चुंबावें, विसरतसे संसार सर्वही, संतत याचा पंत विठ्ठला सहज लागला छंद ॥ ६ ॥

---

# परिशिष्ट.

## साहित्यसुधेवर टीपा.



### ज्ञानेश्वर.

( १ ) **अधिकारिया;** राजाचा अधिकारी. कर्ज काढून केलेलें लग्न ज्याप्रमाणें अखेर तापदायक होतें, किंवा राजाचा अंमलदार आपल्या गांवीं आला असतां त्याच्या स्वागतार्थ केलेला समारंभ ज्याप्रमाणें शोकपर्यवसायी होतो; त्याप्रमाणें राजसमुख आरंभीं गोड व अंतीं कडू असतें असा आशय. उपमालंकार. **साखरेंसी;** साखरेसह, **वत्सनागा;** बचनागाला. **महुललै;** मधुराई, गोडी. **संवचोरा** ( सम+चोर ); बरोबर राहून चोरी करणारे ठग वगैरे लोक, यांचा ज्ञानेश्वरींत वारंवार उल्लेख येतो. **भेटहाटिचें कलत्र;** भेटीबरोबर बाजार ( तनुविक्रय ) करणारी बायको, वेश्या. वेश्यासंगतींत होणाऱ्या द्रव्यनाशावर ज्ञानेश्वरांचा रोख आहे. **लाघाविचे विनोद;** बहुरूप्याच्या नकला. **महुरें;** मधुर. **अतिखरें;** अतिदारूण. **वालिलें आहे;** वळलें आहे, बनविलें आहे.

( २ ) **पूर्णिमां;** पौर्णिमेनें, 'आं'प्रत्ययान्त तृतीया ज्ञानेश्वरींत पुष्कळ आढळते. **मुखाभासें इ०** आरशांत दिसणाऱ्या प्रतिबिंबाबरोबरच आरसाही दूर नेला म्हणजे मी पाहणारा ही भावनाही नष्ट होते. उपमालंकार. **परमु;** अखेरची गति. **सोलावा कसु;** सोळा रुपये तोळा भावाचा कस. ज्ञानेश्वरांचे वेळीं उत्तम सोन्याचे दर सोळा, साडेपंधरा व पंधरा असे होते. **तैसें इ०** त्याप्रमाणें जाणणारा व नेणणारा या दोन्ही भावना जिच्यांत नष्ट होतात, ती अवस्था. **आगला;** श्रेष्ठ, वरचढ.

( ३ ) **तानी** आणि **पारिठी;** दूध देणारी आणि न देणारी. **दीठी सूनि;** दृष्टि घालून, नजर टाकून. **कीजती** ( क्रिय–क्रिज्ज–कीज ) केल्या जातात. हा अगोदर लावलेला दिवा व तो मागाहून लावलेला दिवा,

हा बाल सूर्य तो मध्यान्ह सूर्य, ही दुभती कामधेनू व ती पारठी कामधेनू, हें नवें पारिजाताचें झाड व तें जुनें पारिजाताचें झाड अशी तुलना करण्यांत अर्थ नाहीं, त्याचप्रमाणें गीतेंतल्या श्लोकांत बरावाईट ही निवड संभवत नाहीं असा भाव. उपमा.

( ४ ) **घडे**; रिकामा होतो. **वेचकपणें संचकु**; द्रव्याचा व्यय करणारा आणि म्हणूनच पुण्याईचा संग्रह करणारा. परिवृत्ति अलंकार. **रुंखु**; (संसाररूपी) वृक्ष. **निधियें पडली**; जमीनीवर पडली. **ऐसा वेगातिसो** इ० भिंगरीच्या वेगातिशयानें ज्याप्रमाणें ती जमीनीला खिळलीशी वाटते, त्याप्रमाणें प्रपंचांतील हालचालीच्या प्रचंड वेगानें तो स्थिर आहे अशी भूल पडते. उपमालंकार. **तर्के...वहिलेपणें**; घडामोडींच्या स्पष्ट प्रचीतीनेंच केवळ तर्काला येतें. उपमा.

( ५ ) **रविचंद्रादि–शूक्ति**; सूर्यचंद्रादि शिंपले. **तें...तेजा**; त्यांच्या प्रकाशाच्या बुडाशीं तुझेंच तेज आहे. **लपीं थपीं**; लपत छपत. **वेद...पांती**; वेद वर्णन करणारे पटाईत कुठपर्यंत–जोंपर्यंत त्यांना तुझें रूप दिसलें नाहीं तोंपर्यंत–तें एकदा दिसल्यावर वेद आणि आम्ही प्राकृत माणसें एकाच माळेचे मणि ( अडाणी ) ठरतों. **दूजेया मोडे**; दुसऱ्याचा थारा नाहीसा होतो. **परेंसी...बुडे**; परा वाणीसह वैखरी वाणी लोपते. उदात्त रस.

( ६ ) **सूदलें भंवतसे**; जन्ममृत्यूंच्या चाकावर घातल्यामुळें फिरत आहे. **विपाएं**; चुकून. **जालें...विष्ठा**; जर कुत्र्याला सांपडलें तर त्याला विष्ठेची किंमत येते. **यां;...पुंजा** या दोन्ही गतींतून वांचलें म्हणजे पुरलें गेलें तर त्यांत किडे बुजबुजतात. **उजियेडा ... देहा जाण**; उजेड आणि अंधार किंवा जिवंत उभा व मेलेला यांच्यांत जें प्रमाण; तेंच आत्म्यांत व देहांत आहे.

( ७ ) **आपैसा**; सहज. **सकळू ना निष्कळू**; तुकड्यांचा बनविलेलाही नव्हे व सबंधही नव्हे.

( ८ ) **आपजवी** ( आपादय-आपज ); घडविनो. **चौथ**; गणेश चतुर्थी. **चाउदसिं**; चतुर्दशीचे दिवशीं. **नवमींतं**; आश्विन शुद्ध नवमीस. **ऐसें...जो**;

अशा रीतीनें जो एकटाच सर्व देवतांची उपासना करितो. हास्यरस. बिंगफोड उपालंकार.

( ९ ) **आपुलेनि पवाडें**; आपल्या योग्यतेच्या मानानें. **सपूर**; मुचलक. **एसणें**; एवढें. **हो काज**; किंवा, फार काय. अद्भुत रस. उपमालंकार.

( १० ) **भोजें**; आनंदानें. **दिहें दिवसें**; दिवसें दिवस. **वाढतीं**; वाढवसि. **गैसासै**; गयाळ; अडाणी.

( ११ ) **आकाशवेन्ही**; आकाशपर्यंत. **अडदरत**; हदरूं लागलें. **रासौभा** रास, खिचडी, सडा. **मोकलवांदि**; मोठी ओरड. **देहाचि...थोंकला**; दिवसाच अंधार पडला.

( १२ ) **बाहाकांतें**; फांकणारीं. **झाकरि**; झटकन्. **तवं...दाटति**; विचाराच्या जिभेला रुचि देईनात. **कैसा...अक्षरांचेनि**; अक्षरांच्या सलग रम्य आकारांनीं कसा फसलों. **इयें...निगे**; अहो, हीं अक्षरें नव्हेत, तर आकाशाच्या घड्याच मजपुढें ठेवल्या आहे. येथें माझी बुद्धि काय बुड्या मारणार ! अपन्हुति अलंकार. गूढबोली उपालंकार.

( १३ ) **जं...बोलती**; साहित्य आणि शांत रसाची जोड हीं दोन मिळालीं म्हणजे चालतें बोलतें सौंदर्य दिसूं लागतें. **नावां नावां**; वारंवार. **तरि...माझा**; तर तो मलयवायु स्पर्शानें सर्वांग चेतवील, स्वादानें जिभेला नाचवील आणि मधुर नादानें ' हायरे बाप ! काय मौज आहे ! ' असें कानांना म्हणायला लावील. तसाच साहित्याचा प्रकार आहे, असा भाव.

( १४ ) **आधाडां**; अर्ध्या कड्यावर. **चडत०...वेघें**; चढत्या काळाच्या कलांच्या साहाय्यानें. **प्रवृत्ति०...सांडी**; प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही उंच तट वलांडून जाते. **ओभाणें**; ( उद्भवन–उभ्भवण–ओभाण ) लोळ. **वरि;... ओसाणें**; वर सुख–दुःखांचा कचरा तरंगतो. **उत्सवन**–उस्सवण–ओसाण; वाहून आलेला केर. **ते...गा**; त्या पाण्याच्या जोरापुढें अद्याप कोणालाही टिकाव धरतां आला नाहीं, मग तो तरून कोण जाणार ? काव्यार्थापत्ति. झडबोली उपालंकार.

( १५ ) **ध्वजेचें चिरगूट**; निशाणाचें कापड. **मषीपत्र**; शाई व कागद. आम्ही भक्त तुझीं निशाणें आहोंत किंवा शिक्कामोर्तबाचें साधन आहोंत, अर्थात् स्वतंत्ररीत्या आमची किंमत कमी असली तरी तुझ्या राजेपणाशीं संबंध आल्यानें ती मोठी झाली आहे, म्हणून आमचें काळजीपूर्वक रक्षण करणें तुला भाग आहे. उपमा व काव्यलिंग अलंकार.

## निवृत्तिनाथ.

( १६ ) **कैसा...वाटा**; परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चारी वाणींच्या वाटांत देव आम्हांला देहांतून प्रकाश दाखवितो. **उपरति वाहे**; वैराग्य धरतो. रूपकालंकार.

## सोपानदेव.

( १७ ) **खेळेंमेळें**; हंसत खेळत. ' तुम्ही आम्ही खेळीमेळी । गदारोळी आनंदें ( तुकाराम ).

## मुक्ताबाई.

( १८ ) **मुंगी**; मुंगीएवढें साधकास दिसणारें ब्रह्मरूप. ' मुंगीमाथा एकच तळें । ती एक उदकाविण तळमळे । ' ( ज्ञानेश्वर ). गूढचोली उपालंकार.

## नामदेव.

( १९ ) **स्वरूपीं...व्यापला**; रूपवान् मनुष्यापाशीं गुणांची गर्दी आहे.

## गोरोबा कुंभार.

( २० ) **बोलतां...खादलीं**; बोलतांना आपली जीभच खाऊन टाकली म्हणजे गप झालों असा भाव. **खेचरी**; एक विशिष्ट मुद्रा. खेचरी, भूचरी, चाचरी व अगोचरी अशा चार मुद्रा आहेत.

## नरहरि सोनार.

( २१ ) **बागेसरी**; सोनाराची भट्टी. रूपक अलंकार.

## चोखामेळा.

( २२ ) **डोंगा**; वांकडा. चोखामेळा जरी महार असला तरी त्याची भक्ति कांहीं महार नाहीं असा भाव.

## जनाबाई.

( २३ ) **जल्लाजुडी केली**; आवळा आवळ केली. झगडयोली उपालंकार.

## सेना न्हावी.

( २४ ) **वारिक**; न्हावी. अयना व बगला हे दोन्ही पर्शियन शब्द आहेत हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. रूपकालंकार.

## कान्होपात्रा.

( २५ ) **भातुकें**; खाद्य.–**भक्तुक**–भत्तुक–भातुक; खाद्य, विशेषतः भात.

## भानुदास.

( २६ ) **अवघिया...तैसें**; सगळ्या देशानें मुबलक लुटून नेलें तरी तळावर आहे तसें कायम आहे. **सुजडु...जीवनमुद्रा**; जड मनुष्याला हा सुंदर जीवनकळा आहे. रूपक.

## एकनाथ.

( २७ ) **दानेंविण पाणि**; दानाशिवाय हात. 'दानेन पाणिर्नतु कंकणेन' ( भर्तृहरि ). वीण ( विना ) चा उपयोग तृतीयेबरोबर करण्याचें हें ज्ञानेश्वरी वळण आहे.

## मुक्तेश्वर.

( २८ ) **क्रोध** इ० इंद्रियें ताब्यांत आणतांना तीं लवकर कशीं येत नाहींत म्हणून त्यांवर रागवावें.

( २९ ) **सिंहकरी**; सिंह व हत्ती. **उपमे** इ० व्यतिरेक अलंकार.

## तुकाराम.

( ३० ) **करणीचा**; बनावट हिऱ्यांचा. तुकारामबोवांच्या वेळेस बनावट रत्नें करण्याची कला हिंदुस्थानांत होती, व ती ६४ कलांपैकीं एक कला मानली जात होती. **मोहरा**; सर्पांच्या मस्तकावरील मणि ( कलम ४१८, प्राणी ( ज ) पहा ).

( ३१ ) **तरुवर**; मोठें झाड.

( ३२ ) **नामरूपीं** इ० ज्याचें नाम जपावयाचें त्याचें रूपही प्रत्ययास आलें.

( ३३ ) **धीर**; आधार. **आंधळ्याचें** इ० आंधळ्यांनीं कांहीं कर्तबगारी करून दाखविली तरी त्यांचें यश खरोखरी त्यांना शिक्षण देणारांस जातें. तुकोबांचे वेळीं आंधळ्यांना शिक्षण देण्याची कल्पना होतीसें दिसतें. उपमा व रूपक अलंकार.

( ३४ ) मूर्तिपूजेचें रहस्य तुकोबांच्या तोंडून ऐकल्यावर हिंदुलोक दगडमातीची पूजा करितात असें म्हणणें असमंजस ठरेल. उपमा.

## रामदास.

( ३५ ) **कुश्चिळ**; मलिन. बीभत्सरस.

( ३६ ) **धर्मस्थापनेचे** इ० ' संभवामि युगे युगे ' ( भगवद्गीता ).

## वामन पंडित.

( ३७ ) **कर्णिका**; कमळाच्या फुलाचा मधला गड्डा. **नादनटी वंशी**; नादानें नटणारी बांसरी. **कक्षे...स्वशृंग**; डाव्या खाकेंत शिंग. **जटी धूर्जटी**; तपस्वी व शंकर. वृत्त्यनुप्रास अलंकार.

## मोरोपंत.

( ३८ ) **झटिति**; झडकर. **भटकटक**; वीरांचा समुदाय. **जो जो** इ०; जो जो बळरामाला सुभद्राहरणाची गोष्ट सांगूं लागला, तो तो पर्यायानें त्या भामट्याचा ( अर्जुनाचा ) भाट होऊं लागला; कारण त्याला अर्जुनानें आपल्या हातावर कशा तुरी दिल्या हें सांगावेंच लागे. काव्यलिंग अलंकार. झगडचोली उपालंकार. **प्रस्फुरदधरदल**; रागानें ज्याचा ओठ फुरफुरतो आहे असा. **जो...आंगारे**; जो आपल्या वस्त्रांत निखारे बांधून ठेवतो आहे. **वत्सेला... पाहोंद्या**; सुभद्रेला आपल्याशीं अंगझटाई करणाराला कशी शिक्षा होते याची गंमत पाहूं द्या. **पर्वी**; पौर्णिमेस. **संध्या०** संध्याकाळच्या लालीनें रंगलेल्या शरदृतूंतील मेघापेक्षां. उपमा. **कोपज्वर०** रागरूपी ज्वराच्या भरानें कांपूं लागला आहे देह ज्याचा असा. रौद्र रस.

( ३९ ) **पोर**; विराटाचा मुलगा उत्तर. **कुरंग**; हरिण. **बृहन्नडा**; अज्ञातवासांत विराटाच्या घरीं नटवेषानें राहिलेल्या अर्जुनाचें नांव. **जोड दिली**; तूं मला प्राणांची जोड दिलीसें होईल. फोडासारख्या बीभत्स उल्लेखानें रसहानीचा दोष झाला आहे ( कलम ४४४, ५ पहा ).

( ४० ) **देवी**; लक्ष्मी. **पुसती०** ‘ जाणारास पुसों नये, कोठें जातोस म्हणोनी ’ ( दासबोध ). **छलपापप्रायश्चित्तार्थ**; बळीचा छळ करण्यांत झालेल्या पापाच्या निराकरणाकरितां. **बाहे**: हात. आक्षेप अलंकार.

## रघुनाथ पंडित.

( ४१ ) **डोर**; झगा. **उपानह**; जोडा. **वलयं**; कडें. स्वभावोक्ति अलंकार. **पंचू**; पठ्ठा, बहाद्दर. ‘ जो गवसला त्याजपाशीं तो स्वजन नसे ’ असा अन्वय. अर्थांतरन्यास व प्रश्न यांचा संकर.

( ४२ ) **लक्षीं**; दृष्टीला. **इंद्रदंती**; ऐरावत.

## अमृतराय.

( ४३ ) **कांडोंकांडिं**; अवयवांच्या सांध्या सांध्यावर. **बिदींत** रस्त्यांत. **एकोबांचा पुस्तकाध्या**; एकनाथस्वामींच्या भागवतांतील ११ वा अध्याय ( स्कंध. ). **कऱ्या**; आंब्याच्या वाळलेल्या फोडी, पर्यायानें कंदमुळें. **महदाकाशीं**; ब्रह्मांडांत.

## आनंदतनय.

( ४४ ) **सायकासन ... सज्जावया**; धनुष्याला दोरी लावावयास. **रजा**; रेंसभर, लवमात्र. व्याकरणाचा अपप्रयोग. **आरभटी**; जोर. **चुकटी करुनि**; तोंडानें ‘ चु चु ’ करीत. **मद्दोर्दंड ... करिती**; माझे हात खूप तडाखे देतात. हास्य रस.

## रामजोशी.

( ४५ ) **पायजिव**; पैंजण. **कुणिवार**; एखादे वेळीं. **लोकचाहीर**; लोकांतला हिरा. **वांगा**; गरीब, निरुपद्रवी.

## किर्लोस्कर.

( ४६ ) **ज्वलनाची**; अग्नीची. स्वभावोक्ति अलंकार.

## आगरकर.

( ४७ ) **अजाद्वीप**; नायगारा नदींतलें ‘ Goat island ’ नांवाचें बेट.

**प्रियदर्शनार्थ**; आपला प्रियकर जो समुद्र त्यास पाहण्याकारितां. **पंचत्वाप्रत पावल्यासारखे**; मेल्यासारखे. रौद्र व उदात्त रसांचा संकर.

**केळकर.**

( ४८ ) **युगांतर**; युग बदलणें. रूपक व उपमा. उदात्त रस.

**मोगरे.**

( ४९ ) **पापाचलनाचे**; पापरूपी पर्वतांचे. भयानक रस. **पुण्य तटिनी**; पवित्र नदी. आडरूपी उपालंकार.

**आपटे.**

( ५० ) स्वभावोक्ति उपालंकार.

**पंडिता रमाबाई.**

( ५१ ) **या पक्ष्यांना**; 'Gull' नांवाच्या पक्ष्यांना. स्वभावोक्ति.

**गोविंदाग्रज.**

( ५२ ) **आनंदींही...होई**; जें आनंदानें देखील रडतें इतकें मृदु आहे तें दुःखांत रडेल यांत काय संशय ? काव्यार्थापत्ति अलंकार. **आळा**; हट्ट. करुण रस.

**मोडक.**

( ५३ ) **रोही**; हरिणाची एक जात. **जेठी**; पैलवान. स्वभावोक्ति अलंकार. भयानक रसाची छाया.

**साधुदास.**

( ५४ ) **अस्फुट०**; अस्पष्ट असें 'इश्श' वारंवार म्हणत. **इष्ट घटना**; हवी होती तीच गोष्ट. शृंगार.

**यशवंत.**

( ५५ ) **लइ वाडुळ**; फार वेळ. **अन् सांग०**; कुणाला पाहून त्यांचा ( पतीचा ) शीण जाईल सांग पाहूं; अर्थात् 'मला,' असा भाव.

**टिळक.**

( ५६ ) **श्रेणी**; पंक्ति. **तुझ्या...मी**; मी जरी तुझ्या सर्वश्रेष्ठ साहित्यरूपी महासागरांतला मासा असलों. रूपक.

## गिरीश.

( ५७ ) **काळखाइ**; प्रळय.

## विठोबा अण्णा.

( ५८ ) **सजल०** डबडबलेल्या मेघाप्रमाणें सावळ्या अंगाचा. **मकरकुंडलें**; माशांसारखीं कुंडलें. **पटीर**; चंदन. कंबुकंठ; शंखासारखा कंठ. **वलित्रयबंधुर**; तीन सुरकुत्यांमुळें सुंदर दिसणारी. **कौशेय**; रेशीम. **सिंजान**; रुणझुणणारे. **मंजीर**; तुकडे. **वज्र...अंकित**; अंकुश, ध्वज, आणि कमळ अशा चिन्हांनीं मंडित. **आसेचनक**; सुंदर. स्वभावोक्ति अलंकार.

समाप्त.